# मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें

# खंड १३ व १४

***

( रायरीकर व खासगीवाले यांचें दप्तर )

संपादक

**विश्वनाथ काशीनाथ राजवाडे**

मुद्रक व प्रकाशक

**अच्युत चिंतामण भट**

यशवंत छापखाना, कसबा पेठ, पुणें शहर.

जानेवारी १९१८

# विषयप्रवेश.

पुढील श्री. रायरीकर यांचे संग्रहांतील पत्रें रा. रा. **विश्वनाथ काशिनाथ राजवाडे** यांस श्रीमंतांच्या कृपेनें सांपडलीं. या रायरीकरांच्या घराण्याचा मान पेशवाईतील उत्तरार्धांत पुष्कळच मोठा होता. इ. स. १७६०–१७७४ ( शके १६८२–१६९६ ) पर्यंत पेशव्यांच्या दरबारांत जे काय पुण्यास कारभार झाले, त्यांत चिंतो विठ्ठल रायरीकरांचें अंग नव्हतें, असें झालेंच नाहीं. या तात्या रायरीकरांवर दादासाहेबांची अखंड कृपा असे व तेही दादासाहेबांच्या पक्षाला एकनिष्ठ असत.

असो; यापेक्षां आणखी पुष्कळ पत्रसंग्रह श्री. रायरीकरांकडे असावा. रायरीकर संग्रहांतील आज मी जो पत्रव्यवहार छापीत आहें, तो फक्त श्री. थोरले माधवरावसाहेब यांच्या आमदानींतील आहे. त्यांतही प्रथमतः शिंदे प्रकरण घेतलें आहे. अर्थातच सर्व पत्रांचा अनुक्रम कालमर्यादेनें ठेवितां आला नाहीं व येणें शक्य नाहीं. शिंदेप्रकरणांत कालानुक्रम राहील; पण एकंदर सर्व पत्रें कालक्रमानें न छापितां मिळालेलीं पत्रें प्रकरणवार लावून प्रत्येक प्रकरणांत मात्र कालानुक्रम ठेवावा, असें मीं ठरविलें आहे. प्रत्येक पत्राला पत्रांक, सालासह महिन्याची मित्ती व सनासह महिन्याची तारीख देणार आहें व प्रत्येक प्रकरणाच्या प्रारंभीं त्या प्रकरणाचा गोषवारा व इतर अवश्य माहिती देणार आहें, वगैरे गोष्टी प्रसिद्ध झालेल्या जाहीर विनंतीपत्रांत नमूद केल्याच आहेत.

आतां शिंदे प्रकरणाचा विचार मला मिळालेल्या रायरीकरांचें पत्रान्वयें करावयाचा. सर्व मराठी इतिहासाच्या भक्तांस विदितच आहे कीं, पानिपतच्या घोर व घातकी संग्रामांत इतर सरदारी घराण्यावरोबर शिंद्याच्या घराण्याचा भयंकर नाश झाला. दत्ताजी व जनकोजीच्या मागें शिंदे घराण्याची फारच हलाखी झाली. राणोजी शिंद्याचा नातु केदारजी व त्याचा रक्षापुत्र महादजी ( पुढें जगत्प्रसिद्ध झालेले पाटिलबावा ) हे कायते म्हणण्यासारखे पुरुष अवशिष्ट होते. पानिपतानंतर सर्व महाराष्ट्राची सत्ता आमच्या शूर पण भोळ्या दादासाहेबांच्या हातांत आली. त्या वेळचे लोक यांस ' सांब ' म्हणत असत. चमत्कार हा आहे कीं, यास उपासनाही शंकराची असे! अथवा ' यो यच्छ्रद्धः स एव सः ' या न्यायानें हें ठीकच होतें. दादासाहेब जितके शूर होते, तितकेंच जर बुद्धीचे खंबीर व लेखणीचे धड असते, आनंदीबाई, बापू, रायरीकर, राजेबहाद्दर, मल्हारराव होळकर, इत्यादि मंडळी सांगतील तेंच खरें व नानासाहेबांच्या पक्षाची राष्ट्राभिमानी मंडळी सांगतात तें खोटें, असा जर यांनीं आपला पूर्वग्रह करून घेतला नसता, हे जर भोळे नसते, तर मराठी राज्यास सकुटुंब सपरिवार यांनीं जो कायमचासा अपाय केला, तो त्यांच्या हांतून झाला नसता. असो; यांचा भोळेपणा, यांचा तापट स्वभाव,

यांची महत्वाकांक्षा, यांची बाहेरख्याली व यांच्या शूरत्वामुळें यांस ओघानें प्राप्त झालेली यांची मान्यता, हींच महाराष्ट्राच्या मुळावर येऊन त्यांनीं पेशवाईचा विध्वंस केला, ही गोष्ट मात्र खरी आहे.

या दादासाहेबांच्या आग्रहावरून प्रथम दोनतीन वर्षेपर्यंत शिंदे घराण्याच्या सरदारीचा निकाल झाला नाहीं. दादासाहेबांच्या मनांतून ही सरदारी मानाजी काकडे या नांवाच्या एका शिंद्यांच्या लांबचे पण शूर नातेवाईकास द्यावी, असें होतें. यामुळें शा. शके १६८४–८५ पर्यंत (इ. स. १७६२।६३ पर्यंत) ह्या सरदारीचें घोंगडें तसेंच भिजत पडलें होतें. पुढें केदारजी व महादजी या उभयतांनीं जेव्हां चिंतोविठ्ठल ऊर्फ तात्या रायरीकराकडे संधान बांधिलें, एका किंवा अन्यरूपानें तात्यांच्या घरीं २५००० रु. पोहोंचविले, शिंदेसंस्थानची कुल फडनीशी दिली, दादासाहेबांपुढें खासगत खर्चासाठीं १ लाख रुपये ओतले, तेव्हां केदारजीस सरदारी मिळण्याचा संभव दिसूं लागला. पण 'अंतस्थ' देणें हा शिंद्यांचा मुख्य वशिला नव्हता. ते उभयतां–पण विशेषतः महादजी–पराक्रमी सरदार! त्यांच्याकडे रजपुतान्यांतील मामलतींचा कारभार विल्हे लावण्याचें काम आलें होतें तें त्यांनीं सफाईनें पार पाडिले. इ. स. १७६३ च्या मेच्या सुमारास जानोजी भोसल्याच्या मुलखावर स्वारी करण्याचा त्यांस हुकुम झाला होता. कारण भोसले या वेळीं निझामाच्या कच्छपी होते. महादजी खालीं उतरणार तों भोसले सावध होऊन पुनः मराठ्यांच्या कक्षेंत अंतःप्रविष्ट झाले. असो; शिंदे उज्जनी, नर्मदातीर वगैरे करून थेट गंगातीरीं आले व तेथें श्रीमंतांच्या व त्यांच्या गांठी पडल्या. याच वेळीं जनकोजी शिंद्याचा तोतया पुढें येऊन त्याचेंच कांहीं वेळ खुळ माजलें. शेवटीं तो 'थोरात' हें ठरलें! पुढें श्री. नारोशंकर राजे बहादर यांनीं महाप्रयत्न करून शिंद्यांची सरदारी उभी केली व आपण त्यांची दिवाणगिरी पत्करून नजराणा, दरबारखर्च इत्यादिकांची व्यवस्था लावण्यास आरंभ केला. राजेबहादर यांनीं शिंद्यांसाठीं आपल्या जामीनकीवर कर्ज काढून शिंद्यांची ६४ च्या ज्यान्युआरीमध्यें उत्तर हिंदुस्थानांत रवानगी केली आणि आपण माधवरावसाहेबांच्या कर्नाटकच्या स्वारींत सामील झाले.

हिंदुस्थानांत जातांना शिंद्यांच्या बरोबर महादेव गोविंद काकडे या नांवाचे दादासाहेबांच्या व रायरीकरांच्या प्रीतींतले एक श्रीमान गृहस्थ व मोरोविठ्ठल रायरीकर–तात्यांचे बंधु–पेशव्यांनीं दिले होते. सरासरी वर्षसव्वावर्षपर्यंत शिंदे व काकडे–रायरीकरांची जोडी. यांनीं कसावसा कारभार करून उदेपूर वगैरे मामलतींचा निकाल काढिला. पण उभयतांची चित्तशुद्धि नव्हती. १७६५ च्या मे अखेरीस तर ही चुरस विकोपास गेली व माहदाजी गोविंद निराळे झाले. काकड्यास शिंद्यांची दिवाणगिरी हवी होती. ही गोष्ट नारोशंकरास (नानांस) कशी सहन होणार!

त्यांनीं शिंद्यांस सूचक पत्रें लिहिलीं. तेव्हां नारोशंकरांच्या ह्या सूचनेनुसार राघो-राम, राघोमल्हार व बाजी नरसिंह ( शिंद्यांचे हितचिंतक ) यांनीं काकड्यास धर-ण्याच्या हेतूनें त्यांच्यावर हल्ला केला तों काकडे युद्धांत मारिले गेले ! त्यांचा एक मुलगाही जखमी झाला. मोरोपंतांसही शिंद्यांच्या वाईनें हाकून दिलें !

याच सुमारास पेशवे व दादासाहेब कर्नाटकची स्वारी आटपून परत आले. चुलता–पुतण्यांत वांटणीच्या गोष्टीचा ऊहापोह झाला. पण रावसाहेबांच्या युक्तिशुद्ध बोलण्यापुढें भोळ्या राघोबाचें कांहीं चाललें नाहीं. पुनः ते उभयतां एकम-तानें वागूं लागले. दादासाहेबांनीं हिंदुस्थानांत जाऊन पातशाहीचा बंदोबस्त करण्याचें व पानिपतच्या पूर्वीं उत्तर हिंदुस्थानांत मराठ्यांचा जितका अमली मुलुख होता तितका पुनः सोडविण्याचें कबूल केलें. उभयतां श्रीमंतांनीं भोसल्यास वळणीला आणिले आणि मग १७६६ च्या ज्यान्युआरींत दादासाहेब भोसल्यांची चार पांच हजार फौज घेऊन व विठ्ठल शिवदेव, गायकवाड इत्यादि सरदार घेऊन रायरीकरांसह उत्तरेस गेले.

पण दादासाहेबांचा शिंद्यांवर मनस्वी राग होता. कारण काकड्याच्या मर-णास शिंदे कारण झाले होते. यावेळी शिंद्यांनीं व त्यांच्या कारभाऱ्यांनीं नारो-शंकरास जीं पत्रें लिहिलीं आहेत, तीं किती लीनतेचीं व आर्जवाचीं आहेत, हें आतांच प्रसिद्ध झालेल्या या खंडांतील पत्रांवरून स्पष्ट दिसेल. या वेळीं सर्व ऐवजाच्या निशेसाठीं शिंद्यांनीं सर्व दक्षिणेंतील महालही नारोशंकरास लाऊन दिले होते ! असो; चिंतोपंत तात्यांचे बंधु मोरोविठ्ठल यांस शिंद्यांनीं रिक्तहस्त परत पाठविले होते, म्हणून रायरीकरांचाही राग शिंद्यावर होताच. पण नारोशंकरांनीं मध्यें पडून व सहालक्षापर्यंत सरकारांत नजराणा, रायरीकरास फडणिशी, इत्यादि कबूल करून दादासाहेबांस पळयावर आणिले.

ह्या वेळपर्यंत शिंदे कांहीं स्वस्थ बसलें नव्हते. त्यांनीं कोटेकरांची मामलत करून व मारवडची मामलत रगडून टाकून मल्हारराव सुभेदारांचा उपराळा कर-ण्यासाठीं दिल्लीकडे प्रयाण केलें होतें. इतकें व्हावयास १७६५ चा आगस्ट उजाडला. इकडे गणोजी कदम या नांवाच्या मनुष्यानें महादजींचें नांव सांगून रावसाहेब पेश-व्यांपाशीं वाटतील ते करार–मदार कबूल केले होते. अर्थातच हे करार शिंद्यांस पसंत नव्हते व नारोशंकरांनींही आपलें औदासिन्य सोडून व गणोजीस फजीत करून ते करार मोठ्या कष्टानें नाहींसे केले. शेवटीं शिंद्यांची सरदारी कायम झाली, व शिंद्यांनीं नारोपंतनाना राजेबहादरांस हिंदुस्थानांत १७६५ च्या अखेर बोला-विलें, व ते दादासाहेबांबरोबर गेलेही.

राघोबादादासाहेब हिंदुस्थानात पाऊल ठेवून काम करावयास आरंभ करणार तों मल्हारराव सुभेदार वैशाख शु॥ ११ (ता. २० मे १७६६ ) स दिवंगत झाले.

मल्हारराव म्हणजे कर्तापुरुष. अव्वल पासून मराठ्यांचा उत्कर्ष पाहिलेला व उत्कर्षास स्वतःच्या मर्दुमकीनें साहाय्य केलेला पुरुष मल्हारराव काका! गनिमी लढाई खेळावी अशी त्यानेंच. त्याला पातशाही सकट सर्व हिंदुस्थान चळचळा कांपत असें. तो मेला ह्मणजे मराठावादशाहींचा उजवा हात गेला! राघोवादादांची हिम्मतच खचली. तथापि त्यांनीं उद्दिष्ट कामास हात घालून प्रथम गोहदेस वेढा दिला. इकडे शिंदेही उदेपूरच्या वगैरे मामलती आटपून गोहदेस आक्टोबरच्या सुमारास आले. तेव्हां रायरीकरांनां आपली फडणिशी पुनः कायम करून घेतली. इकडे जनकोजीचा तोतया आपल्या आश्रितांस सनदा देतच होता व त्यायोगें शिंद्यांच्या मुलुखांत थोडीफार दंडेलगिरी होतच होती.

तथापि महादजीची व थोरल्या श्रीमंताची गांठ पडली तेव्हां सरदारकीचा मुख्य मान आपल्यास मिळावा असा त्यानें वूट काढला. या खलवतांत नारोशंकरची दिवाणगिरी निघाली, त्याची झांशी शिंद्यांस मिळाली व देशी परत गेल्यावर केदारजीस वजा करून महादजींस सरदारींचीं वस्त्रें द्यावयाचीं असें गुप्तपणें ठरलें. रायरीकरांची फडणिशी सनद शिंद्यांची व हुजूरची होऊन त्यांचा शिंद्यांकडील कर्जाचा फडशा झाला व रायरीकरांस शिंदखेड, येदलाबाद येथील दरकाच्या असाम्या करार झाल्या. तर्क आहे कीं अवापुरंदऱ्यांनीं या वेळीं शिंद्यांचे तर्फेनें मदत केली असावी. पुढें दादासाहेबांनीं कसावसा गोहदचा कारभार आटपून आपली आक्रमशक्ति नाहींशी झाली, असें दाखविलें; व नंतर इंदुरास येऊन त्या प्रसिद्ध साध्वी अहिल्याबाईच्या हातानें आपली नाचक्की करून घेतली! याप्रमाणें माधवरावसाहेब कर्नाटकांतून यश मिळवून परत येतात तों दादासाहेब आपली अपेशी मूर्ति घेऊन परत आले.

स्वस्थानीं आल्यावर त्यांनीं पेशवाईच्या वांटणीचा प्रश्न काढला. पण रावसाहेब पेशवे या वेळीं फौजबंद असून त्यांच्या शहाणपणाची व शूरत्वाची कीर्ति सर्वत्र पसरली होती. त्यांची दूरदृष्टी, आटोकाट शहाणपण, त्यांची आवर-शक्ति इत्यादि गोष्टी व त्यांची कदर हीं अशीं कांहीं विलक्षण होतीं कीं, रावसाहेबांची छाप 'तेथें कांहीं चाड नाहीं वयाची' ह्या न्यायानें सर्वत्र बसली. रावसाहेबांचें ठासून बोलणें व करारी स्वभाव पाहिल्याबरोबर दादासाहेब शरमले. व 'आपलें २५ लक्ष रुपये कर्ज वारलें ह्मणजे आपण स्नानसंध्या करून राहूं' असें त्यांनीं आपल्या क्षणैकभंगुरवृत्तीनें रावसाहेबांस वचन दिलें. ही गोष्ट १७६७ च्या मे-जून मध्यें झाली.

इकडे महादजी शिंद्यांनीं दादासाहेबांच्या पाठीमागें 'आपलें सरदारीचें काम पुरें करून द्या' असा लकडा लावला. रावसाहेबांनींही रायरीकरांच्या फडणीशीचे हिशोब तपासले. याच समयीं तुकोजी होळकर दक्षिणेस आले होते.

त्यांच्या बरोबर गंगाधर यशवंत ऊर्फ गंगोबातात्या चंद्रचूड आले. त्यांचें व अहल्याबाईचें पटेना म्हणून त्यांनीं तेथील दिवाणगिरी सोडून शिंद्यांच्या राज्याची दिवाणगिरी करावी असा हेतु धरिला व महादजींस न कळवितां (त्यांच्या परोक्ष) रावसाहेबांजवळून महादजीच्या सरदारीची व्यवस्था लावण्याचा उपक्रम सुरू केला. गंगोबा तात्यांनीं राज्याच्या व स्वतःच्या फायद्यासाठीं ज्या शर्ति महादजींच्या तर्फे कबूल करण्याचा घाट घातला, त्या महादजीसारख्या अभिवृद्धीच्छु पुरुषास कशा पसंत पडणार ? त्यांनीं रायरीकरांस ‘आपलें वचन पूर्ण करा’ व पंत प्रधानांस व बापूंस ‘आपली फार गरीबी आहे’ अशा पत्रांची झोड उठविली व ‘रायरीकर मात्र आपल्या तर्फेनें बोलतील इतरांस बोलण्याचा अखत्यार नाहीं’ असें रावसाहेबांस स्पष्ट कळविलें. रायरीकरांस खुष करण्यासाठीं त्यांनीं स्वदेशच्या सर्व शिंद्याकडील महालांचे सरसुभे नेमून त्यांनीं पाठविलेल्या सदाशिव केशव या नांवाच्या गृहस्थाच्या नांवें सनदा करून दिल्या. पेशव्यांनीं ही गंगोबातात्यांस शिंद्यांची मुतालकी देऊन दिवाणगिरी बाजी नरसिंह यांस दिली. पण गंगोबांचें प्रस्थ महादजीस नको होतें. १७६७ च्या अक्टोबरमध्यें हा कारभार झाला. पुढें महादजी स्वतः १७६८ च्या ज्यूनच्या सुमारास दक्षिणेंत आले व त्यांनीं आपल्या मनाप्रमाणें सर्व कारभार उरकून घेतला.

नंतर हिंदुस्थानचे स्वारींत त्यांनीं होळकरासह रामचंद्र गणेश व विसाजी कृष्ण विनींवाले यांच्या हाताखालीं राहून रोहिले व पठाण यांचा खासा समाचार घेतला, पातशाहीची व्यवस्था लाविली आणि सुजाउद्दवला व इंग्रज यांच्याशीं दोन हात व्हावयाचा खासा प्रसंग ते आणणार तों सर्व महाराष्ट्राच्या दुर्दैवानें थोरले माधवरावसाहेब मरण पावले आणि नानासाहेब पेशव्यांचे व रावसाहेबांचे विचार मनच्या मनींच राहून गेले. तसेंच, येथें माझें शिंदे प्रकरणाचा विषयप्रवेशही संपला.

# महाराष्ट्र-इतिहास-साधन



## पुस्तक पहिलें.



### पत्रांक १. 1764

१७६३ ता. २० जान्युआरी. श्री माघ शुद्ध ६ शके १६८४

रा. [१]चिंतोपंत फडणीस गोसावी यांसीः—

अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्ने॥ केदारजी[२] शिंदे व महादजी शिंदे दंडवत विनंति उपरी येथील कुशल ता॥ छ ५[३] माहे रजब मुक्काम मिरज कृष्णातीर येथें राजश्री अंताजी माहादेव यांनीं तुह्मांपासून रुपये २५०००[४] पंचवीस हजार घेतले आणि खर्च केले असत तरी हा ऐवज सत्वरच पोहचतां करून देऊं. बहुत काय लिहिणें हे विनंति

हस्ताक्षर अंताजी माहादेव द॥ म॥ कु॥ (?)

---

### पत्रांक २.

१७६३ ता. २४ जान्युआरी श्री माघ शुद्ध १० शके १६८४

राजश्री चिमाजी नारायण कमावीसदार पा॥ येदलाबाद गोसावी यांसीः—

अखंडित लक्ष्मी अलंकृतराजमान्य स्ने॥ जनकोजी[५] सिंदे दंडवत सु॥ सलास सितैन मया व अलफ राजश्री रामचंद्र[६] हरी यांस प॥[७]—मजकूर येथील मजमूची[८] असामी करार करून पाठविले असेत तरी यांचे हातें प॥—मा॥रचें

---

१ हेच प्रसिद्ध चिंतो विठ्ठल रायरीकर होत. यांच्याकडे कांहीं दिवस दादासाहेब पेशव्यांनीं फडणिशी सांगितली होती. २ शिंदेसरंजाम कोणाला द्यावयाचा याचा अजून निकाल झाला नव्हता. ३ या वेळीं मिरजेस पेशव्यांनीं वेढा दिला होता. अर्थातच शिंदे या वेळीं पटवर्धनाविरुद्ध लढत होते. ४ माझा अजमास आहे कीं हे रुपये रायरीकरांस अंतस्थ दिले असावे. ५ जनकोजी पानिपतावरच सरकार कामास आले. सरदारी कोणास द्यावयाची हें अद्यापि ठरलें नव्हतें ह्मणून सही शिक्के जनकोजीच्या नांवचे होते. ६ रामचंद्र हरी हा रायरीकरांच्या वशिल्याचा गृहस्थ. ७ परगणे. ८ हिशेबावरील मुख्य.

मजमूचें कामकाज घेत जाणें. यांसी वेतन सालिना रुपये ५०० पांचसें रुपये करार केले असेत प॥-मजकूरच्या ऐवजीं पावते करून स्वामिसेवा घेणें.

जाणिजे छ ९ रजब बहुत काय लिहिणें हे विनंती.

० ∪
श्री ज्योति स्वरूपचरणि तत्पर
जयाजीसुत जनकोजी सिंदे
निरंतर

मोर्तब सुद

---

## पत्रांक ३.

श्री

राजश्रियाविराजीत राजमान्य राजश्री रामचंद्रपंत[1] स्वामी गोसावी यांसिः-

पो चिंतो विठल सां॥ नमस्कार प॥ येदलाबाद येथील कमाविसदारास मुजमूविसीं सिंद्याचें ताकीदपत्र घेऊन पाठविलें आहे. कमावीसदाराचें नांव लिहिलें नाहीं. तुह्मी नांव ठिकाणीं लावून कागदांत भरून पत्र कमावीसदारास देणें. अमल चालेल. चिंता नाहीं. आपलेकडील वर्तमान वरचेवरी लिहीत जाणें. बहुत काय लिहिणें ? हे[2] विनंति.

---

## पत्रांक ४.

१७६३ ता. १३ फेब्रुआरी श्री फाल्गुन शुद्ध १ शके १६८४

श्रीमंत महाराज[3] राजश्री दादासाहेब महाराजांचे सेवेसीः--

आज्ञाधारक केदारजी सिंदे व महादजी सिंदे दंडवत विज्ञापना ऐसीजे आह्मीं साहेब-भेट रुपये १००००० येक लक्ष करार करून गेलों ते राजश्री अंताजी माहादेव यांचे मार्फतीन पाठऊन देऊं. यासी अंतर पडणार नाहीं. (स)दरहू येवज दो महिन्यानीं खासगी खर्चास पाठऊन देतों. छ २९ माहे रजब मुा

---

१ रामचंद्र हरी दिम्मत रायरीकर. २ पत्रावर तारीख नाहीं किंवा मिती नाहीं. पण हें पत्र शके १६८४ अथवा १७६२।६३ मधील असावें. ३ हे राघोबादादा. केदारजी व महादजी या दादासाहेबांस महाराज ह्मणतात हें नीटच. कारण सरदारी अद्यापि ठरली नव्हती. या वेळीं दादासाहेब सर्वाध्यक्ष होते. शिवाय ते ' भोळे शंकर ' असत. तेव्हां त्यांस ' महाराज ' होणें कांहीं अशक्य नव्हतें ! हाच कालमहिमा होय ! पत्रांतील १ लक्ष रुपयाची भेट , ' महाराज ' प्रसन्न होण्याप्रीत्यर्थच आहे, कारण जमाखर्च ' खासगी 'कडे व्हावयाचा आहे.

चिकोडी कृष्णातीर शके १६८४ चित्रभानुनाम संवत्छरे फाल्गुन शुद्ध १ प्रतिपदा बहुत काय लिहिणें हे विज्ञापना. हस्त–अक्षर अंताजी माहादेव.

---

## पत्रांक ५.

१७६४ ता. १४ जान्युआरी श्री. पौष शुद्ध ११ शके १६८५

अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य राजश्री नारो[1] विठ्ठल गोसावी यांसिः—

सेवक माधवराव बल्लाळ प्रधान नमस्कार सुा अर्बा सितैन मया व अलफ तुह्मास[2] राजश्री केदारजी सिंदे व माहादजी सिंदे यांजकडील हुजूरची फडणिसी रामाजी अनंत याजकडे होती ते व पथकाची फडणिसी चिंतो कृष्ण याजकडे होती ते दूर करून साल–मजकुरापासून तुम्हास सांगोन पेशजीचे फडणिसाप्रमाणें सरंजाम वगैरे नेमणूक करार केली असे, तर इमानें इतबारें वर्तोन दोन्ही फडणिशांची सेवा एकनिष्ठेनें करून नेमणूक घेत जाणें व माहालाकडील फडणीस पहिले असतील त्यांत उपयोगी असतील ते करार करून घेणें. गैर–उपयोगी असतील ते दूर करून तुम्हीं आपले तर्फेनें माहालोमाहालीं कारकून ठेऊन त्यांचे हातें फडणिसीचें कामकाज घेत जाणें. *जाणिजे छ १० रजबु बहुत काय लिहिणें.

लेखन सिमा

बार

---

१ मोरो विठ्ठल तर नव्हे ? २ रायरीकरांस शिंद्यांची फडणीसी [illegible] पंत हें चिंतो विठ्ठलचे बंधु होत. संस्थानचाच फडणीस महालोमहालचे [illegible] तर्फेच नेमी; तेव्हां रामाजी अनंत दाभोळकर बदलून मोरो विठ्ठल [illegible] असा अर्थ कीं शिंदेसंस्थानांत जितके ह्मणून महालोमहालीं [illegible] असतील ते जाऊन आतां रायरीकर तर्फेचीं माणसें यावयाची. [illegible] लक्ष्यांत ठेवावयाची कीं ह्या मुख्य फडणीसांच्या नेमणुका [illegible]

* खाशांचें हस्ताक्षर.

## पत्रांक ६.

१७६४ ता. १० मार्च श्री. फाल्गुन[१] शुद्ध ७ शके १६८५

राजश्री जगंनाथ गणेश दिा कृष्णराव गोविंद कमाविसदार पा येंदलाबाद गोसावी यांसिः—

अखंडित-लक्ष्मी-अलंकृत-राजमान्य स्रो॥ माधवराव सिंदे दंडवत सुा अर्बा सितैन मया व अलफ. राजश्री रामचंद्र हरी निा चिंतो विठल यांची मजमू पाा मजकूरीं आहे. त्यास मजमूचे काजकाम मशार-निलेचे होतें सुरळीत घेत नाहीं म्हणोन मशार-निले यांनीं हुजूर लेहून पा. त्यावरून हें पत्र तुम्हांस सादर केलें असे तर सुदामत-प्रमाणें मशार-निलेचे हातें मजमूचें काज-कार्म यथास्थित घेणें. जाणिजे छ ६ माहे रमजान बहुत काय लिहिणें हे विनंति.







## पत्रांक ७.

१७६४ ता. २८ मे श्री. वैशाख वद्य १३ शके १६८६

राजश्री रामचंद्र हरी गोसावी यांसिः—

अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्नो॥ माधवराव शिंदे दंडवत सुा अर्बा सितैन मया व अलफ. तुम्हीं पत्र पाठविलें तें पावलें. लेखनार्थ अवगत जाहला. 'खासा स्वारी या प्रांतास आल्यावरील माहलचें वर्तमान साहेबांस पुढें येऊन निवेदन करूं' म्हणोन लिहिलें ऐसियासि एक मजलीच्या मुक्कामास तुम्हीं

१ १६८५ फाल्गुन अखेरही सरदारीचा निकाल होणें होता.

भेटीस येणें. वर्तमान मनास आणिलें जाईल जाणिजे छ २६ जिलकाद बहुत काय लिहिणें हे विनंति.

मोर्तब सुद

श्री ज्योति स्वरूपचरणि तत्पर
जयाजीसुत जनकोजी सिंदे
निरंतर

## पत्रांक ८.

१७६४ ता. १८ आक्टोबर- **श्रीपांडुरंग.** १६८६ आश्विनवद्य ८

मा॥ अनाम देशमुख व देशपांडे पा॥ एदलाबाद यांसी मानाजी[1] सिंदे खमस सितैन मया व अलफ. पा॥ मजकूरची मनमू पेशजीपासून राजश्री रामचंद्र हरी यांजकडे चालत असतां हालीं तुह्मीं कमाविसदा-रासीं मिळोन घसघस करितां ह्मणोन हुजूर विदित जाहलें. तरी ही गोष्ट उपयोगीं पड-णार नाहीं मशार-निलेसी रुजू राहणें. पेशजी-प्रमाणें यांच्या इतल्यानें काम-काज करीत जाणें. जाणिजे छ २२ रबिलाखर मोर्तबसुद

श्री ज्योतिस्वरूपचरणि
तत्पर जयाजीसुत जनकोजि
सिंदे निरंतर.

मोर्तब सुद

बार

---

## पत्रांक ९.

इ. स. १७६५ ता. २९ मार्च **श्री.** [illegible]

पा॥ छ ९ सवाल सोमवार

वडिलांचे[2] सेवेसी कृतानेक सीर सां नमस्कार [illegible]
ता॥ छ ७ सवाल मंदवार मुकाम असीउमरी [illegible]

---

१. अस्सल मजजवळ नाहीं. तेव्हां मानाजी [illegible] जण्यास मार्ग नाहीं. २ हें पत्र राजवाडे [illegible]

श्रीमंताचें आज्ञापत्र व आपलीं पत्रें येण्याविषईं आलीं, त्याजवरून जनस्थानीहून[1] कुच करून येथपर्यंत आलों. पुढें दरमजल येत असों. प्रस्तुत वर्तमान ऐकिलियांत आलें कीं आह्मी फौजसुद्धां आलीकडे आलों. पुंरदरीहून आंवेकर ग्रहस्तास निरोप देणार. ते नाशकास जाणार. सत्य मिथ्या नकळे. आपल्यास वातमी असेल. आम्ही सरकारच्या आज्ञेनुरूप आलों. दरबारांत[2] हा प्रकार. ते गोष्ट ठीक नाहीं. यास्तव आपण तेथें पुर्तेपणीं वळकटी करून हा प्रसंग होऊं न द्यावा. आम्हाकडून कोणेविषईं दुसरा अर्थ नाहीं. सरकार चाकरीस सांगतील त्याप्रमाणें हाजीर असों. फौजेचा जमाव भारी जाला आहे. देण्यास ऐवज पाहिजे. येथील अर्थ आहे तों आपल्या ध्यानांत आहे. याचा प्रकार ध्यानांत असावा. यानंतर उभयतांसी बोलणें लावावें कीं पूर्व(व?)तप्रों आमचा बंदोबस्त करून (द्यावा?) सर्व गोष्टींस हजर आहों. उभयतांकडील साधनेस त्यांचे मर्जीप्रों आसतील, त्या द्वारें बोलणें लावावें. आह्मी सरकारचे, आपले, आज्ञेप्रां येत असो. कृष्णाजी गोपाळ याजला दोन मजली आलीकडे आम्हांकडे पाठवावें. तेथील सर्व आर्थ समजतील. पूर्वीं पत्रें पो आहेत. त्यास त्यांत मजकूर लिहीला त्यास त्याचा सला लेहून पाठवावा. त्या आजवर (?) वर्तणूक घटेल. येण्याचा विलंब नाहीं. वरकड वर्तमान रो कृष्णाजी गोपाळ यांनीं सांगितलें असेल. उत्तर सत्वर पाठवावें. बहुत काय लिहीणें? लोभ करावा हे विनंती.

---

## पत्रांक १०.

इ० स० १७६५ ता० २० मे **श्रीराम.** १६८७ ज्येष्ठ शुद्ध १

श्रीमंत राजश्री नाना[3] स्वामींचे सेवेसीः—

सेवक राघो[4] मल्हार व बाजी नरसींव्ह कृतानेक सां नमस्कार विनंति. उपरी येथील कुशल ताा छ २९ जिलकाद मु॥ उजेन जाणोन स्वामींनीं स्व-कुशल लिहीत आसलें पाहिजे. विशेष. स्वामींकडेस दोन तीन वेळां विनंतिपत्रें लिा होतीं त्यास एक हि उत्तर आलें नाहीं त्यास कृपा करून सदैव पत्रीं लेखन करीत जावें. यानंतर आह्मांकडील सांप्रत्य सरदारीचा मजकूर तर बंदोवस्त आहे. राजश्री माहादजी[5] गोविंद याचें आमचें चित्त शुद्ध नाहीं. सर्व भरवसा स्वामींचा

---

१ नाशीक. २ गणोजी कदम या नांवाच्या गृहस्थानें महादजी शिंदे (पाटील बावा) यांच्या नांवावर वाटेलतशा थापा मारून नारोशंकर राजेबहादर यांचा नक्षा कमी करण्याची खटपट चालविली होती. त्यास अनुलक्षून हें पत्र व त्यांतील उल्लेख आहेत काय? ३ राजेबहादर. ४ हे या वेळीं शिंदांजवळ प्रमुखत्वानें वागत असत. ५ हा काकडे या उपनांवाचा गृहस्थ रायरीकरांच्या व दादासाहेबांच्या वशिल्याचा होता. याचें व पत्र लिहिणारांचें चित्त शुद्ध नव्हतें.

आहे. दरवारचा बंदोबस्ताचा गुंता स्वामीकडेस आहे. त्यांस तेथील बंदोबस्त तीन चार निदान पांचपर्यंत[१] करार ठराऊन निमेच्या ऐवजाच्या हुंड्या कराव्या आणि निमे सा महिनियाचा वायेदा ठरावून कामाकाजाचा गुंता उरकून घ्यावा. दिवसगतीवर न पडों द्यावें. स्वामीच्या वचनावर इतका प्रकार जाहला हें येश स्वामीचें. दुसरा अर्थ नाहीं. ऐवजाची (चा?) चितांत कांहीं कल्पविकल्प येईल, तर न येऊं द्यावा. वस्त्रें[२] आणि हुंड्या निमेच्या वरोवर कराव्या. फडशा केला जाईल. सारांश हेच विनंति कीं तेथ दरवारीं स्वामींनीं निशा करून सर्व गुंता वस्त्रें आदिकरून उरकून घ्यावा. रोविसी चिंता तिळतुल्य न करावी. आम्हीं सर्वप्रकारें सेवक दरवारचे आहोंत. दुसरा अर्थ नाहीं. वरकड कचा प्रकार राजश्री रावजींनीं लि॥ आहे. त्यावरोन कळों येईल. सेवेसी श्रुत होय हे विज्ञप्ति.

---

## पत्रांक ११.

इ. स. १७६५ ता. १४ जून श्रीहेरंब. १६८७ ज्येष्ठ वद्य ११

राजश्री नानास्वामींचे सेवेसीः—

[३]उभयेताचे सां नमस्कार विनंती उपरी आपण पत्र पाठविलें तें पावोन लि॥ मार समजला. ऐसियासी अवघ्या मनसब्यांत मुख्य आबरू च आहे. तिची न्यूनता जाल्यानें मग फल काय? अस्तु. आपण लौकर यावें. प्रथम येथें मनसब्याचा डौल झाला तो समक्ष च आपणांस समजला आहे. तेच मर्जी हा कालवर असे. [४]गकार नामक आले. त्यांनीं फार नरमपणें भाषण केलें. परंतु तात्पर्य श्रीमंताचें ध्यानांत आहे. त्यास सांप्रत इतकें च ठरलें कीं, [५]उभयतांच्या भेटी व्हाव्या. जें बोलणें चालणें असेल तें परस्परें समक्ष च व्हावें. त्यांत कांहीं गोष्ट ठरोन रहस्य जालें तरी उत्तम नाहींतरी त्यांनीं[६] भीमा उतरून दक्षणतीरीं जावें. [७]यांनीं अनंदवल्लीस अथवा आसपास असावें. उपरांत परस्परें चित्तास येईल तें करावें. ऐसें जालें आहे. गकार फिरोन गेले. इकडीलही चिंतो अनंत पाठविले आहेत. [८]त्यांनीं येणें तरी पांचा सा स्वारा. नसीं यावें अधिक न यावें. ऐसें स्पष्ट जालें असे. ते येतील. यांची त्यांची समक्षता होईल. परंतु त्यांशीं यांनीं काय बोलावें हा इत्यर्थ अगोदर जाला पाहिजे. तरी आपल्या व्यतिरिक्त हें ठरत नाहीं. यास्तव अविलंबें यावें. राजश्री [९]बापू

---

१ पांच लाख. २ सरदारीचीं, शिंद्यास. ३ हें पत्र चिंतो विठ्ठल यांनीं राजेबहाद्दरास लिहिलें. उभयतां यांतील दुसरें कोण हें समजण्यास मार्ग नाहीं. ४ गोविंद शिवराम खासगीवाले. ५ दादासाहेब व रावसाहेब यांच्या. ६ रावसाहेबांनीं. ७ दादासाहेबांनीं. ८ रावसाहेबांनीं. ९ सखाराम बापु बोकील. यांस कारभाराचीं वस्त्रें होणार ?

विंचुराहून रविवारीं त्रयोदसीस च दर्शनास येणार. तेच वेळेस वस्त्रेंहि होतील. आपले भेटीअंतीं आजपावेतों जालें वृत्त सविस्तर निवेदन होईल. स्वकीय कार्याचा मार लिा त्यास जो करार आपल्यास ठरोन त्याविसीं यादीहि जाली आहे. त्यांत कोणेविसीं गुंता नसे. त्या यादी पाठवाव्या तेणेंप्रों निर्गम होईल. सनदापत्र हातास येऊन कराराची यादी हि पाहिजे तरी ते हि आपल्यापासींच राहील. चिंता नाहीं. भेटीअंतीं सविस्तर कळेल. लौकर यावें. बहुत काय लिहिणें ? कृपेची वृद्धी करावी. पहिल्या यादी कराराच्या आहेत त्या पाहून सनदा द्याव-याची आज्ञा आहे. या हि पाठवून द्याव्या. आपण हि लौकर यावें. बापूचें वस्त्रा-समईं आपण असावें. उत्तम आहे. रविवारीं दोन प्रहरा भेटीचा मुहूर्त त्याचा आहे. वस्त्राचा हि तो च. याजकरतां आपण लौकर यावें. हे विनंती.

---

## पत्रांक १२.

इ. स. १७६५ ता. १७ जून श्रीसांब. १६८७ ज्येष्ठ वद्य १४

राजश्री चिंतो विठ्ठल यांसिः—

उपरी[१]. राजश्री नारोशंकर राजे बहादर याचे आर्जीवर दसकत[२] करून दिल्हें. तुह्मी चांदवडपावेतों जाऊन घेऊन येणें. दिरंग न लावणें. उद्यां चांद-वडास जावें. परवां बुधवारीं घेऊन येणें. दिरंगाचा समय नव्हे. रा सोमवार दीड प्रहर रात्र.

---

## पत्रांक १३.

इ० स० १७६५ ता० १७ जून श्री. ज्येष्ठ वद्य १४

राजश्री कृष्णाजी गोपाल स्वामी गोसावी यांसिः—

सेवक चिंतो विठल नमस्कार विनंति. उपरी. आम्ही काल रवीवारीं दोन प्रहरा निघोन थेरगांवास आलों. आज प्रातःकाळीं स्नानसंध्या उरकून चांदवडास तुह्मी लिहिल्याप्रों संध्याकाळीं दाखल होतों. राजश्री नानास[३] विनंति करून मंग-ळवारीं नानाचा मुहूर्त आहे, त्या मुहूर्तें निघोन लौकर चांदवडास आले पाहिजे. मंगळवारचा मुकाम चांदवडास करूं नये. पांच सात कोस आलीकडे यावयाची सला देणें. याउपरीं गुंता राहिला नाहीं. पागा लौकर बोलाऊन तयारी करावी. आम्ही चांदवडीं वाट पहातों. हें च पत्र नानास दाखवणें. बहुत काय लिहिणें ? रा सोमवार प्रहर दिवस सकाळचा हे विनंती.

---

१ ही दादासाहेबांची चिठ्ठी, राजेबहादरांस लवकर घेऊन येण्याविषयीं श्रीमंतांची रायरीकरांस आज्ञा आहे. रावसाहेबांशीं कसें चालावयाचें हें या चौकशींत ठरणार होतें.
२ सही. ३ राजेबहादर.

## पत्रांक १४.

इ. स. १७६५ ता. १८ जून  श्रीशंकर.  १६८७ ज्येष्ठ वद्य ३०.

सेवेसी चिंतो विठल सां नमस्कार विनंति. येथील वर्तमान सविस्तर राजश्री कृष्णाजी गोपाळ व गोविंद माहादेव आपल्यास सांगतील. श्रीमंतांनां[1] अकृत्रिम कृपेचे भाव व खातरजमेचीं अक्षरें मारनिलेजवळ सांगितलीं आहेत. मजला पुढें यावयाची आज्ञा केली आहे. ऐश्यास आपण स्वार होऊन पुढें यावें. पिंपळगांव-परियंत मी इकडून येतों. याउपरीं कोण्हे गोष्टीविसीं लढा राहिला नाहीं. किल्याची चिठी आह्मांजवळ श्रीमंतांनीं दिल्ही आहे. सर्व प्रकारें निखालस होऊन यावयाचें करावें. बहुत काय लिहिणें ? हे विनंति. रा मंगळवार तिसरा प्रहर.

---

हें पत्र शिंद्यांच्या दरबारांत प्रमुखत्वानें वागणाऱ्या राघोराम इत्यादि कारभाऱ्यांनीं नारोशंकरांस लिहिलें आहे. यांत महादेव गोविंद काकडे यानें आततायीपणा करून कसा स्वघात करून घेतला, याचें वर्णन आहे. हें वर्णन त्याचा नाश करणाऱ्या कारभाऱ्यांनीं केलें आहे, तेव्हां यावर जपूनच विश्वास ठेविला पाहिजे. मात्र शिंद्यांच्या दरबारांत व पेशव्यांच्या दरबारांत शिंद्यांच्या सरदारीबद्दल कोण उलाढाली चालल्या होत्या, घावडाव कसे चालत होते, यांचें बरेंच स्पष्ट चित्र या पत्रांत रेखाटलें आहे.

---

## पत्रांक १५.

इ० स० १७६५. जून.  श्री.  १६८७ आषाढ

श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे शेवेसी पोष्य राघो राम व राघो मल्हार व बाजी नरसिंह कृतानेक सां नमस्कार विनंती येथील कुशळ तागाईत छ [illegible] जिल्हेज मुकाम नजीक मुकुंदवारी येथें स्वामींचें कृपावलोकनेंकरून क्षेमरूप जाणून स्वकीय कुशलोत्तर पत्रीं आनंदवीत असावें. बहुत दिवस जाले. आपणाकडून पत्र येऊन परामृष[2] होत नाहीं, तेणेंकडोन चिंतातुर आहोंत. तरी आपल्याकडील साकल्य अर्थलेखन करून आज्ञापत्र प्रेरणा करीत असावें. यानंतर इकडील वर्तमान तरी श्रीमंत मातुश्री[3] बाई व राजश्री माहादजीबावाचें [illegible] वर्तमान आपणास कळलेंच असेल, आणि शेवेसी तो शिवाजी [illegible] निवेदन केलेंच असेल. अलिकडे वर्तमान तरी माहादाजी [illegible] देऊन ठेवावें हा इत्यर्थ केला होता. त्यास त्याचा [illegible]

---

१ दादासाहेबांनीं. २ परामर्श. ३ जनकोजींची [illegible]

श्रीमंत स्वामींनीं आम्हांस दिल्ही असतां येथें मुजमू करून रहावें हा प्रकार उत्तम नाहीं, देशास जावें, म्हणोन याजपासोन निरोप घ्यावा आणि हे कोटयाकडे आणिक दोन चार मजली गेलियावर अवंतिकेस येऊन धामधूम करावी, सावकारा मारावा, ऐसा चित्तांत भाव आणून आड घातली कीं दिवाणगिरी स्थापलियाखेरीज आमचें राहणें होत नाहीं. तेव्हां प्रसंगास सेवकाखेरीज सख्त ज्वावसाल कोणी हीं न करीत तेव्हां ज्वावसाल करावासा जाला त्या ज्वावसालामुळें अगोदर आम्हावर च परम श्रमी होते तें कोठवर ल्याहावें ? त्याजवर निरोप घेऊन × × × × होते उज्जनींत रा। अच्युतराव व आह्मीं हि होतो. त्यास सावेरींचे आसपास उज्जन वगैरे परगणियाचे गांव लुटूं लागले. खंडण्या हि घेतल्या. ऐसी धामधूम केली. त्याजवरोन रावजींनीं व आह्मी पत्रें त्याजकडे पाठविलीं कीं हें कर्म आपणायोग्य नाहीं. येकदों गांवचें पारिपत्य केलें तें उत्तम केलें. परंतु याउपर हे गोष्ट कामाची नाहीं. ऐसीं पांच सात वेळां पत्रें पाठविलीं परंतु एकंदर न ऐकत. आणि कासिदास मारून वाटे लावीत. तेथें पत्राचें उत्तर येणें कळत च आहे. ऐसा विचार जाहलियावर उज्जनींत हजार बाराशें लोक होते. त्यास रावजींनीं आम्ही विचार केला कीं याजला दबाव देऊन इंदूरापावेतों पोहोचावून द्यावें म्हणून फौज तयार करोन गेलों. कोसावर उभे राहून दबाव दाखविला, परंतु न ऐकत. नजीक गेलों तेव्हां कांहीं पळून गेलें. कांहीं उभे राहिलें, आणि गोळागोळी करूं लागले. तेव्हां आम्हांकडील लोकांनीं चाल केली, तेव्हां झाडोन पळोन गेले. पेंढारी लुटारे होते त्यांनीं राहोट्या वगैरे होत्या त्या लुटून नेल्या. तशांत लुटारियांनीं कोणीकडे माहादजीपंतास धरिलें हें न कळे. जखमा लागून सात आठ रोजा मृत्यु पावले. होणारास विलाज नाहीं. अगोदर आमचे नांवें श्रमी होते च. त्यांत हा प्रकार जाला! त्यामुळें सर्वत्र दरबारीं आमचें च नांव बदु करून दुर्निमित्य आम्हांवरी ठेवतील. आम्ही तों एकनिष्ठ सेवक आहों हें स्वामीही जाणत आहेत. सारांश दिवाणगिरीमुळें हा प्रकार जाला. येविसीं पूर्वीं हि पत्र आपणाकडे पाठविलें आहे, कीं साकल्य कचें वर्तमान आपणांस कळावें. ते पत्रें पावतील न पावतील याजकारितां हालीं हि सेवेसी लेखन केलें असे. रोज गुदस्त राजश्री विष्णुपंतबावांचीं पत्रें आलीं तेथ मजकूर कीं 'श्रीमंत नानांनीं व आम्हीं उलेख करून श्रीमंत स्वामीस देहावरी आणिलें आहे. परंतु तूर्त द्रव्य साहा लक्षपर्यंत द्यावें लागतें. आणि फडणिसीचा प्रकार हि द्रव्यद्वारा केला पाहिजे.' ऐसें विस्तारें लेखन केलें त्यास आपण स्वताच प्रसंगीं असलिया आम्हांस सेवक लोकांस काळजी किमर्थ असावी? परंतु त्यांचें लिहिल्यांत आलें कीं 'तुम्हाकडील पत्र आलियावर नाना व आम्ही हा उद्योग करूं' त्यास पुर्ता पक्का विचार श्रीमंत स्वामीकडील करून घ्यावा आणि सरदारांचीं वस्त्रें वरकड बंदोबस्त करून घेऊन साहा लक्ष परियंत करार करून साऊकारी निशा द्यावी. आणि आम्हांवरी चिठ्या कराव्या. फडणिसीचा हि

प्रकार द्रव्यद्वारें होईल तेथवर करावा. आणि बंदोवस्त करून घ्यावा. यांत कमी-जास्त थोडें वहुत असलें तरी आपण करावें. हा सावधगिरीचा अधिकारहि आपणांस आहे. केवळ आम्ही त्याहावें ऐसाहि प्रकार नाहीं. दुसरें रा विष्णुपंत आवांनीं व शिवाजी विठ्ठल यांणीं लिहिलें होतें कीं, 'देशींचे महाल आहेत, ते नानाकडे सोपून द्यावें,' त्याजवरून देशीं माहाल आहेत त्याचीं पत्रें पाठविलीं आहेत. ते सेवेसी शिवाजी विठ्ठल प्रविष्ट करितील. त्यास देशीं कमावीसदार जुने आहेत त्यांणीं मागील वाकी झाडून व साल मजकूराच्या रसदा दिल्ह्या तरी घेऊन तेच कमावीसदार ठेवून आपुलें कार्य करावें. तो प्रकार न जाला तरी नवे कमावीसदार ठेऊन रुो घ्यावे आणि सरकारची सरवरा करावी. वाकी राहील त्याच्या चिठ्या आह्मांवरी कराव्या. आम्ही येथें तर्तूद करून देऊं. मात्र दरवारचा बंदोवस्त उभय पक्षींहि चांगला करून घ्यावा. येविशई श्रीमंत राजश्री माहादजीवावाचेंहि पत्र आपणांस आहेच. येथ सर्व प्रकार स्वामीचा आहे. दुसरा अर्थ किमपिहि नाहीं. हें जाणून या सरदारीची किफायत हरयेकविशीं करावी, हें आपणांस विहित असे. वारंवार लेखन करावें ऐसें नाहीं. कितेक प्रकार राजश्री शिवाजी विठ्ठल हे विनंती करतील ते मान्य करून कर्तव्य तें करावें. सारांश उभयतां* श्रीमंतांची कृपा संपादून घेऊन सरदारीचीं वस्त्रें घ्यावीं. यांत आपला नक्ष आहे. कदाचित देशचे माहालांत ऐवजाची सरवरा न जाली तरी क्षेप-निक्षेप तुह्मीं साउकारी निशा देऊन आम्हांवरी हुंड्या कराव्या. ऐवजाची सरवरा येथें करून देऊं. कोणेहि गोष्टीचा चित्तांत याउपर दुसरा अर्थ न आणतां हें कार्य करावें. वरकड इकडील सरदारीचा प्रकार येथास्थीत जाला असे. अगोधर हजार फौज होतीच आणिक दाहावारापर्यंत फौज मागाहून आली. शिवाय पागा वगैरे मिळोन वीस हजार फोज वरोवरी आहे. त्यास नालवंदी व समजाविशींहि करोन कोटियानजीक आलों आहों. कोटेकराकडील[1] हि [illegible] आले आहेत. येथील मामलत जालियावर होळकराकडे [illegible]. [illegible] पत्रें आलीं त कीं फिरंगियांची व यांची लढाई जाली-[illegible] येऊन दाखल जालें. त्याजकडेहि त्वरेनें जावें लागतें. [illegible] आहे, तेहि आपले कृपेकडोन साधून नक्ष आपलाच [illegible]. [illegible]. [illegible] अभिमान न सोडावा यांत उत्तम असे. स्वामींनीं [illegible] याउपरीं दरबारचा बंदोवस्त जो करणें तो करून [illegible]

---

१ शिंदे या वेळीं कोट्याची मामलत [illegible] घेळीं इंग्रजासमोरून पाठीमागें सरकावें [illegible] पेशव्याच्या सरदाराचा मृत्यु कसा [illegible] करणाऱ्या गृहस्थांनीं लिहिला आहे. [illegible] दरवारांतलि मुत्सद्यांची व नारोशंकर [illegible] या व इतर पत्रांवरून स्पष्ट दिसतें. * [illegible]
गोविंदास झालेलें तर नव्हे ?

## पत्रांक १६.

इ. स. १७६५ ता. ३ जुलई. श्री. १६८७ आषाढ वद्य १

राजश्री नारोपंत नाना ( राजेबहादूर ) गोसावी यांसिः-

अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्नो माहादजी शिंदे दंडवत. विनंति उपरि येथील कुशल जाणोन स्वकीय कुशललेखन करीत असावे. विशेष तुम्हीं छ. १९ जिल्हेचे पत्र पुणियाचे मुक्कामीहून पाठविलें ते छ १० मोहरमीं नजीक मुकुंदवारी येथील मुक्कामीं पावोन लिहिला मजकूर सविस्तर कळला. 'दरवारचा बंदोवस्त वेऊन तुम्हांस वस्त्रें सत्वरींच पाठवितों चिंता न करावी' म्हणोन लिहिलें. उत्तम आहे. तुम्हीं प्रसंगीं असतां आम्हांस कोणेविशीं फिकीर आहे असें नाहीं. पूर्वी राजश्री विष्णु माहादेव[1] याचीं पत्रें आलीं. तेथें लि॥ होतें कीं 'सहा लक्ष पर्यंत नाना आम्हीं मिळोन बोलोन पल्यावरी आणिलें आहे' म्हणोन, ऐसियासि त्या पत्राचीं उत्तरें व त्यावमोजिब आपणांसहि पत्रें लिहून पा। आहेत. त्यावरून सविस्तर कळेल. माहादजी[2] गोविंद याचें वर्तमान तेथें कळल्यावरी काय मजकूर, श्रीमंताची मर्जीचा प्रकार कसा आहे, हें सविस्तर ल्याहावें. आपण दरवारचा बंदोवस्त करून सनदा व वस्त्रें पाठवावीं. श्रीमंतांपाशीं जो करारमदार तुम्हीं कराल त्याप्रमाणें ऐवज आम्ही देऊं. दरवारचा निखालस जावसाल होऊन सनदावस्त्रें आलीं म्हणजे पुढें कामाकाजास जावयासी कोणेविशीं चिंता पडणार नाहीं. याकरितां लि॥ असे रा. छ १४ मोहरम *बहुत काय लिहिणें ? लोभ असो दीजे हे विनंति.




(मोर्तब सुद)

---

## पत्रांक १७

श्री

राजश्री नारोपंत नाना गोसावी यांसिः—

अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नो सखूबाई शिंदे दंडवत विनंति उपरि येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लेखन करीत जावें. विशेष. दरवारच्या

---

* येथून हस्ताक्षर महादजीचें. १ गद्रे. २ हाच हिंदुस्थानांत मारला गेला.

बंदोबस्ताविशीं चिरंजीव राजश्री माहादजी शिंदे व राजश्री अच्युतराव व बाजी नरसिंह यांनीं आपणांस लिहिलें आहे तरी तेथील बंदोबस्त करावा. येविशीं अनमान न करावा. देशच्या माहलचे बंदोबस्ताविशीं तुम्हांस लि॥ आहे त्यास श्रीगोंदें येथील तालुका बळवंतराव गोपाळ यांजकडे आहे. तो तेथील खर्चाचे बेगमीस ठेविला आहे तरी बळवंतराव गोपाळ खरीज करून रसदेचा ऐवज सरकारचे भरण्यास घेणें. तुम्हीं तेथें आहां तुमच भरंवसियावरी बेफिकीर असो. तुह्मी श्रीमंतासी जो करारमदार कराल त्याप्रमाणें क्षेपनिक्षेप ऐवज × × × रा॥ छ २९ जिल्हेज. *बहुत काय लिहिणे ? हे विनंति.







---

## पत्रांक १८.

इ० स० १७६५ श्री. १६८७ फाल्गुन

पुरवणी राजश्री नारोपंत नाना गोसावी यांसिः—

सो॥ माहादजी सिंदे दंडवत विनंती उपरी येथील कुशल जाणोन स्वकीय लेखन करीत जावें. विशेष-राजश्री विष्णु माहादेव यांणीं लि॥ होतें ‘ कीं साहा लक्षपर्यंत बोलोन करारांत आणिलें आहे सिवाय दरबार खर्च पडेल ’ म्हणोन लिहिलें ऐसीयासि येविसीं मा॥रनिलेस लिहिलें आहे. तरी तुह्मीं व विष्णु माहादेव मिळोन करारमदार करून सनदावस्रें घ्यावीं. दुसरे पत्राचा उजूर न धरावा. क्षेपनिक्षेप विष्णुपंताकडून साहुकरी निशा करून देवावी आणि आम्हांवरी साहुकारी चिठ्या कराव्या. त्याप्रों ऐवज पावता करूं. कोणेविसीं अनमान न करितां प्रसंग संपादून सनदावस्रें घेऊन पाठवावीं. माहाल देसीं आहेत तेथील कमाविसदारांस पत्रें पाठविलीं आहेत त्याकडील ही ऐवज घ्यावा. केवळ त्या ऐवजाचे भरवसियावरी न जावें. सावेंपुढें तोंहि ऐवज येईल. परंतु प्रसंगास न चुकावें. आपण

* येथपासून हस्ताक्षर सखूबाईचें. ह्या सखुबाई जयाप्पांचें कुटुंब होत.

जो ऐवज सरकारांत देतील तो आम्ही देऊं. चिंतो विठल यांसी विष्णु माहादेव याचे विद्यमानें दाहापर्यंत बोललों होतों. हालीं तुमचे विष्णुपंताचे विचारें येईल तें करावें. * अथपर पर तुह्मीं दुसरे पत्राचा उजूर न धरनें. निशा करून सनदावत्रे घेनें. आपल्याविरहीत पहलवी[1] दुसरा प्रकार नवता व आतांहि दुसरा अर्थ नाहीं. तर कार्य करनें. बहुत काय लिा हे विनंती.

लेखन सिमा

---

## पत्रांक १९.

इ. स. १७६५ ता. २० जून श्री. १६८७ आषाढ शुद्ध २

श्रीमंत राजश्री नाना[2] स्वामीचे शेवेसीः—

पोष्य राघो राम व राघो मल्हार व बाजी नरसिंह कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति. येथील कुशल तागाइत छ १ माहे मोहरम मुकाम नजीक मुकुंदवारी येथें यथास्थित जाणोन स्वकीय कुशलोत्तर-लेखन-आज्ञा करीत असावें. यानंतर इकडील वर्तमान तरी रोज गुदस्तचीं पत्रें आहेत त्याजवरोन साकल्य अर्थ ध्यानास येईल. सरतेशेवटीं राजश्री अच्युतरावजींहीं लेखन केलें आहेच. सारांश विनंति वारंवार हेंच पत्रीं माहादजी[3] गोविंद याचें पारपत्यें व्हावयास कारण मुख्य दिवाणगिरीचे आटीमुळें हें त्याजला व्यसन[4] प्राप्त जालें. स्वामीचींहीं[5] आज्ञा होती त्याचप्रमाणें घडोन आलें. स्वामी म्हणतील कीं आम्हीं प्राणपावेतों आज्ञा केली नव्हती. त्यास आह्मीही प्रयत्न करोन मारावें हाही प्रकार नाहीं. याचा परिहार पूर्वपत्रीं साकल्य लेखन केलें आहे. अस्तु होणार कांहीं चुकत नाहीं. सारांश स्वामींनीं या गोष्टीचा साभिमान धरोन आपला पक्ष हे पुरते समजोन, सरदारीचा बंदोबस्त करून घ्यावा. यांत आपलाही नक्ष आहे. राजश्री विष्णुपंत आबांनीं पत्रें लेखन केलीं होतीं. तेथ मजकूर कीं; 'राजश्री नानानीं आह्मीं मिळोन हा उल्लेख केला. त्यास सहालक्षपर्यंत पाहिजेत.' त्यांनी[6] नित्य (?) देशांचे कमाविसदारांस ताकीद पत्रें दिल्हीं आहेत त्याजपासून ऐवज घेऊन बाकी देणें राहील त्याची निशा आपण करोन आह्मावरी चिठ्या कराव्या. येथें आम्ही सरबरा

---

* येथून हस्ताक्षर व भाषा महादजीची.

१ पहिल्यांदाही. अजून सरदारी ठरली नव्हती. २ पत्रांक ११ पहा. ३ पत्रांक ११ पहा. ४ संकट. ५ यावरून राजेबहादरांसही हा मनुष्य नकोसा झाला होता. ६ शिंद्यांनीं.

करून देऊं. फडणिसीचा[1] प्रकार तरी द्रव्येकरून जेथवर येईल तेथवर करावे. येविशीं पूर्वपत्रीं सविस्तर लेखन केलें असे. कळेल तो प्रकार करून उभयतां[2] श्रीमंतांची कृपा संपादून घेणें हें धनीपणाचें कृत्य आपल्या कडेसच आहे. आम्हीं चाकरी मात्र आपण सांगतील ते करावी. सविस्तर वर्तमान पूर्व पत्रावरून कळो येईल. सेवेशी श्रुत होय. हे विज्ञापना.

---

## पत्रांक २०.

इ० स० १७६५ ता. २ जुलै श्री. १६८७ आषाढ शुद्ध १५

पुरवणी श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे शेवेसीः—

'विज्ञापना. विशेष. 'दाहा[3] लक्ष शो आम्ही देतों या सरदारीचा वंदोवस्त करून द्यावा. त्या दस्तऐवजावरी श्रीमंताची मर्जी लोभावर[4] आहे. पैका घेत-ल्यावांचून वंदोवस्त करून देऊं नये' म्हणोन लिहिलें. ऐशास पेशजी येथील वंदोवस्ताविसीं स्वामीस वारंवार + + + आज्ञा आली (?) कीं 'जें लिहिणें तें श्रीमंत राजश्री दादासाहेब याजकडे लिहित जाणें. त्यांची कृपा जाहालियावर सर्व वंदोवस्त होईल. पेस्तर उभयतां श्रीमंत येकत्र जालियावर वंदोवस्त करून घेऊं.' याप्रमाणें आपलीं पत्रें आलीं त्यावरोन पत्रें लिहित गेलों. त्यास ते समयीं आपला नक्ष राहून शत्रूचा पराभव व्हावा. या पर्यायें दस्ताऐवज[5] (जी ?) न सांपडतां लिहिलीं असतील. परंतु ते समयीं श्रीमंताचे मर्जास न आलें. ज्या समयीं होणार त्या समयीं जाहालें. दस्ताऐवजीं हीं पत्रें म्हणावीं तर फारसी आमचीं नसतील. ते समयीं गणोजी कदम सिरोपस्थ[6] होता. त्याणें कोणाचेंही चालों दिल्हें नाहीं. *झासीचेंहि कामास त्याणेंच अपाय केला. त्याणें आह्मांस न कळतां हे हस्तऐवज लिहिले असतील. तो फारच वखेडखोर होता. त्यामुळें आम्हीं व वाजी नरसिंह व राघोवा पागे ऐसे एकत्र होऊन त्यास उख-ळून काढिला. यामुळें घरचें खूळ तुटोन हा प्रकार घडला. स्वामींचे चरणासी एकनिष्ट होतों त्याप्रमाणेंच स्वामींचे कृपेनें येश[7] आलें. ईश्वरें हें यश आपल्यास दिल्हें आहे. त्याचा शेवट स्वामींनींच येश घेऊन केला. त्या रीतीनें या सर-दारीचा वंदोवस्त क + + + मर्जी लोभावर आहे त्यास थोडक्यासाठीं मर्जी खट्टी होत असेल तर न तोडावी. आपणांस कळेल त्या रीतीनें चार पांच यावर अधिक उणें करार-मदार करून ज्या गोष्टीनें माहादजी-बावाचा या सरदारींत

---

१ फडणीस कोण ? भानु किंवा रायरीकर ? बहुधा रायरीकर असावे. २ रावसाहेब दादासाहेबांची. ३ या सरदारीबद्दल पूर्वी १० लक्षाचा नजराणा शिंद्यांनीं कबूल केला होता, असें दिसतें. ४ दहा लक्ष मिळावे हा दादासाहेबांचा हेतु. ५ या सरदारीस बाधक होईल, असें कांहीं न लिहितां. ६ कर्तेपणानें वागणारा ? ७ यश कोणतें ? घरां-तील भांडण तुटणें हें. * झाशी नारोशंकरकडून काढिली होती.

कुरूप (?) राही व आपले दिवाणगिरीचें स्वरूप राहे, या रीतीचा निर्वेधपणें बंदोबस्त करून घेतला पाहिजे. आपले आज्ञेसिवाय दुसरा अर्थ येथील नाहीं. येथील कोट्याचा दारमदार जाहालियावर उदेपुरास जाऊं. दोही संस्थानच्या खंडण्या (?) तूर्त थोडा बहुत ऐवजहि पाठवितां सरकारांत मदार[1] होईल. त्याप्रों कांहीं तूर्त व कांहीं मुदत करावी. मोरो[2] विठल यास माघारें लाविलें म्हणोन चिंतोपंतास विषाद येईल. त्यास मातुश्रीचा[3] आग्रह पाहिला. प्रथम मातुश्रीची मर्जी न राखिली. तेव्हां इतकी आग लागली. तिणें मकारनामासारिख्यास ऐसे खेळ करून बाईच्या विचारांत तो न राहिला तेव्हां सेवटीं ऐसी जरब दिली, मग आमचा विचार किती? सध्यांच मोरोपंतास ठेवावें तर खुळ तुटलें ते मागतां उभें राहातें, यामुळें तूर्त मातोश्रीच्या रंगांत मिळोन तिच्या मनोदयाप्रों मोरोपंतास जाऊं दिलें. परंतु मारनिलेसी जातेसमयीं आम्हीं त्या × × × × × × गोष्टी कित्येक बोलिलों आहों ते सविस्तर आपणांस सांगतील. त्यावरून कळेल. सारांष, चिंतोपंतांनीं आपलेविसीं निखालस असावें. राजश्री महादजी बावा व आमचें स्वरूप राहे आणि उभयतांचें नांवें खातरजमेचीं पत्रें येऊन या सरदारीचा बंदोबस्त होय ऐशा रीतीनें त्यानीं निखालसपण करावें. येविसीं स्वामी त्यासी बोलून करारमदार करितील त्याप्रमाणें आम्ही वर्तणूक करूं. परंतु त्याचेंच[4] मात्र निखालसपण जाहालें पाहिजे. गुदस्तां आह्मांजवळ वचन प्रमाण येक देत[5]. माहादाजी गोविंदास वचन येक देत. ऐसे करून आपले[6] दिवाणगिरीस व या सरदारीस त्याणीं अपाय केला. तेव्हां वचनाचीहि शाश्वतता कैसी वाटेल? यास्तव याचा पुर्ता बंदोबस्त करून घ्यावा. मग त्यासी बोलणें तें बोलावें. कळलें पाहिजे. झासी बोडसेवालियानें घेतली आहे त्यास श्रीमंत या प्रांतांत येणार असिले तर सहजांतच आपलें येणें होईल. नाहींतर आपण फौजसुद्धां यावयाचें करावें. सिंदे हाळकर एकत्र होऊन बुंदेलखंडांत छावणी होईल. आपण आलियावर, दोन्ही तिन्ही फौजा एकत्र जाहालियावर, झासीचाहि फारसा × × × कडे गेली हें उत्तमच आहे. त्या × × × × से मारिले ह्मणजे सहज किल्लाहि सुटेल. त्यास आपण आलियावर आपले प्रतापें सहजांत कार्य होईल. ऐसा प्रकार आहे. स्वामीस कळावें. वरकड सविस्तर राजश्री विष्णुपंत व धोंडोबा नाईक सांगतील त्यावरून कळेल. देसच कमाविसदारास ताकीदपत्रें येथून पाठविलीं आहेत. जो आज्ञेप्रों पैका देईल त्याजला ठेवलें जाईल. दुसरा करावा (?) तों कोटियाची मामलत जालियावर दोन लाखाची तजवीज करून हुंडिया पाठवून देतों कळों दिजे हे विज्ञापना[7].

---

१ लक्ष. २ हे चिंतो विठ्ठल रायरीकराचे बंधु. ३ सखुबाई. इच्या आग्रहावरून मोरो विठ्ठलास शिंदेशाहींतून बाहेर पडावें लागलें. ४ चिंतो विठ्ठलाचें. ५ चिंतो विठ्ठल. ६ नारो शंकरचे. ७ राघो रामचें हें पत्र.

## पत्रांक २१.

इ. स. १७६५ ता. १३ जुलै  श्री.  १६८७ आषाढ वद्य ११.

राजश्री नारोपंत नाना गोसावी यासिः—

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो माहादजी सिंदे दंडवत क्र. विनंती उपरी येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लेखन करीत गेलें पाहिजे. विशेष. इकडील वर्तमान पूर्वी दोन चार पत्रीं आपणांस लिो आहे त्यावरून कळलेंच असेल. सांप्रत मुकुंदबारीनजीक कोटें येथें मुकाम आहे. कोटेकराकडील वकील येऊन भेटले. आठा चौ रोजांत येथील मामलतीचा फडशा करून पुढेंहि हिंदुस्थान प्रांत जाणार. आपण प्रसंगीं आहेत. दरबारचा बंदोबस्त करून सनदा वस्त्रें पाठवावीं. राजश्री

श्री ज्योति स्वरूपचरणि तत्पर
जयाजीसुत जनकोजी सिंदे
निरंतर

विष्णु महादेव यांणीं लिो होतें कीं, 'साहा लक्षपर्यंत नाना आम्हीं बोलोन करारांत आणिलें आहे म्हणोन' ऐसियासी येथील वोढीचा[1] प्रकार आहे हें आपणास ठाऊक-च आहे. तशांत श्रीमंताची मर्जी रक्षून जें आपलें व विष्णुपंताचे विचारें येईल त्याप्रमाणें मान्य करून देऊन सनदावस्त्रें घेऊन विष्णुपंतास आम्हाकडे पाठवावें. जो ऐवज आपण तेथें देतील तो आम्हीं देऊं. वरकड कितेक घराऊ व + + + + वर्तमान राजश्री अच्युतराव[2] यांणीं लिहिलें आहे, त्यावरून सविस्तर कळेल. सारांश तेथील बंदोबस्त आपले हातें करून घ्यावा, येथील बहु-नाइकीचा[3] प्रकार आहे. दुईमुळें भलताच खुळ करावयासी उभा राहतो! ऐसियासी आपण दरबारचा बंदोबस्त पक्काकरून घ्यावा. सारांश आमच्या सरदारीचे स्वरूप व तुमचे दिवाणगिरीचे[4] स्वरूप राखोन येथास्थित चाले तें करावें. वरकड कितेक राजश्री मोरो कृष्ण पाठविले आहेत हें सांगतां सविस्तर कळेल. छ २४ मोहरम * बहुत काय लिहिणें? लोभ असो दीजे हे विनंति.

---

* हस्ताक्षर महादजी शिंदे यांचें.

१ पैशाची! सगळ्या पेशवाईत कधीं पैशाची ओढ संपली नाहीं. पेशव्यासुद्धां सर्व सरदार व सरंजामदार सदा ओढग्रस्त! २ हे कोण? मागच्या एका पत्रांत यांचें नांव आलें आहे. ३ पाटील बावांस ही बहुनायकी या वेळीं चांगलीच भोवली. केदारजी महादजी व सखुबाई हे तीन पक्ष होते. ४ राजेबहद्दरांस दिवाणगिरी द्यावयाची, असा करार होता.

# पत्रांक २२.

इ० स० १७६५. ता. १७ आगष्ट　　श्री.　　१६८७ भाद्रपद शु० १

श्रीमंत राजश्री　　नाना स्वामीचे सेवेसीः—

पोष्य राघोराम व राघोमल्हार व बाजी नरसिंह कृतानेक सा। नमस्कार. विनंती येथील कुशल ता। भाद्रपद शुद्ध १ मुक्काम लष्कर नजीक मुकुंदवारी जाणून स्वकीय निजानंदलेखन आज्ञा केली पो. विशेष. बहुत दिवस जाहले. परंतु पत्र पाठवून सांभाळ न जाला; तर ऐसी ममता निष्ठुरता सहसा न पो। सदोदित प्रेषित पत्रीं मोद(दा?)वासी केली पो. इकडील वर्तमान तरः कोट्याची मामलत जाली. मारवाडचीही मामलत चुकली. आतां दरकूच राजश्री मल्हारजी-बाबाकडे जात आहों. त्यास प्रस्तुत पुण्याचीं पत्रें राजश्री शिवाजी विठ्ठल यांचीं आलीं. त्यांत मजकूर कीं "राजश्री माहादाजी गोविंद याचें वर्तमान श्रवण करून श्रीमंत राजश्री दादासाहेब अद्यापवर क्रोधायमानच आहेत. ऐसें संधींत राजश्री गणोजी कदम व राजश्री अंताजी नाईक व नाना पालेकर ऐसें त्रिवर्ग राजश्री मोरोपंताचे[1] सूत्रें करून राजश्री चिंतोपंत[2] साह्यभूत करून श्रीमंत राजश्री माहादाजीबाबाचे सरदारीचे राजकारण सिद्धीस नेऊं म्हणतात. नजराण्याची ही भानगड त्याचेंच अनुमतें करून बोलत आहेत. आणि तेथें श्रीमंतापाशीं करार करीत आहेत कीं 'राजश्री माहादाजी बावास आणून भेटवितों'* म्हणून सिद्धांतयुक्त जाबसाल करीत आहेत[3]" म्हणोन अनेक प्रकारें तपशीलवार पंत-मा।रनिलेनीं लेखन केलें आहे. त्यांसीं नानासाहेब! आपण प्रसंगीं असतां व राजश्री विष्णुपंत बाबा असतां, गकारनामकानें[4] दरबारी पेष[5] होऊन स्वामीचे हातचें राजकारण असतां त्यानें यश्याचें अधिकारी होवें हें उत्तम कीं काय? आम्ही व आमचे येजमान आपले म्हणवीत असतां गकार-पूर्वकानें मधींच लबाडी येथील पत्र नसतां करावी आणि आपण सिद्धीस जाऊं द्यावी हें उत्तम नाहीं. गंकारनामक तेथें म्हणत आहे कीं 'राजश्री पाटीलबाबा आमच्या अंत्रांत[6] आहे मी त्यासी आणवून भेटवितो' ऐसें म्हणत आहे, तर स्वामी-दरबारीं[7] त्याजकडून राजश्री पाटीलबाबा आणावयाचा वायेदा करून निश्चयें हाच करावा कीं 'जर वायेद्यास आणून भेटविले तर तूं बोलतोस तें सर्व प्रमाण नाहींतर लबाड आहेस' ऐसा अपवाद आणून[8] माझी दरबारीं पुरकस[9] होये तो अर्थ योजिला पो. राजश्री पाटीलबावांनीं तर पांच सात वेळां श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामीस व राजश्री बापूस व राजश्री कृष्ण[10] रावजीस वगैरे सर्वत्रांस साफ लेहून पाठविलें स्वदुस्तरें करून कीं 'आम्हीं कांहीं गणोजीस जाबसालास पाठविलें नाहीं. मधींच

१ मोरो विठ्ठल. २ चिंतो अनंत. ३ हें शिवाजी विठ्ठलानें लिहिलें. ४ गणोजी कदम. ५ पुढें. ६ कट, पक्ष. ७ गणोजी कडून कीं गंगोबातात्यांकडून? ८ गणोजीस खोटा करून. ९ पुरस्कार. १० काळे बारामतीकर.

* हे वरील त्रिवर्गाचें बोलणें.

लबाडी आपला जीव वाचवावयासी फितूर करीत आहे. तर गणोजीस उत्तम प्रकारें शिक्ष्या करून काढून देणें ऐसें निक्षूनतेनें पत्रीं विस्तारयुक्त लि॥ आहे.' यास अंतर सहसा नाहीं. आपणांस त्यापत्राबरोबर हा मजकूर लिहिलाच असे. येथील आमच्या येजमानाचा कायावाचें-करून गणोजीकडे किंचित्‌ही अंत्र नाहीं, ऐसें असोन तेथें लवाडीनें जावसाल करितो आणि आपण प्रसंगीं असतां, त्यांसी हरएक जावसालीं पेचून[1] माकूल करीत नाहींत हें अपूर्व आहे! आह्मी तर आपले दिवाणगिरीकरितां इतका बखेडा करून खूळ दूर केलें. ऐसें असतां आपण चित्त या कामांत घालीत नाहींत आणि जैसें गणोजी बोलतो तैसेंच उगेंच श्रवण करितां, हें काय मर्जीस आपलें आहे हें न कळे. सरकारच्या नजराण्याकारितां वगैरे दूर-अंदेशा ध्यानास आणीत असलात तर आपण व राजश्री विष्णुपंत-बाबा जो दरबारीं सरदारीच्या बंदोबस्ताकारितां नजराणा व दरबार-खर्च वगैरे जो कबूल कराल तो आम्हांस कबूल असे. यासी अनेथा सहसा न जाणावी. जे समयीं आपण तेथील निश्वांत (निश्चयांत) डौल आणून लिहितील तेच समयीं पत्रदर्शनीं पांच लक्ष रुपये रोकडी स्वामीपाशीं पोंहचावितों. मुख्य आपल्या पत्राची मात्र प्रतीक्षा आहे. नाना! शर्त हेंच कीं गणोजीनें उपमर्द करून राजकारण ओढून न्यावें आणि आपल्या हातचा अर्थ त्यानें साधावा! मंग काय? रुपयासी अगे मागें न पाहतां जैसा जैसा डौल दिसेल तैसा तैसा साधून आपल्याच हातें सरदारीचा बंदोबस्त होय तो अर्थ साधिला पो. परंतु हा समय रक्षिल्यानें बहुत उपयोगीं आहे. मुख्य दाय दुसारियास येश घेऊं न द्यावें. आपण तपोनिधी आहेत. आपल्या तेज्यापुढें शूद्राचें सामर्थ्य किती? चित्तावर धरल्यास हल(कें?)च असे. आम्ही तर आपल्या भरंवसियावर हरएक प्रकारें निश्चित आहों. श्रीमंत राजश्री रावसाहेबांपाशीं व राजश्री बापूपाशीं भीड खर्चून आपल्या हातें सरदारीचा बंदोबस्त करून घेतला पो. वरकड वर्तमान श्रीमंत राजश्री पाटीलबावाच्या पत्रावरून निवेदन होईल. कितेक अर्थ राजश्री शिवाजी विठ्ठलाच्या पत्रावरून श्रवणगोचर होतील. वरचेवर पत्रीं स्वानंदविलें पो. असेंहि करितां तेथील मर्जी पूर्णत्वेंकरून ऐसीच असली कीं विना पाटील-बावा भेटल्यावांचून बंदोबस्त होत नाही ऐसेंच निःकपटेंकरूनच असलें तर श्रीमंत राजश्री पाटिलसाहेबांस पंचवीस हजार फौजेनसीं आपले आज्ञेनुरूप घेऊन येऊं. परंतु गकारनामकाचे हातें तेथील अनुसंधान तुटे ते कीजे. येथील आमचे फौजेचें वर्तमान तर देशीं सर्वत्राचे घरोघर आह्मा पाशील लोकांच्या चवक्या पाठविल्या आणि 'छंद (फंद?) करितात, कबिले धरितात' ह्मणोन येथें वर्तमानेंहि आलीं आहेत. परंतु सर्वत्रांनीं सर्व आशा सोडून श्रीमंत राजश्री माहादजी-बावांच्या जीवांचे सोवती जाले आहेत. एकदिल सर्व आहे. भावार्थ कीं श्रीमंत राजश्री

१ फजीत करून पुरा नाहींसा कां करित नाहीं?

पेशव्यांचे पायांशीं एकनिष्ठेनें राहून, वडिलांवडिलीं सेवाचाकरी करून, स्वामीचे सेवेवर देहहि समर्पण केले, ऐशीच धारणा धरून आहेत. सेवेशीं श्रुत होय. या लोकीं कीर्ति मेळवावी. मागेंहि मेळविली आतांहि त्याप्रमाणें करावी. या उपरि मर्जी नकारनामकावर असली तर सेवक लोकांस तैसी आज्ञा करावी. दिशी ( देशीं ? ) तों जागा नाहीं. मग जिकडे ईश्वर जागा राहावयास देईल तिकडे जाऊं. मग स्वामीच्या मरजीस येईल तें करावें. आम्ही तों स्वामीचे म्हणवितों. परंतु स्वामीच्या मरजीं न आलें! वरें होणार तें सुखेंनेव हो. या उपरि स्वामींनीं अंतःकरणापासून जें असेल तें सेवकास आज्ञा करावी. हें निदान जाणोन सेवेशीं विनंतिपत्रें लिहिलीं आहेत. बहुत काय लिहिणें ? कृपा लोभ असो दीजे हे विज्ञप्ति.

## पत्रांक २३.

इ० स० १७६५ ता० ३० आगष्ट. श्री. १६८७ भाद्रपद शुद्ध १५

राजश्री नारोपंत नाना गोसावी यांसिः—

अखंडितलक्ष्मी अलंकृत राजमान्य स्ने॥ माहादजी शिंदे दंडवत. विनंति उपरि. येथील कुशल ता॥ छ १२ रावल मुकाम नजीक वकाणे पा॥ हांडोती जाणोन स्वकीय कुशल लेखन करीत असिले पाहिजे. विशेष. सांप्रत आपणाकडून पत्र येऊन वर्तमान कळत नाहीं. तरी सविस्तर लेखन करावें. यानंतर दरबारचे वंदोवस्ताविशीं पेशजी पांच सात पत्रें तुम्हांस पाठविलीं. त्यांस तुम्हीं एक दोन पत्रें पा. तेथें लि॥ कीं 'आम्हीं सर्व वंदोवस्त करून घेतों. आपण कोणेविशीं चिंता न करावी' म्हणोन ऐसियासि आम्हीं तों आपल्या लक्षावरी वेफिकीर आहों. तुम्हांखेरीज दुसऱ्यासी बोलणेयाचा प्रकार किमपि नाहीं. असें असोन अद्यापि आपणाकडून कांहींच वंदोवस्ताचा प्रकार दिसोन येत नाहीं, अथवा पत्रहि येऊन वर्तमान कळत नाहीं. यावरून अपूर्व आहे. या उपरि तरी वंदोवस्ताचा विचार काय केला हें सविस्तर ल्याहावें. आपण जे करतील ते आम्हांस मान्य असे. आपले मनोदयानरूप वंदोवस्त होऊन चार रुपयेचे वरी जावसाल ठरला तरी आपण मान्य करून लेहून पाठवावें. तूर्त पांच लक्ष पावेतों हुंड्या आपणाकडे पाठवून देऊं. भरंवसा आपला असे. गणोजी कदम तेथें कितेकप्रकारें घालमेल करीत आहेत. तुम्हांसहि भलतेंच समजावितील. तर आपण त्याचे

(मुद्रा:) ० ॥ श्री ज्योति स्वरूपचरणि तत्पर जयाजीसुत जनकोजी सिंदे निरंतर

१ या पत्रावरून शिंद्यांची आतुरता, कदमांचे पेंच इत्यादि कळतात. सैन्यांतील लोक फितुर झाले त्यांनीं वंड केलें, किंवा शत्रुकडे उठून गेले, तर स्वदेशांतील म्हणजे महाराष्ट्रांतील त्यांच्या मुलांमाणसांस पेशवेसरकार चौकीपाहऱ्यांत ठेवीत व त्यांची वतनें जप्त करीत त्या पद्धतीचाही या पत्रांत उल्लेख आहे.

मनास न आणावें. जें करणें तें आपले विचारें करावें. ते आम्हांस मान्य असे. वरकड कितेक राजश्री बाजी नरसिंह यांचे पत्रावरून कळेल. बहुत काय लिा ? हे विनंति.

मोर्तब सुद

---

## पत्रांक २४.

१७६५ ता० ६ सप्तंबर. श्रीशंकरवरद. १६८७ [illegible]

श्रीमत् राजश्री नाना स्वामींचे शेवेसीः—

पो चिंतो विठ्ठल व चिंतो अनंत सा। नमस्कार विनंति. येथील कुशल ता। छ १९ रबिलोवल जाणून स्वकीय कुशल लेखन करीत असिले पाहिजे. विशेष-आपणांस श्रीमंतांनीं[1] इमान दिल्हें व पत्र आपले पर्वत-विषई[2] ( [illegible] ) सरकारांत होतें तें माघारें दिल्हें. त्यास आपणासी बोलणें तें श्रीमंत [illegible]. [illegible] श्रीमंतांनीं इमानपुरसर कृपा आपल्यावरी-करावी याविषई [illegible] वचन द्यावें, त्यास आपण श्रीमंतांचें सेवेंत पूर्वीपासून [illegible]. [illegible] श्रीमंतांनीं जें कृपा करून इमान दिल्हें, व वचन दिल्हें [illegible] आम्हीं श्रीमंतास विनंती करून वचन चालवावें. येविसीं आम्हां[illegible] नाहीं. आपण दुसरा प्रकार व कोणीकडीलहि संदेह चित्तांत न [illegible] करावें. बहुत काय लिहिणें ? लोभ करावा हे विनंति.[3]

राजश्री विष्णु महादेव याजवळ, ठेऊन नाशकास गेला. माघें श्रीमंतांनीं नवें मुद्दे घातलें कीं, '(१) दोन लक्षाचा सरंजाम सरंजामांतून द्यावा, व (२) सरदारास एकटे भेटीस आणावें,' ऐसीयासि त्याजकडे एकही निश्चय जाहला नव्हता. जावसाल मात्र उभयपक्षीं श्रीमंत करीत असतां तुम्हांकडे याज शिवाय नवा मुद्दा आणिक घातला कीं 'सरंजाम शिंद्यांनीं तुम्हांस[१] दिल्हा तो देखील सरकारांत द्यावा. व तीन लक्ष त्याजहून शिवाय माहादाजी गोविंद मृत्य पावले यामुळें द्यावे' म्हणोन. ऐसियासि प्रस्तुत गणोजी कदम (व) गोविंदराव याकडून जावसाल होईनासा पाहून विष्णु माहादेव याचें मायेंत शिरोन-श्रीमंताचे आज्ञेनरूप विष्णुपंत व अंताजीपंताकडून कबूल करवितात, म्हणोन वर्तमान ऐकिलें. त्यास त्या लबाडाच्या म्हटल्यानें सरंजाम कोण देतो? पूर्वीपासून तुमच्या सल्याप्रमाणें पैकामात्र द्यावा. बनला तर माघे सरंजाम श्रीमंतांनीं घेतला तो हस्तगत करावा. तेव्हां पुढें सरंजाम कसा देवतो? आपण विचाराचे मार्गें पाहावें. गणोजी कदम यासी सहसा आपण या जावसालांत न घ्यावें. दरबारीं याचें पारपत्य यथास्तित होय तें करावें. दुसरें जें कोणी ऐसीं कर्में दरबारीं करूं न पावें तें करावें आणि सरंजामाचा जावसाल कबूल न करावा. दरबारचा रंग पाहून पैका मात्र कबूल कराल तो आह्मास मान्य असे. **गणोजी कदम या खेरीज** जो जावसाल तुह्मी कराल तो आम्हास मान्य होईल. पत्राचें उत्तर सत्वर पाठवावें. रा. छ २ रबिलाखर *बहुत काय लिा लोभ असो दिजे हे विनंती. (पौ) छ २७ माहे रबिलाखर सन सीत सितैन मुा नाशिक.







---

## पत्रांक २६.

इ. स. १७६५ ता. २३ नोव्हेंबर. श्री. १६८७ मार्गशीर्ष शुद्ध ११

पुरवणी राजश्री नारोपंत[२] गोसावी यासिः—

विनंती उपरी. 'सरकारांत ऐवज द्यावयाचा करार जाहला,' त्याची तजवीज

---

* येथून हस्ताक्षर महादजीचें.

१ राजेबहाद्दरास. २ नारोशंकरास शिंद्यांचें पुरवणीपत्र. सरदारी ठरत आली. आतां ही नजराणा देण्याघेण्याची तयारी.

करून उजनीस ऐवज जमा करावा' म्हणोन लिहिलें ऐसियासी येथील वोढीचा प्रकार तुम्हास दखलच आहे. परंतु तुह्मी मान्य केलें तें आम्हींहि कबूल केलें. तुमच्या लिहिल्यावरून तूर्त हप्तीयापैकीं कांहीं ऐवजाची तर्तूद येथून करून पाठवून देतों. संशय न धरावा. फडनिसी वगैरे कितेक मजकूर लिहिला आहे त्याचा बंदोबस्त करून घ्यावा. ऐवज पाठवून देऊं. रा छ ९ जमादिलाखर हे विनंती.

मोर्तब सुद

---

## पत्रांक २७.

इ० स० १७६६ फेब्रुवारी, मार्च श्री. १६८७ फाल्गुन

पुरवणी[1] राजश्री नारोपंत नाना गोसावी यांसि—

दंडवत विनंती उपरी. तुह्मी ऐवजाची काळजी न करावी. सर्व संशय दूर करून कोठें न गुंतता मजल दर मजल सत्वर येऊन पोहोचावें. भेटीनंतर सर्व खुलासे परस्परें कळोन सर्व गोष्टी मनोदयानरूप होऊन येतील. आपलें आमचें *पूर्वी वचन-प्रमाण जालें त्या अन्वयावर व येथून वरचेवरी आपणास लिहीत गेलों* त्यावरून आपण चार रुा कबूल करून सरदारीचा बंदोबस्त केला, ऐसें असतां हाली (हल्लीं) तुम्हासीं दुसरा प्रकार करूं हें आपल्यातरी चित्तांत येते कीं काय? असो. अतःपर काडीमात्र द्वइतार्थ न धरितां जलद येणें व्हावें. वरकड येथील कितेक अर्थ राजश्री विश्वासरावजीस सांगितले आहेत. त्यांचे लिहिल्यावरून कळेल. आमचें* व आपलें पूर्वी वचन आहे तेंच जानावें. द्वयतार्थ किमपीही न मानावा. आमचे पक्षास किमपीही अंतर होणार नाहीं. हाच निचय जानावा. आनि सत्वर यावें. भेटीअंतीं-सर्व उत्तम तेंच होईल. वहुत काय लिहिणें हे विनंती.

मोर्तब सुद.

---

* येथून हस्ताक्षर व भाषा महादजीची.

१ सरदारी ठरली.

## पत्रांक २८.

इ० स० १७६६ ता. २४ आगष्ट श्री. श्रावण वद्य ५ शके १६८८

राजश्री केदारजी शिंदे गोसावी यांसिः—

सकलगुणालंकरणअखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्नो रघुनाथ[1] बाजीराव आशीर्वाद. उपरि येथील कुशल जाणून स्वकीय लिहित जाणें. विशेष. राजश्री मोरो[2] विठ्ठल यासी तुह्मांकडील मुलकी व फौजदारी कुलदौलाची फडणिशी पेशजी प्रमाणें करार केली असे. तर याचे हातून कुलदौलाचे फडणिशींचें कामकाज घेत जाणें. जाणिजे छ १७ रविलाखर सु॥ सबा सितैन मया व अलफ *बहुत काय लिहिणें? हे आशिर्वाद.

लेखनावधि

स्कं ज ला न स्य मु
द्रे य म प रा जि ता बा जी
रा य त नू ज स्य र घु
ना थ स्य रा ज तां

बार

---

## पत्रांक २९.

१७६६ ता. १७ आक्टोंबर श्री. १६८८ आश्विन शुद्ध १४

असल बा। नकल

वेदशास्त्र–संपन्न राजश्री मोर–जोशी बीन विठ्ठल जोशी राईरकर गोत्र अत्री, सूत्र आश्व–लायन, वास्तव्य मौजे उरवडें ता। मुठे-खोरें, गोसावी यांसि स्नो सखुबाई[3] शिंदी दंडवत सु॥ सबासितैन मया व अलफ. तुम्हीं को। श्रीगोंदे येथील मुकामीं येऊन विदित केलें कीं 'आपण कुटुंब वत्छल, स्नानसंध्यादिक शट्कर्में आचरोन राज्यास अभीष्ट चिंतन करीत आहों. तरी कृपाळू होऊन योगक्षेम चाल-विला पाहिजे' म्हणोन त्याजवरून मनास आणितां तुम्हीं थोर ब्राह्मण, सत्पात्र, स्नानसंध्यादिक शट्कर्में आचरोन राज्यास अभीष्ट चिंतन करितां, हे जाणोन (व) तुमचे चालविल्यास श्रेयस्कर जाणोन तुम्हांवरी कृपाळू होऊन नूतन इनामी गांव पैकीं

---

* येथून हस्ताक्षर रघुनाथ बाजीराव यांचें खुद्द.

१ दादासाहेब हिंदुस्थांत. गोहदची स्वारी घाटत आहे. २ तात्या रायरीकरांचे बंधु. यांचें व जनकोजी शिंद्याच्या आईचें बनलें नाहीं, म्हणून यांस शिंद्यांनीं गतवर्षी दक्षिणेंत परत लाविलें होतें. ३ जनकोजी शिंद्याची आई.

१ मौजे भुसावळ ता। साकेगांव प्रो एदलाबाद प्रां खानदेश येथील तनखा टके ४२०० पैकीं खेरीज मोकासा करून, दरोबस्त अमल रुपये

१ मौजे चोपडगांव पो शेवगांव सरकार अमदानगर एथील तनखा १९८६ रुपये खेरीज मोकासा, बाबती, सरदेशमुख करून, दरोबस्त बाकी जाहागिरीचा अमल मोगलाई.

शिक्का

२

एा दोन गावचा अम्मल जलतरु-काष्ट-पाशाण-निधीनिक्षेप आम्ही (अमल?) करून हाली-पट्टी व पेस्तरपट्टी सुद्धां इनाम[१] करार करून दिल्हा असे. तरी तुम्ही व तुमचे पुत्र-पौत्रादी वंशपरंपरेनें गावचा अम्मल अनुभवून सुखरूप राहाणें. जाणिजे छ १२ माहे जमादिलावल हे विनंति मोर्तब असे

बार

## पत्रांक ३०.

इ० स० १७६६ ता. १७ नोव्हेंबर श्री. कार्तिक वद्य १ शके १६८८

श्री ज्योतिस्वरूपचरणि तत्पर जयाजीसुत जनकोजी सिंदे निरंतर

राजश्री त्रिंबकराव चिंतामण व माधवराव व सदाशिव कमाविसदार पा। खाचरोद वगैरे माहाल गोसावी यांसिः—

अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्ने॥ जनकोजी[२] शिंदे (?) दंडवत सु॥ सबा सितैन मया व अलफ. पो रतलाम येथील मजमू सालमकुजरापासून राजश्री बापूजी गोपाळ यांस सांगून तैनात सालिना रु॥

५०० जातीस रु॥
१२५ अपतागिरा व मसालची (मशालजी) मिळोन सालिना रु॥

६२५

१ रायरीकरांच्या कामगिरीप्रीत्यर्थ हें इनाम. २ हा तोतया तर नव्हे?

एकूण सवा सात रुपये तैनात सालिना शागीर्दपेशा व जातीस निव्वळ करार केली असे तरी तुम्ही परगणे मजकुरचे नजनूचे काम करारसिलेल्या हातें वेतन सदर्हूप्रमाणें वेतन सालिना पावीत जाणें. जाणिजे छ १४ माहे जमादिलाखर बहुत काय लिहिणें हे विनंति.




बार

---

## पत्रांक ३१.*

१७६७ ता. ९ जान्युआरी श्री. १६८८ पौष शुद्ध १०

राजश्री चिंतोपंत तात्या गोसावी यांसि:—

अखंडितलक्ष्मी-अलंकृत राजमान्य स्नो॥ महादजी शिंदे दंडवत-विनंति उपरि. येथील क्षेम ता॥ छ ८ साबान पर्यों( यंत ) वर्तमान यथास्थित असे. येथील वर्तमान तर बाळाजीपंत लि॥ यांजवरून कळेल. आमचें वर्तमान तर पूर्वी सांध्यावें[1] मुकामी जें जालें तें श्रुतेंत आलेंच असेल. विशेष लिहावें ऐसें नाहीं. तुमचें आमचें बोलणें × × × तें करारच आहे. गुंता नसे. बहुत काय लिहिणें : हे विनंति.

---

## पत्रांक ३२.

इ. स. १७६७ ता. ५ जून श्री. १६८९ ज्येष्ठ शुद्ध ८

राजश्री चिंतोपंत तात्या गोसावी यांसि:—

अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नो॥ केदारजी[2] शिंदे दंडवत विनंति उपरी येथील कुशल जाणून स्वकीय लिहित जाणें. विशेष तुम्हांकडे मालबंदी बा॥ ऐवज देणें रुपये २५००० पैकीं खावरोदची वरात पावली नाहीं[3] (?) रुपये ५००० बाकी वीस हजार देणें त्या पैकीं रुपये

---

* सर्व पत्रें महादजी शिंद्याचे हातचें.

१ या वेळीं दादासाहेब उत्तर हिंदुस्थानांत होते. यांच्याकर बरोबरच होते.

२ केदारजीच्या नांवानें सरदारी झाली. ३ वरात न पावल्यानें कारण हा मजकूर तोतयानें निंबराव किंवा [illegible] दिला म्हणून की काय?

४००० खा घोडे तुम्हांकडून घेतले त्यांची किंमत

२००० राजश्री पाटिलबावाकडे

२००० राजश्री केदारजी सिंदे यांजकडे

---

४०००

८००० सिलेदार यांची सालगुदस्ता चाकरी केली गागरे व मावळे मिळोन आा ५० चाकरीस होते त्यांस पांवलें नाहीं.

५००० नालबंदी

३००० रोजमरे खर्चास

---

८०००

४००० उसनवारी घेतले तुम्हांकडून

---

१६०००

श्री

श्री ज्योतिस्वरूपचरणि

तत्पर तुकोजीसुतं केदारजी

सिंदे निरंतर

सोळा हजार बाकी रुपये ४००० च्यार हजार रुपये राहिले ते राजश्री विष्णु महादेव यांस रद्दकर्जी पाविले. तरी पावते करून कबज घेणें. रा छ ८ मोहरम हे विा

मोर्तब सुदे

दिल्हे होते त्यास सदरहू ऐवजाचा भरणा तुह्मीं आपले विद्यमानें करून दिल्हा ऐवज वि-तपशील रुा

४२०० खरीदी घोडे रास २ एकूण किंमत रुपये

२२०० पाटिलबाबाकडे

२००० खाशाकडे

———

४२००

२५०० पागेच्या खर्चास ऐवज तसलमात

११४६ अवचितराव गणेश यांस वस्त्रें दिलीं ते दिवशीं सडे स्वारीनिशी श्रीमंताकडे आलों सबब खर्चास रोख रुपये

१५००० सदाशिव केशव यांजकडील शिलेदार चाकरीस आले त्याज बाबत रुपये

८००० नालबंदी

३००० रोजमरे

४००० रवानगी समजवीस

———

१५००० मिळोन रुपये

२१५४ खाजगीखर्चास खाशाकडे रोख रुपये

———

२५०००

श्री जोतिस्वरूप चरणि तत्पर तुकोजीसुत केदारजी सिंदे निरंतर

एकूण पंच्यवीस हजार रुपये ऐवज तसलमात नालबंदी बाबत ऐवज येणे होता तो ऐवज सदरहू प्रों भरणाकरून दिल्हा त्याजप्रों ऐवज जमा असे. याज उपरी नालबंदीच्या ऐवजाचा गुंता नाहीं. रा छ ८ मोहरम सुहुरसन समान सितैन मया व अलफ बहुत काय लिहिणें हें विनंति

मार्तब सुद

बार

———

१ अष्टमीस ४००० येणें काढिलें त्याचा नवमीस भरणा झाला! ह्या हिशेबांत

[ पुढें चाल ]

## पत्रांक ३४.

इ० स० १७६७. ता. ९ जून                श्री.                १६८९ जेष्ठ शु० १२

अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य राजश्री चिंतो विठ्ठल गोसावी यांसिः— सेवक रघुनाथ बाजीराव नमस्कार सु॥ समान सितैन मया व अलफ शिंद्यांचे डौलाची फडणीसी देखील मुतालकीची, पेशजी सांगितली आहेच ते वक्षीस तुम्हांस दिल्ही असे. एक-निष्ठेनें सेवा करणें *जाणिजे छ ११ मोहरम बहुत काय लिहिणें.

लेखनावधि

---

## पत्रांक ३५.

इ० स० १७६७ ता. ३ जुलई                श्री.                १६८९ आषाढ शुद्ध ७

राजश्री भिवजी सिवदेव कमाविसदार प्र॥ येदलाबाद गोसावी यांसिः—

---

घोड्यांबद्दल २०० अधिक ३३०० खासगतखर्च, २५०० तसलमात, एकूण ६००० ची बेरीज केली आहे. २५००० देणें होतें. त्यांत ४००० घोडे व १५००० चाकरांबद्दल व वरील ६००० मिळून २५००० जमविले आहेत. मला बळकट संशय आहे कीं सवसाहेबांच्या हिशेबी तपासणीसाठीं हा पोकळ जमाखर्च केला असावा. २५००० सरदारीप्रीत्यर्थ रायरीकरांस मिळाले असें दिसतें. :तसलमात म्हणजे अमानत. ज्या रकमेचा कच्चा जमाखर्च कीर्दीवर लिहितां येत नाहीं, कारण कोणत्या खातीं खर्च होणार किंवा झाला असतो, हें ठाऊक नसते, त्या रकमा तसलमात खातीं असतात. नालबंदी ही स्वारांस मोहिमेच्या अगोदर देत. नालबंदी घेतली म्हणजे चाकरी करावयाचें ठरलें. स्वारीहून आल्यावर सर्व हिशेब होऊन देणें निघेल त्यापैकीं कांहीं रकम रोख व कांहीं कापड म्हणून देत, त्यास समजावीस म्हणतात. रोजमुरा हा शब्द प्रसिद्धच आहे.

१ दादासाहेब हिंदुस्थानांतच मार्चपर्यंत होते. पुढे माघारे फिरले.

* हस्ताक्षर खाशांचें

अखंडित-लक्ष्मीअलंकृत-राजमान्य स्ने॥ सखुबाई सिंदे दंडवत सु॥ समान सितैन मया व अलफ रामचंद्र हरी याची मुजमूची असामी परगणेमजकुरीं होती ते दूर करून हाली सनमजकुरा-पासोन शामराज हरी याजकडे सांगितली असे. यासी वेतन सालिना रुपये ५०० पांचसे नेमून दिल्हे आहेत. मशारनिलेच्या हातें मजमूचें काम-काज घेऊन सदरहू पांचसे रुपये साल दरसाल परगणेमजकूरचे ऐवजीं पावते करणें परगणेमजकूरच्या ऐवजीं पावते करून स्वामी-सेवा घेणें. जाणिजे छ ६ सफर बहुत काय लिहिणें हे विनंति.







बार

## पत्रांक २६.

इ. स. १७६७ ता. ६ जुलई. श्री. १६८९ आषाढ शुद्ध १०

छ मो अनाम देशमुख व देशपांडे पा सिंदखेड यांसिः—

केदारजी सिंदे सु॥ समान सीतैन मया व अलफ. पा॥मजकूरचा अंमल पेशजीचे कमाविसदाराकडून दूर करून साल मजकुरापासून राजश्री ... ... याजकडे कमाविस सांगितली असे. तरी तुम्हीं मा॥रनिलेसी रुजु होऊन अंमल सुरळीतपणें हरएकविसीं दिकत न करणें.




जाणिजे छ ९ सफर मोर्तब सुद




बार

१ सखुबाई ही जनकोजीच्या नांवावर सनदा देतच होती. २ ही कमाविस रायरीकरांकडे आली असली पाहिजे. नांवाची जागा कोरी टाकिली आहे खरी, पण पत्र रायरीकरांच्या संग्रहांतील आहे म्हणून त्यांच्याचकडे कमावीस असावी.

## पत्रांक ३७.

इ. स. १७६७ ता. ६ जुलई. श्री. १६८९ आषाढ शु० १०

राजश्री————————————————

————————————————

अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्ने॥ केदारजी सिंदे दंडवत सु॥ समान सितैन मया व अलफ प॥ शिंदखेड येथील अम्मल तुम्हां-कडून दूर करून साल-मजकूरा-पासून राजश्री————————————याजकडे सांगितली असे तरी तुम्हीं दिलगिरी (दखलगिरी ?) न करणें. मारनिले अम्मल करतील. प॥ मजकूरची ठाणीं असतील तीं यांचें स्वाधीन करून कवज घेणें. जाणिजे छ ९ सफर वहुत काय लिहिणें हे विनंति.

मोर्तब सुद

॥
श्री जोतिस्वरूपचराणि
तत्पर तुकोजीसुत केदारजी शिंदे
निरंतर

बार

## पत्रांक ३८.

इ० स० १७६७ ता० ६ जुलई. श्री. १६८९ आषाढ शुद्ध १०

राजश्री————————————————कादार

पा॥ सिंदखेड गोसावी यांसि

अखंडितलक्ष्मी अलंकृत राजमान्य स्ने॥ केदारजी सिंदे दंडवत सु॥ समान सितैन मया व अलफ पा॥ मजकूर एथील अम्मल पेशजीचे कमाविसदाराकडून दूर करून सालमजकुरापासून तुम्हांकडे मामलत सांगोन *रसद करार २२००० वावीस हजार करार केले असेत. तरी हाली अम्मल वसलिया-वरी भरणा करून कवज घेणें. या सों

॥
श्री जोतिस्वरूपचराणि
तत्पर तुकोजीसुत केदाराजि शिंदे
निरंतर

मामलत संवंध कलमें

| | |
|---|---|
| रसदेचा ऐवज फिटे तोपर्यंत मामलत काढूं नये. कलम १ | व्याज येकोत्रा सिरस्ते प्रों मजुरा पडेल १ |

---

१ तार्कीद पत्र. पत्र ३६ पहा.

* रसद म्हणजे प्रांताची किंवा तालुक्याची जी जमा व्हावयाची, असें सरकारी 'अजमासा' वरून ठरलें असेल, ती वर्षारंभीं कर्ज म्हणून व्याजी रक्कम घेत व ह्या कमेस 'रसद' म्हणत. ही कर्जफेड वसुलांतून होई.

आर्फ फितूर मुलूख सिरस्ते
प्रो मजुरा पडेल कलम १

सिबंदी मैहालमार पेशजी
प्रो मजुरा पडेल कलम १

येणेप्रो चार कलमें करार केलें असे तरी इमानेंइतबारें मामलत करून कचा हिशेब समजावित जाणें. जाणिजे. छ ९ सफर बहुत काय लिहिणें हे विनंति.

मोर्तब सुद

बार

## पत्रांक ३९.

इ. स. १७६७ ता. ८ जुलई. श्री. आषाढ शुद्ध १२ शके १६८९

राजश्री चिंतोपंत तात्या गोसावी यांसिः—

अखंडित-लक्ष्मी-अलंकृत-राजमान्य स्नो माहादजी सिंदे दंडवत. विनंति उपरी. एथील कुशल जाणून स्वकीय लिहित जाणें. विशेष. अलीकडे आपणाकडून पत्र एऊन वर्तमान कळत नाहीं त्यास सविस्तर अर्थ लिहित जाणे. श्रीमंत रावसाहेब देशास आले. त्यांची आपली भेट जाहाली असल्यास सविस्तर वर्तमान लिहून पाठवावें. येथील वर्तमान तपसीलवार कारभाराचें वगैरे राजश्री बाळाजीपंत यांनीं आपणास लिहिलें आहे त्याजवरून कळेल. सारांष जातेसमयीं आपण आह्मांस सांगितलें कीं वरीसभरपर्यंत स्वहितें किंवा अनहित मनास न आणावें त्याजप्रों आपले वचनाचें दृढतर धरून त्याअन्वय आहों. दुसरा मजकूर मातुश्रीबाईकडून पत्रें आलीं. त्यांत मजकूर कीं 'घरीं पंचवीस हजार रुपये खर्च काढून भक्षिले. त्यास कर्जदार ऐवजाची निकड करितात याची तरतूद करून पाठवावें म्हणोन' त्यास आह्मापाशीं ऐवज आहे किंवा नाहीं आणि येथें तरतूद होती अथवा नाहीं, हा अर्थ सर्व आपणास ठावकाच आहे. याजकरितां हें आपणास लिहिलें आहे. तरी आपण पंचवीस हजार रुपये कर्ज मातुश्रीस देवावें. आह्मीं व्याजासुद्धां ऐवज सांगाल तेथें पावते करूं. मुख्य आपणास लिहिल्यावरून ऐवज पावेल हा भरंवसा जाणून लिहिलें आहे; तरी लिहिल्याप्रों कार्य करून उत्तर पाठवावें. वरकड सर्व गोष्टी आपण बोलले आहेत त्याजवरी कायम आहोंत कळावें. रा छ ११ सफर *मातुश्रीस राहाण्यास जागा पेडगांव द्यावें म्हणून करार होता. परंतु अद्यापीवर ते काम जालें कीं न जालें हें लिा नाहीं. तर कार्य करून द्यावें म्हनजे कोंडथाहून तेथें राहतील. याजकारितां लिा आहे तर हें काम करून द्यावें. परस्थळीं बहुत दिवस राहावें हें विहित न (नै?). बहुत काय लिा हे विनंति.

---

१ दुष्काळ लढाई झाली तर. २ महालाच्या संरक्षणास लागणारी शिबंदी. ३ नफा तोटा न बघतां कारभार करावा. ४ चिमाबाई मातुश्रीस रोजखर्चास देण्याला महादजी शिंद्यास २५००० कर्ज काढावें लागलें!

## पत्रांक ३९ अ.

इ० स० १७६७ ता. १९ सप्तंवर   **श्री.**   शके १६८९ भाद्रपद वद्य १२

श्रीमंत् राजश्री चिंतोपंत तात्या स्वामीचे सेवेसीः—

विनंति सेवक विठ्ठल केशोराव वुरटे सां। नमस्कार विनंति उपर श्रीमंत मातुश्री चिमावाई शिंदे यांस खासगत खर्चास श्रीमंत राजश्री माधवराव शिंदे[1] यांनीं आपणांकडून देविले रुपये पंचंवीस हजार पैकीं तूर्त स्वामीनीं दिल्हे रुपये १०००० दहा हजार रोख आपण भरून पावलों. छ २४ माहे रविलाखर मित्ती भाद्रपद वद्य १२ द्वादशी शनवार.

हा
ॐ

साक्ष्य
खंडाप्पा चिखले.

---

## पत्रांक ४०

१७६७ ता. २४ जुलई   **श्रीशंकर.**   १६८९ आषाढ वद्य १४

यादी नि॥ चिंतो विठ्ठल सिंदे यांच्या फडणिसि संवंधें तुह्मां कडेस *तफावतीचीं कलमें लिहून आलीं होतीं त्यांची चौकैशी करतां तुह्मांकडेस तफावत लागली नाहीं. सर्व प्रकारें खातर-जमा राखणें. येक-निष्ट शेवा करणें. येणेंप्रो करार.

छ २७ सफर सन समान सितैन आषाढ मास.

---

## पत्रांक ४१.

इ. स. १७६७ ता. २४ जुलै   **श्री.**   आषाढ वद्य १४. शके १६८९

यादी शिंद्याकडील सरदारी पैकीं गाव वि॥ मोरो विठ्ठल सु॥ सवा सितैन मया व अलफ गांवचा आकार   रुपये

अजमास लेहून दिल्हा आहे हाली कारकून बोलऊन आणून चव-कशीनें जो वसूल होईल तो आणून समजाऊं

४४६२ मौजे साकेगांव प॥ सेवगांव हा गांव सन खमसांत अखेरीस पालखीवद्दल दिल्हा. कारकीर्द माहादाजी गोविंद जमावंदी सीत

---

१ पत्रांक ३८ पहा. हें पुढच्या तारखेस लिहिलें आहे तरी संदर्भासाठीं येथेंच घातलें आहे. २ हाच रावसाहेवांचा चौकस कारभार.

* तक्रार. हल्लीं याला audit म्हणतात.

ता॥ रुपये

२६६२ सनसीत जमावंदी कच्चा रोखा रुपये ५९७९ पैकीं वजा मोकासा व बावतीवर सरदेशमुखी व गावखर्च वगैरे मिळोन रुपये २३१७ बाकी ऐवज आला ३६६२ रुपये पो वजा अनुष्ठान श्रीसिध्धटेकाचे देवाकडे गणपतीस रुपये १००० नेहमी बाकी

*श्रीमंत रावसाहेबांकडून कर्जपट्टी पा मारी जाहली सबब गुदस्तास कमी आकार होईल.*

१८०० सनसवा आजमासे हिशेब पक्का न आला सबब कुलखर्च समजाऊन बाकी निकाल ऐवज एईल अजमासे

———

४४६२

७६५८= गोहेदेच्या मुक्कामीं सखुबाई शिंदी यांस इनाम एदलाबाद करून दिल्ही ते समई गांव त्यांनीं दिल्हे. साल मजकुरीं रुपये

० मौजे चापडगांव पो शेवगांव येथें अंमल सालमजकुरीं बसला नाहीं कारण कीं अद्यापीं सखूबाईच्या अंमलास ठिकाण नाहीं सबब अंमल चालू नाहीं. नरहर लक्ष्मणराव कमाविसदार पा मार यानें खळखळ केली आहे सबब ऐवज न आला.

७६५८= मौजे भुसावळ पा एदलाबाद सालमजकूर पैकीं

जमाबंदी कच्चारोखा टक्के

*२६५८।६. पा वजा टक्के

*सदरहू पैकीं बाकी तावाकडे काय तो हिशेब आला नाहीं.*

९११ माजी अंमलदार यांजकडे

३०९ मोकासा दर शेकडा टक्के १८॥ प्रॉ टक्के

———

१२१०

---

* बेरीज वजाबाक्या बरोबर नाहींत. जमाखर्चाच्या दप्तरांत अशी चूक होणें संभव नाहीं.

बाकी टके १३३७॥। दर
रुपये १॥। प्रो एा रुपये

७६५८=

५२२७८=          देह सुमार ३

देह सुमार तीन एकूण जमा पांच हजार दोनशे सत्तावीस रुपये दोन आणे करार.

सदरहू ऐवज पैकीं गांवगन्ना बाकी ऐवज थोडा बहुत अस्सल चौकशी करून जो असेल तो समजावा. करार     छ २७ सफर सन समान सितैन आषाढ

## पत्रांक ४२.

१७६७ ता. २८ जुलई     श्रीपांडुरंग     १६८९ श्रावण शुद्ध ३

राजश्रिया-विराजित-राजमान्य-राजश्री चिंतोपंत तात्या स्वामीचे सेवेसी—

पो त्र्यंबकराव माहदेव व गोविंद माहादेव साष्टांग नमस्कार विनंति उपरी येथील कुशल जाणोन स्वकीय लिहावें. विशेष. आपणास राजश्री केदारजी सिंदे व रा॥ माहादजी सिंदे यांजवर वरात रुपये १९०४५ एकूण चाळीस हजार पंचेताळीस रुपये देविले तपसील

* { ४१३६ नानाजी नाईक व जिवाजी नाईक येवलेकर बा॥
   { ७५७२॥ यादोराव रघुनाथ भागवत वगैरे ता॥

५७९५ खुद्द मशारनिले
२०५ गोविंद बल्लाळ खांडेकर
५०० आबा दीक्षित
१०७२॥ व्याजा बा॥

७५७२॥
७३३६॥ धोंडाजी जगंनाथ रेघे बा॥

१९०४५.

सदरहू एकुणीस हजार पंचेताळीस रुपये यांची वरात दिल्हे आहे. रुपये आपणास न पावले तरी रुपये व्याजसुद्धां आह्मीं देऊं. मिती श्रावण शुद्ध ३ त्रितीया शके १६८९ सर्वजित् नाम संवत्छरे. बहुत काय लिहिणे हे विनंति.

१ हे मारला गेलेल्या काकड्याचे मुलगे कीं काय? * कंसांतील रकम पुढील पत्रांत उल्लेखिलेले काशीसुतद्वयांनीं वसूल करण्याचा पत्कर घेतला होता.

## पत्रांक ४३.

इ० स० १७६७ ता. १२ आगष्ट. **श्रीकृष्ण.** श्रावण वद्य ३ शके १६८९

श्रीमंत राजश्री चिंतोपंत तात्या स्वामीचे सेवेसी

सेवक नानाजी कासी व जिवाजी कासी एवलेकर मुक्काम ज्यणस्तान ( जनस्थान ) नमस्कार विनंती उपरी. रा। गोविंदराव माहादेव यांनीं वरात रा। केदारजी सिंदे यांजवर दिली रुपये ११७०८॥ अकरा हजार सातशें साडेआठ. हेवरात वसूल करून खामखह्य स्वाधीन रुपये आले म्हणजे याची तिजाइ आम्ही स्वामीस देऊं बाकी ऐवज आम्हीं आपला घेऊं. हें लेहून दिल्हें सही हस्ताक्षर जिवाजी कासी शके १६८९ सर्वजित नाम संवत्छरे श्रावण वदि ३

---

## पत्रांक ४४.

इ. स. १७६७ ता. ८ सप्तंबर **श्री.** भाद्रपद शुद्ध १५ शके १६८९

राजश्री चिंतोपंत तात्या गोसावी

यांसि

अखंडित लक्ष्मी-अलंकृत राजमान्य स्नो। माहादजी शिंदे दंडवत. विनंति उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहित असले पाहिजे. विशेष बहुत दिवस जाहले तुम्हांकडून पत्र येऊन वर्तमान कळत नाहीं तरी सविस्तर लिहून पाठवावें. जातेसमई आपलें आमचें बोलणें कितेक अर्थे-करून जाहलें त्याच लक्षावरी आम्हीं कायम असो. दरम्यान कितेक गोष्टी लौकिकांत येतात त्या आपणास कळोन संशय आपलें चित्तांत असेल; त्यास त्या गोष्टी झाडून मिथ्या. आपण आह्मांसी बोलले त्याप्रमाणें आपलाहि विचार कायम असावा. पुढें कर्तव्य अथवा न कर्तव्य जो विचार करणें तो आपल्या विचाराशिवाय होणार नाहीं, येविशींची खातरजमा असावी. वरकड देशीं कित्येक उभयेतांत विरुद्धभाव एकितो त्यास तुम्हीं तेथें असतां ऐशा गोष्टी नसाव्या. कारण कीं घरकलह कामाचा नाहीं. दौलतीस अपाय होतो. वरें आम्हीं येथील गुंता उरकून श्रीचे दर्शनाकरितां येतच असों. आल्यानंतर तुमची आमची भेट होऊन पुढील कर्तव्य तें केलें जाईल. वरकड कितेक राजश्री बाळाजीपंताचें पत्रावरून कळेल. रा।। छ १ रबिलाखर *बहुत काय लि॥ हे विनंती

पे॥ छ १४ रबिलाखर भाद्रपद समान

---

१ ही तात्यांची वसुलाबद्दलची तिजाई! तात्यांचे पत्राशिवाय शिंदे कसचे लवकर कर्जाचा उलगडा करणार होते? २ रावसाहेब व दादासाहेब.

* येथून हस्ताक्षर खाशांचे.

## पत्रांक ४५.

इ० स० १७६७ आक्टोबर श्री. आश्विन वद्य प्रारंभ शके १६८९

राजश्री चिंतोपंत तात्या गोसावी यांसी

अखंडित-लक्ष्मी-अलंकृत राजमान्य स्नो माहादजी शिंदे दंडवत. विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहित जावें. विशेष आपण पत्रें पाठविलीं तीं पावलीं व राजश्री बाळाजीपंत यांस वर्तमान लिहिलें तें त्यानीं निवेदन केलें. सारांश, आपण दोन पत्रें व एक श्रीमंतास व एक पत्र बापूंस आणविलें त्याजप्रमाणें पत्रें पाठविलीं आहेत. तीं पत्रें त्यांस प्रविष्ट करून जें बोलणें तें आपण बोलावें. मुख्य आमचें आपलें बोलणें जाहलें, त्यांत दुसरा अर्थ नाहीं. आपण लिहिल्याप्रों यावयाची तरतूद करून दक्षणेस प्रस्थान केलें आहे; परंतु लोकाच्यां देण्याचा पेंच भारी, तीन वर्षांचें देणें, यांजकरितां गवगवा बहुत जाहाला आहे. येथील निर्गम करून लौकरच येतों. आपण तेथील अर्थ पक्का करून उत्तर लौकर पाठवावें. वरकड वर्तमान बाळाजीपंत लिहितील त्याजवरून कळेल. *तुमचें व आमचें बोलनें जालें होतें त्या बोलन्याचा अर्थ व येथील अर्थ कितेक प्रकारचा अर्थ सर्व लिहिला, बाळाजीपंत याजला सांगितला. (स ?)विस्तर कळेल. मधी कितीक लिहितील व सांगतील तो चित्तांत न आनावा. आमचें व तुमचें बोलनें जें जालें तेंच आहे तेंच प्रमान आहे. तरतुदी (म्हो ?) सरकारचा (सरदारीचा ?) बंदोबस्त करून घ्यावा दुसरा अर्थ नसे. ज्यानें आमची स्थिति राही तें करावें. बहुत काय लिहिणें लोभ असो दीजे हे विनंती[१].

---

## पत्रांक ४६.

इ० स० १७६७ आक्टोबर ८. श्री. आश्विन वद्य १ शके १६८९

राजश्री चिंतोपंत तात्या गोसावी यांसिः—

अखंडित-लक्षुमी-अलंकृत-राजमान्य श्रे॥ माहादजी सिंदे दंडवत विनंति उपरि. पत्रें आपनाकडून बाळाजीपंत यास आलीं तें वर्तमान त्यांनीं सांगितलें त्यावरून कळलें. 'रा गंगोबातात्यांनीं सर्व सरदारीचें निमित्य आपनाकडे आनून श्रीमंत रा रावसाहेबास समजाविलें. तो आर्थ त्याच्या ध्यानांत होता. परंतु आपल्या त्याच्या भेटीनंतर चित्तांतील किंतु दूर जाला. परंतु ते वरचेवर समजावितात. एनकरून संषय जात नाहीं. आह्माविसीं श्रीमंताचें व आपलें बोलनें होऊन

---

* येथपासून हस्ताक्षर माहादजी शिंद्यांचें. १ शिंद्यांस हुजूर बोलावलें होतें, त्या संबंधें हें प्रत्र आहे. सरदारीसंबंधे अद्यापि कांहीं गोष्टी ठरावयाच्या होत्या व महादजीस सरदारी मिळावयाची होती.

निच्चय आह्माकडी (ल) लक्षाचा जाहला. परंतु दुसरा आर्थ समजावितात याजमुळें अंतर पडतें. याजकारितां आतमसंतोगानं, (?) दूरदेशीनं, वर्तनू (क) करून आप्रमानिकत न ये तें करावें' ह्मनून आपन बाळाजीपंताचे पत्रीं लि॥ त्याजवरून त्यांनीं सर्व आर्थ सांगितला. ऐसास आमचें बोलनें एकच आहे. दु(स)रा आर्थ नाहीं. जाते समई आपलें आमचें भाषन जालें त्याच निश्चयावर आह्मी आहों. दरमियान कितेक गोष्टी निर्मान जाहल्या होत्या त्यांची दखल खातरजमा शपतपूर्वक बाळाजीपंत याजपासीं केली. त्यांनीं सविस्तर आर्थ आपनास लि॥ आहे. मुख्य आमचा निच्चय हाच कीं त्याजउपारि जें करनें तें आपल्या लक्षानें करावें. ऐसा मजकूर आहे. त्यांनीं दाहा लक्ष नजर द्यावी आनी दाहादस्त (बंदोबस्त ?) कराव. त्या(स ?) सरदारींतील आर्थ ऐवज कसी आहे हे सर्व तुह्मास उमजलाच आहे. त्यांसी (हीं ?) मधें लोकाच्या देन्यापासून मुक्त होण्याचें संकट, तेथें दुसरा प्रकार कोठून? याजउपर एथील निर्गम करून स्वारीस जाव- याचे तरतूद आहे. घडे तें खरें. कां कीं सेर आणाल्या (?) ऐवज घेऊन दिला; परंतु निकाल पडत नाहीं त्यामुळें मुल(ख)गिरी व देसची नजर देणें हें घडनें कठिन आहे. यांत पुढें म(ज)कूर कोनता करून सरदारी राखे तोच पडला आहे. पुढें काय तें लि॥ श्रीमंताच्या चित्तांतील संषय जाय तें करनें, याजकारितां पूर्वी लि॥ आहे. रा॥ बाळाजीपंत आमचे लक्षानंच वर्तनू(क) कारितात. बहुत काय लि॥ हे विनंति

---

## पत्रांक ४७.

स० १७६७ ता. १४ आक्टोबर. श्री. १६८९ अश्विन वद्य ७.

श्रीमंत राजश्री पंत प्रधान साहेबाचे सेवेशी

विनंती सेवक माहादजी शिंदे दंडवत विज्ञापना तागायत छ २० जमादिला- वल पावेतों साहेबाचे कृपे-करून सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेष छ ५ जमादिलावलचें आज्ञापत्र सादर जाहलें त्या पत्रांत आज्ञा कीं 'तुह्मांकडील निष्टेचा मजकूर राजश्री चिंतो विठ्ठल यांनीं निवेदन केला. त्याजवरून तुह्मीं खातरजमा राखून हुजूर येणें. सरदारीचा बंदोबस्त करून पुढें हिंदुस्तानांत उपयोग पडिला पाहिजे. याजकारितां जरूर पत्रदर्शनीं स्वार होऊन यावें येविशीं चिंतो विठ्ठल यांनीं लिहिलें आहे' म्हणोन पत्रांत आज्ञा त्यांस हुजूरजी आज्ञा-पत्र आल्यानंतर याव- यासी दिकत नाहीं. आज्ञेप्रों दक्षणेस प्रस्थान केलें. एथील बंदोवस्त करून मजल

---

हें सर्व पत्र अथपासून इतिपर्यंत महादजी शिंदे यांच्या खुद हातचें आहे.

१ येथपर्यंत रायरीकरांच्या पत्राचा इत्यर्थ झाला. यापुढें महाहजी शिंयांचें उत्तर, गंगोबातात्याचा कारभार महादजीस पसंत नव्हता.

दरमजल सेवेशीं एतच आहों. पुढें स्वावंद आज्ञा करतील त्याजप्रों वर्तणूक करूं. आह्मांविशीं राजश्री चिंतो विठ्ठल पेशजी साहेबाशीं बोलले आहेत व हालींही बोलतील. त्यास तें बोलणें आमचे आहे. दुसरा प्रकार नाहीं. वरकड कितेक बोलत असतील ते ध्यानांत न आणावें, मशारनिले बोलतील त्याजप्रों जो बंदोबस्त करणें तो करावा. आम्हींही मजल दरमजल येवून पोहचतच आहों. स्वावंदाची भेट होऊन दर्शनाचा लाभ घडेल तो सुदिन असे. उत्तरेस जावयाकरितां विजयादशमीस डेरे दिल्हे होते; परंतु आज्ञापत्र हुजूर यावयाशीं आलें, याजकरितां दक्षणेस डेरे दिल्हें. मजल दरमजल लौकरच *येतों. एथील प्रकार स्वामीचे लक्षा विरहित नाहीं. एथील प्रकार तो लोकांचें देणें बहुत न सेरसाल घेऊन परिना(म) लागत नाहीं. पांच चार लाख रुपये घेऊन निर्गम करून सेवेसी सत्वर येतों. दुसरे, स्वामीनीं आज्ञापत्रांत कितेक बंदोबस्त करावयाची आज्ञा केली तर सेवेशी येतों. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

## पत्रांक ४८.

१७६७ ता. २४ आक्टोबर श्री १६८९ कार्तिकशुद्ध २

राजश्री चिंतोपंत तात्या गोसावी यांसिः—

अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्रो माहादजी सिंदे दंडवत. विनंती उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीये कुशल लिहित जावें. श्रीमंत इकडे आले त्यासमागमें राजश्री आबाजीपंतहि आले. भेटी जाहल्या. पंत मशारनिलेनीं या प्रसंगीं बरीच मेहनत करून श्रीमंताची मर्जी टिकाणां आणिली. श्रीमंतासह आम्ही कुच करून नर्मदातीरास आलों. पुढें येथील भाव कितेक राजश्री बापूस[1] समजावें याअर्थें राजश्री निळो गोपाळ पाठविले आहेत, इकडील सर्व अर्थ सांगितल्यावरून कळेल. राजश्री आबाजीपंत यांनीं कितेक सांगितले तें लिहिलें. ज्या गोष्टीनें आमचें बोलणें श्रीमंताजवळ ठीक राहून बोलल्या गोष्टीप्रमाणें घडे तें तुम्हीं राजश्री बापूस सांगून करावें. इकडील संशय कोणेविसीं चित्तांत न आणावा. रवाना छ ७ जावल [1]बहुत काय लिहिणें? लोभ कीजे हे विनंती.

श्री
श्री जोतिस्वरूपचराणि
तत्पर राणोजीसुत माहादजि शिंदे
निरंतर

मोर्तब सूद

* हस्ताक्षर स्वाशांचें. १ दादासाहेब. २ बापू. ३ हस्ताक्षर महादजी शिंदे यांचें.

## पत्रांक ४९.

१७६७ ता. २६ आक्टोबर. श्री. १६८९ कार्तिक शुद्ध ४

राजश्री नारो बल्लाळ व बाजी विश्वासराव कमाविसदार महालानिहाय सरदेशमुखी गो यांसि:—

अखंडितलक्ष्मी-अलंकृत राजमान्य स्ने॥ केदारजी शिंदे दंडवत सु॥ समान सितैन मया व अलफ. स्वदेशचा सरसुभा सालमजकुरापासोन राजश्री सदाशिव केशव यास सांगितला आहे. तरी तुह्मीं मारनिलेसी रुजू राहून मागील हिशेब मारनिलेस समजावून देऊन पुढें बंदोबस्त करून देतील त्याप्रों वर्तणूक करून सरकार चाकरी एकनिष्टपणें करणें. जाणिजे छ २ जमादिलाखर बहुत काय लिहिणें? हे विनंति.







---

## पत्रांक ५०.

स० १७६७ ता. २६ आक्टोबर श्री १६८९ कार्तिक शुद्ध ४

राजश्री नारो हरी कमाविसदार पा येदलाबाद गोसावी यांसि:—

अखंडितलक्ष्मीआलंकृत राज्यमान्य स्नो केदारजी सिंदे दंडवत. सुा समान सितैन मया व अलफ. स्वदेशचे सरसुभ्याचें कामकाज राजेश्री सदाशिव केशव याजकडे सांगितले असे तरी तुम्हीं मारनिलेसी रुजू होऊन पामजकूरचे बंदोबस्त करून देतील, त्याप्रों अंमल करणें. मागील हिशेब मारनिलेस समाजाऊन देऊन पुढें बंदोबस्त करून देतील त्याजप्रों वर्तणूक करून सरकारचाकरी एकनिष्टपणें करणें. जाणिजे. छ २ जमादिलाखर. बहुत काय लिहीणें? हे विनंति.






## पत्रांक ५३.

स० १६६७ ता॥ २६ आक्टोबर. श्री कार्तिक शुद्ध ४ शके १६८९.

राजश्री बळवंतराव गोपाळ कादार पा॥ श्रीगोंदे वगैरे गांव गो॥ यांसिः—

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्ने॥ केदारजी सिंदे दंडवत. सु॥ समान सितैन मया व अलफ. स्वदेशचे सरसुभ्याचे कामकाज राजश्री सदाशिव केशव याजकडे सांगितलें असे तुम्ही मारनिलेसी रुजू होऊन पा॥ मजकुरचा बंदोबस्त मारनिले करून देतील त्याप्रो॥ अंमल करणें. मागील हिशेब आहेत ते मारनिलेस समजाऊन देऊन पुढें बंदोबस्त सरसुभे करून देतील त्याजप्रो॥ वर्तणूक करून सरकारचाकरी करणें. जाणिजे. छ० २ जमादिलाखर. बहुत काय लिहीणें! हे विनंती

मोर्तब सुद




---

## पत्रांक ५४.

स० १७६७ ता. २६ आक्टोबर श्री. १६८९ कार्तिक शुद्ध ४

राजश्री नरहर लक्ष्मणराव कादार पा॥ सेवगांव गोसावी यांसिः—

अखंडित-लक्ष्मी-अलंकृत-राजमान्य स्ने॥ केदारजी सिंदे दंडवत. सु॥ समान सितैन मया व अलफ. स्वदेशचे सरसुभ्याचें कामकाज राजश्री सदाशिव केशव याजकडे सांगितलें असे. तरी तुम्ही मारनिलेसी रुजू होऊन पा॥ मजकूरचा बंदोबस्त मारनिले करून देतील त्याप्रो आंमल करणें. मागील हिशेब मारनिलेस समजाऊन देऊन पुढील बंदोबस्त सरसुभे करून देतील त्याजप्रों वर्तणूक करून

सरकारचाकरी एकनिष्टपणें करणें. जाणिजे. छ २ जमादिलाखर. बहुत काय लिहिणें ? हे विनंति.







---

## पत्रांक ५५.

स० १७६७ ता. ३१ आक्टोबर श्री. १६८९ कार्तिक शुद्ध ९

राजश्री सखारामपंत बापू गोसावी यांसि

सकल-गुणालंकरण-अखंडित-लक्ष्मी-अलंकृत राजमान्य श्रे॥ महादजी शिंदे दंडवत. विनंति उपरी. येथील कुशल जाणून स्वकिय कुशल लिहित जावें. विशेष आम्हां-कडील बोलणें पेशजी जे गृहस्थ आपणासी बोलत होते त्या गोष्टी म्हाहून खोट्या आहेत. आमचें बोलणें तें राजश्री चिंतो विठ्ठल आपणासी व श्रीमंतासी बोलतील तें प्रमाण. त्या बोलण्यांत आम्ही आहों. जो बंदोबस्त करणार तो मशार-निलेच्या विद्यमानें करावा. *बहुत काय लिहिणें लोभाची वृद्धी करावी हे विनंति.

---

## पत्रांक ५६.

स० १७६७ ता. ३१ आक्टोबर श्री. कार्तिक शुद्ध ९ शके १६८९

श्रीमंत राजश्री पंत प्रधान स्वामीचे सेवेसी

विनंति सेवक माहादजी सिंदे कृतानेक विज्ञापना ऐसीजे बहुत दिवस स्वामी कडून कृपा-पत्र येऊन परामृष होत नांहीं. त्यास कृपा करून आज्ञापत्रीं सेवकाचा परामृष करनार स्वामी समर्थ आहेत. राजश्री चिंतो विठ्ठल आम्हा-विसई कितेक विनंती करतील ती मान्य करून आज्ञा करनार स्वामी धणी आहेत. दुसरे कोणी कितेक अर्थ समजावितील ते चित्तांत न आनावे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना†

---

१ हे एकच मजकुराचे कागद आहेत, तथापि सदाशिव केशवास सरसुभा दिला, त्यांत किती तालुके होते तें व कोणाकोणास पत्रें लिहावीं लागत तें, कळावें म्हणून हीं पत्रें छापलीं आहेत. पण यांहीपेक्षां आणखी जास्त पत्रें लिहावीं लागत असत, त्याचा खुलासा योग्य प्रसंगीं करूं. * येथपासून हस्ताक्षर महादजी शिंद्यांचें.

† हे संबंध पत्र महादजी शिंदे यांचे हातचें आहे.

## पत्रांक ५७.

स० १७६७ ता० १ नोव्हेंबर श्री कार्तिक शुद्ध १० शके १६८९

राजश्री चिंतोपंत तात्या गोसावी यांसि

अखंडित-लक्ष्मी-अलंकृत-राजमान्य स्ने॥ माहादजी सिंदे दंडवत. विनंति उपरि. येथील कुशल जाणून स्वकिय कुशल लिहित जावें. विशेष. आपण पत्रें छ १८ जमादिलावलचीं पाठविलीं तीं पावलीं. पत्रीं बंदोबस्ताचा अर्थ कितेक लिहिला व राजश्री बाळाजीपंत यांस तुम्ही लिहिलेत त्यांनीं सविस्तर अर्थ सांगितला. पेशजी बाजीनरसी गंगोबाच्या विद्यमानें नजरेचा जाबसाल बोलत होते ते गोष्ट श्रीमंताच्या ध्यानांत आहे. त्यास आम्हीं मागील देण्यास सेर [?] सालचा ऐवज झाडून घेऊन पेस्तर साल मागतों तेथें नजर देऊन पुढें फौज ठेऊन बंदोबस्त करणें या गोष्टी जरूर आहेत. हा सर्व अर्थ खावंदास समजाऊन करणें तें करावें. आम्हीं येथील निर्गम करून खावंदाकडे तुमच्या लिहिल्यावरून एतच आहों. परंतु थोरले श्रीमंत आनंदवल्लीस आहेत. त्यास त्यांची भेट घेऊन पुण्यास यावें किंवा परभारें यावें या गोष्टी सला पोख्त, पेच नपडे, ते ल्याहावीं. पेशजींचे गृहस्त बोलत होते तें खोटें. आपल्या बोलण्यांत आमचें बोलणें येसीं हस्ताक्षरें पत्रें श्रीमंतास व बापूस पेशजी एक दोन पाठवलींच आहेत व हालीं तुम्हीं लिहिल्या-प्रमाणें दोन पत्रें पाठविलीं आहेत. वरकड वर्तमान बाळाजीपंत लिहितील त्याजवरून कळेल. †आम्हीं लिहिलेप्रमानें सत्वरच येतों. राा छ ८ जमादिलाखर बहुत काय लिा हे विनंति.

---

## पत्रांक ५८.

स० १७६७ ता. २ नोव्हेंबर श्री. कार्तिक शुद्ध ११ शके १६८९

श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामीचे शेवेसीं विनंति सेवक माहादजी सिंदे दंडवत विज्ञापना. तागाईत छ ९ जमादिलाखर पावेतों साहेबाचे कृपेकरून सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेष. आम्हाकडील बोलणें पेशजी जे ग्रहस्त बोलत होते त्या गोष्टी झाडून खोटया. त्या जाबसालांत आम्ही नाहीं. हालीं राजश्री चिंतो विठ्ठल आपणापासीं आम्हांकडील लक्षाची विनंति करीत आहेत आणि पेशजींहीं केली आहे. तें बोलणें आमचें असें. त्याजप्रमाणें बंदोबस्त करणें तो मशारनिलेच्या विद्यमानें करावा. सारांश मशारनिलेच्या बोलण्यांत आम्ही असों. *येथील सर्व वर्तमान मशारनिले स्वामीस निवेदन करतील तें ध्यानास आनून बंदोबस्त करून देनार स्वामी समर्थ आहेत. जेनेकरून सरदारी उपयोगी स्वामींचे सेवेसी पडे ऐसे करनार धनी समर्थ आहेत. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

---

† येथपासून हस्ताक्षर खाशांचें. * येथपासून हस्ताक्षर महादजी शिंद्याचें.

## पत्रांक ५९.

ता ९ माहे दिसेंबर. १७६७ श्री मार्गशीर्ष वद्य ४, १६८९.

अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य राजश्री चिंतो विठ्ठल गोसावी यांसिः—

सेवक माधवराव बल्लाळ प्रधान नमस्कार. उपरि. येथील कुशल जाणोन स्वकीय लिहित जाणें. विशेष. शिंदे हिंदुस्थानास येतात ऐसें तुम्हीं नाशिक स्वारी अनंद-वल्लीस असतां बोलत होतेस त्यास मुदत होऊन गेली. तर्‍ही त्यांनी येणें न जालें. ते उज्जनीसच आहेत. सरकारचें काम नासतें. यास्तव राजश्री नारो शंकर राजे-बहादर यांची दिवाणगिरी शिंद्यांची होती ते मोघम राखून राजश्री बाजी नरसिंह यांस शिंद्यांची दिवाणगिरी करार करून देऊन शिंद्यांचे सरदारीचा बंदोबस्त कर-विला, हें वर्तमान तुम्हांस कळावें यास्तव लिहिलें असे. जाणिजे. छ १७ रजब सुा समान सितैन मया व अलफ.* बहुत काय लिहिणें ? नारो शंकराचे तर्फेनें यांनीं कारभार करावा. याप्रमाणें ठरलें. फडनिशीविशीं ताकीद केली आहे. तेही चाल-वितील. छ० मार. पौ छ ३ शाबान उर्फ पौष सन समान मुकाम जनस्थान संध्याकाळें.




---

## पत्रांक ६०.

स० १७६७ ता. १६ दिसेंबर श्री. मार्गशीर्ष वद्य ११ शके १६८९

श्रीमंत् राजश्री पंत प्रधान स्वामींचे सेवेसीः--

विनंति सेवक माहादजी सिंदे दंडवत विज्ञापना ताागाईत छ २४ रजब पावेतों मुक्काम वराणपूर येथें स्वामीच्या कृपेंकरून वर्तमान यथास्थित असे विशेष. आम्हांस हुजूर येणेविशीं पांचसात पत्रें आलीं कीं, तुम्हीं भेटीस येणें. तुमच्या लक्षानें सरदारीचा बंदोबस्त करून देऊन तुमची रवानगी हिंदुस्तानांत करावी लागती त्यास तुम्हीं

---

* येथून अक्षर खाशांचें.

१ या पत्रावरून चिंतो विठ्ठलाच्या मनाप्रमाणेंच सर्व कारभार झाला असें दिसत नाहीं. नारोशंकरचे तर्फेनें बाजी नरसिंह यांनीं दिवाणगिरी करावी, असें ठरलें. चिंतो विठ्ठलास हा कारभार अर्थातच आवडला नसेल. **महादजी शिंद्यांस तो आवडला** नाहीं हें पुढील पत्रावरून स्पष्ट होईल

लौकर येणें. त्यांजवरून येथील निर्गत कळेल तैशी कर्जवाम करून मजलदरमजल मुक्काम मजकुरास दाखल जाहालों, तों पुण्याहून वातमी आली त्यांत मजकूर कीं स्वामीनीं बाजीनरशी व राघोराम यांस उभें करून नजर दहा लक्ष रुपये करार केले. त्याजपैकीं पांच तुर्त द्यावे व पांच निशा द्यावी. याजप्रमाणें करार करून सरदारीचीं वस्त्रें आमचें नांवें दिल्हीं. आमचें पत्र दाहा रोजाच्या मित्तीचें स्वामीस समजाऊन त्यांनीं हा कारभार केला आणि खावंदानीं—ही कृपा करून सांगितला. त्यास आमचा उजूर काय? सारांष. खावंदानीं दौलत दुसरियाच्या जिम्मा केल्यासही आमचा गुंता नाहीं, परंतु आम्हीं खावंदाच्या आज्ञे प्रों येत असतां हा मजकूर न घडावा. *सेवेशी श्रुत होय हे विज्ञापना. सेवेशी त्रिवर्ग बराबर येत असो श्रुत व्हावे हे विज्ञापना.

---

## पत्रांक ६१.

स० १७६८ ता. ६ एप्रील. श्री. चैत्र वद्य ४ शके १६९०.

राजश्री जयराम पांडुरंग कादार माहालनिहाय प्रांत मावळ (?) गोसावी यांसि

अखंडितलक्ष्मीअलंकृतराजमान्य स्ने॥ माहादजी शिंदे दंडवत. विनंति उपरी. येथील कुशल जाणून स्वकीय लिहिणें. विशेषः पा। रतलाम येथील मजमूची असामी बापूजी गोपाळ नि॥ राजश्री चिंतो विठ्ठल यांस पेशजी दिल्ही आहे. त्यास सालमजकुरापासून करार-करून दिल्ही असे. तरी त्याचे हातें मजमूचें काम घेऊन वेतन सालिना पेशजीचे सनद-प्रमाणें महालमजकूरचे ऐवजीं साल-दरसाल पावीत जाणें. आरफगीऱ्या व मसालची-ची नेमणूक पूर्वी करून दिल्ही आहे त्याजप्रों चालवणें. छ १८ जिलकाद सु॥ समान सितैन मया व अलफ बहुत काय लिहिणें हे विनंति.

श्री
जोतिस्वरूपचरणि
तत्पर राणोजीसुत माहादजी शिंदे
निरंतर

मोर्तब सुद

---

* येथून हस्ताक्षर महादजी सिंदे यांचें.

## पत्रांक ६२.

इ. स. १७७२ ता. ६ फेब्रुवारी श्री. १६९३ माघ शुद्ध ३

राजश्री महादजी सिंदे गोसावी यांसिः—

सकलगुणालंकरण-अखंडित-लक्ष्मी-अलंकृत-राजमान्य स्ने॥ माधवराव बल्लाळ प्रधान आशिर्वाद. उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहित जाणे. विशेष. राजश्री त्रिंबकराव माहादेव यांचें फर्ज तुम्हां-कडून येणें. त्यास मशारनिलेनीं कर्ज नानाजी-ना॥ येवलेकर व महिपतीराव जगंनाथ नासिककर यांचें देणें होतें. त्या ऐवजीं यांणीं पंचवीस हजार रुपये तुम्हां-कडून देविले. तुम्हीं सदरहू ऐवजाची वरात चिमाजी नारायण व अंताजी राम कमाविसदार पा॥ नवलाई येथें लाउन दिल्ही. असें असतां राघोराम यांनीं कमावीसदाराच्या हिशेवीं वरात गैरादा करून ऐवज तुमच्या सरकारांत घेतला. ऐवज मशार-निलेचा पावला नाहीं म्हणून यांणीं हुजूर विदित केलें. त्याजवरून हें पत्र तुम्हांस लिहिलें असें तरी गैरादा वरात जाहली असेल तर दुसरा ऐवज मशार-निलेस लाऊन देणें. ये विशींचा फिरोन बोभाट नये तें करणें *जाणिजे छ १ जिलकाद सु॥ इसन्ने सबैन मया व अलफ बहुत काय लिहिणें हे आशिर्वाद.

(मुद्रा: श्री राजाराम नरपती हर्ष निधान माधवराव बल्लाळ मुख्य प्रधान)

(लेखनासिमा)

---

* येथून हस्ताक्षर स्वामींचें

# होळकर प्रकरण.

रायरीकरांच्या दप्तरांत होळकरसंबंधाचे कागदपत्र मुळींच नाहींत म्हटलें तरी चालेल. चिंतोपंत तात्या रायरीकरांस पागा नेमून दिल्याचा उल्लेख मात्र एक-दोन पत्रांत आहे. या प्रकरणांत दोन तीन हिशोबाचे कागद छापिले आहेत, हे इतिहास-भक्तांनीं अवश्य वाचावें. व्याजाचा हिशेव करण्याची पद्धति, जमाखर्च ठेवण्याची पद्धति इत्यादि गोष्टी मनन करण्यासारख्याच आहेत.

---

## पत्रांक ६३.

१७६७ ता. २९ आक्टोबर श्री. कार्तिक शुद्ध ७ शके १६८९

राजश्री माहादोवा ना।मेढे गोसावी यांसिः—

अखंडित-लक्ष्मी-अलंकृत-राजमान्य श्रे॥ तुकोजी होळकर दंडवत. सु॥ समान सितैन मया व अलफ. तुह्मा पासून सरकारांत घेतले रुपये ४२५०० साडे वेचाळीस हजार, हे सदरहू साडे वेचाळीस हजार रुपये उसने चैत्र-मासीं देऊं. जाणिजे. छ ५ जमासिलाखर. बहुत काय लिहिणें? मित्ती कार्तिक शुद्ध ७ सप्तमी शके १६८९ सर्वजित् नाम संवत्छरे. हे विनंति.




मोर्तब सुद

बार

---

१ हे कोण? शिवाय हे कर्जखत रायरीकरांच्या संग्रहीं कसें? कदाचित् हे माहादोवा रायरीकरांच्या संबंधाचे कोणी सावकार किंवा कमावीसदार असावे. या खतांत व्याजाचा उल्लेख नाहीं, तेव्हां हे रुपये खतांत छापल्याप्रमाणें 'उसने' च असावेत.

## पत्रांक ६४.

१७६७ ता ३ दिसेंबर श्रीगजानन १६८९. मार्गशीर्ष शुद्ध १३

राजश्री विसाजी कृष्ण कामदार प्रा नंदुरबार व गुल-तानपूर गोसावी यांसिः—

अखंडित-लक्ष्मी-अलंकृत राजमान्य स्नो संताजी कदमराऊ दंडवत. सुा सन समान सीतैन मया अलफ. तुम्हाकडे सन *११७७च्या रुपयांपैकीं कार्तिक वद्य १३ त्रयोदशी रुपये ६२५ सवासासे विद्यमान रा हरवाजी पांडुरंग यांचे मारफातीनें रोख रुपये पावले. बहुत काय लिहिणें? रा छ ११ माहे रजब.







## पत्रांक ६५.

१७६७ ता. ९ दिसेंबर श्री. १६८९ मार्गशीर्ष वद्य ४

राजश्री माधवराव वांडे वगैरे समस्त वांडे गोसावी यांसिः—

अखंडितलक्ष्मी-अलंकृत राजमान्य स्नो चिंतामण हरी सुभेदार †आशिर्वाद. उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीये कुशल लिहीत असावें. विशेष पा नंदुरबार येथील तुम्हाकडील मुकासा सरकारांत जप्त करून कमावीस *सुभां सांगितली.

---

*हा सन फसली आहे. फसली सन आंकड्यांत लिहितात.

१ ह्या परगण्यांची वहिवाट रायरीकरांकडे होती. तेव्हां ही सव्वासाहाशांची पावती ठीकच त्यांकडे आली. २ कदम हें कुळ अस्सल मराठ्यांपैकीं आहे. हे संताजी कदमराऊ इनामदार होते असें दिसतें. यांस काहीं जातसरंजाम किंवा फौजसरंजाम होळकरशाहींत असावा. ३ ही वांडे मंडळी नंदुरबार, तळोदे इकडे पुष्कळच आहेत. सुभेदार मल्हाररावांचा उदय होण्यास वांडे कांहींअंशीं कारण होते. वांड्यांच्या व गायकवाडांच्या गुजराथेंत बऱ्याच झटापटी झाल्या आहेत.

† हिंदु ब्राह्मणेतरांस ब्राह्मण लिहूं लागले म्हणजे आशीर्वाद पूर्वक लिहीत.

* सुभ्याकडून सर्व व्यवस्था व्हावी असें ठरविलें.

सुभाहून पामारचे मुकासियाची कमावीस राजश्री शंकराजी खंडेराव यास सांगितली असे. तरी सदरहू मुकासियाचा अंमल मारानिले करितील. तुम्ही दखलगिरी न करणें. रा छ १७ रजव सु॥ समान सितैन मया अलफ. वहुत काय लिहिणें?

श्री
श्री गणपती चरणी तत्पर
चिंतामण हरी
.: निरंतर :.

मोर्तब सुद

बार

---

## पत्रांक ६६.

इ. स. १७६८ ता. १० फेब्रुवारी श्री. १६८९ फाल्गुन शुद्ध २

राजश्री व्यंकटराव कासी का दार पा सीरोंज गोसावी यांसिः–

अखंडित-लक्ष्मी-अलंकृत-राजमान्य स्ने॥ तुकोजी होळकर. दंडवत. सु॥ समान सितैन मया व अलफ. राजश्री चिंतो विठ्ठल याचे पागेची वोली करून त्याचे तैनात ऐवजीं पा मजकूर पैकीं गांवै तनखा रु॥ १५००० पंधरा हजाराचे पेस्तर सालापासून करार करून हें पत्र तुह्मांस सादर केलें आहे. तरी पा मजकूरचे पंधरा हाजाराचे गांव ईस्तावियानें लावणी होऊन उमेदीस पंधरा हजार आकार होतील ऐसे गांव एकास एक लगते पेस्तरसालापासून नेमून देणें. साल मजकुराचा फडच्या येथें जाला असे. जाणिजे. छ १ सवाल वहूत काय लिहिणें?

श्री
म्हाळसाकांत चरणी तत्पर
मल्हारजिसुत तुकोजी होळकर

मोर्तब सुद

बार

---

१ देखरेख? पण येथें वंडाळी, दंगल किंवा दंडेली असा अर्थ दिसतो, नाहीं? २ रायरीकर. ३ ज्यांचा वसूल रु. १५००० आहे असे गांव. ४ गांवची लावणी व्हावी यासाठीं कोणी कर्तवगारी गृहस्थास प्रथम अगदीं थोडा जमीनधारा मग दरवर्षी हळूहळू वाढवून ७ किंवा १० वर्षांनीं भर आकार घेणें; असा करार करून जमिनी लागवडीस देणें, यास **इस्तावा** ह्मणतात. भर आकारास येणें म्हणजेच उमेदीस येणें होय. ५ पुढील सालापासून. ६ यंदाचा तनखा येथेंच दिला आहे.

## पत्रांक ६७.

स० १७६८ ता. २० फेब्रुवारी श्री फाल्गुन शुद्ध २ शके १६८९

राजश्री विठ्ठल हरी गोसावी यासिः—

अखंडित–लक्ष्मी–अलंकृत–राजमान्य श्रो तुकोजी होळकर. दंडवत. सुा समान सितैन मया व अलफ. राजश्री माहादाजी[1] गोंविद निा राजश्री चिंतो विठ्ठल यासी *नालबंदी ऐवजी रुो २६०० दोन हजार सहासे तुम्हाकडून देविले आहेत. तरी सदरहू तुम्हाकडील रसदे ऐवजीं सविससे रुो मशारनिलेस पावते करुन कर्वज[2] घेणें. छ १ सवाल बहुत काय लिहिणें ?




मोर्तब सुद

बार

---

## पत्रांक ६८

स० १७६८ ता. ५ मार्च श्री. १६८९ फाल्गुन वद्य २

‡मोा अनाम चौधरी कानगो पा शिरोंज यांस तुकोजी होळकर. सुा समान सितैन मया व अलफ. राजश्री[3] चिंतो विठ्ठल यांचे पागेची बोली सरकारांत करून त्यांचे तैनात येवजीं पा-मजकुर पो गांव तनखा रुपये १५००० पंधरा हजाराचे पेस्तर साला-पासोन करार करून देऊन हे सनद तुम्हांस सादर केली आहे. तरी पा-मजकुरचे पंधरा हजाराचें गांव इस्तावियानें लावणी




---

१ शिंद्यांची दिवाणगिरी करण्यास कंबर बांधणारे माहदाजी गोविंद कीं काय ? २ पावती. ३ येथून पुढील मजकूर ६६ पत्रांकाप्रमाणेंच आहे. तेथील शेवटचें 'फडच्या' संबंधी वाक्य मात्र नाहीं. चौगुला किंवा सरदेशमुख हा गांवचा मुख्य. कांगो=कुळकर्णी हिशेबनीस ?

* स्वारांचा करार ठरवून आगाऊच जी रक्कम स्वारांस देत असत ती.

‡ मश्रूल अनाम ( राजमान्य ), हें पत्र ' आज्ञापत्र '. आहे.

होऊन उमेदीस पंधरा हजार रुपये आकार होतील ऐसे गांव एकास एक लगते पेस्तर साला-पासून नेमून देणें. जाणिजे. छ १ सवाल.

मोर्तब सुद

वार.

---

## पत्रांक ६९.

१७७१ ता. २४ जून श्री. १६९३ आधिक आषाढ शुद्ध १२

राजश्री विसाजी कृष्ण मुक्काम तारिवे (?) गोसावी यांसिः—

अखंडितलक्ष्मी-अलंकृतराजमान्य स्नो हरकूबाई होळकर दंडवत. सुा इसन्ने सबैन मया व अलफ. हरीराम-भवानीदास याजकडे तुमचा ऐवज येणें, त्यांचा फडशा करावयासी प्रा(ण?)नाथ भवानीदास सिरपुरास आले आहे(त?). तरी तुम्ही त्यासी तगादा न करीतां सोहलतीनें ऐवज वसूल करोन घेणें. ऐवजाचें काम, यास्तव लिहिलें असे. जाणिजे. रा छ १० रबिलावल बहुत काय लिहिणें?

ॅ ०
श्री दत्त चरनी ततपर
हारकु बाई होळकर

---

## पत्रांक ७०.

१७७१ ता ३ सप्तंबर श्री. १६९३ श्रावण वद्य ९

राजश्री विसाजी कृष्ण गोसावी यांसिः—

अखंडितलक्ष्मीअलंकृतराजमान्य स्नो हरकूबाई होळकर दंडवत. सुा इसन्ने सबैन मया व अलफ. तुम्हीं पत्र पाठविलें तें पावलें. हरी-रामभवानीदास याजकडील ऐवजाचा मजकूर लिहिला त्यास मशारनिले तुम्हांपासी शिरपुरास आले आहे (त) तुह्मीं (व) ते समजाऊन पुरशा (फडच्या?) करोन घेणें. आह्मांस दर घडी वारंवार लिहितां, याचें कारण काय? आम्हीं कांहीं जामिन नाहीं. जामिन—रोखाही तुह्मांस दिल्हा नाहीं. तुमचे माणसांस पुसावें. ताकीद करोन तुम्हांकडे पा आहे. पुरशा (फडच्या?) करोन घेणें जाणिजे. छ २३ जमादिलावल बहुत काय लिहिणें?

---

१ ह्या कोण? ह्यांचा संबंध चंद्रचूडांच्या पत्रांवरून स्पष्ट ठरेल.

# पत्रांक ७१.

१७७१ ता. ९ सप्तंबर. श्री. १६९३ भाद्रपद शुद्ध १

हिशेब कर्ज गुा राजश्री चिंतो विठ्ठल माा विसाजी कृष्ण तानवडी. ताा भाद्रपद शुद्ध १ शके १६९३ खरनाम संवछरे.

| मुद्दल. | व्याज. | |
|---|---|---|
| १५५८॥ | १११२ | अश्विन शुद्ध १ शके ८९ अधिक येकसुद्धां माहे ४८, याचे कचे(च्चे?) ७४८०८ दर दीड रुपया प्रो. |
| १३९५ | ९४१॥ | पौष शुद्ध १ शके १६८९ अधिक येक सुद्धां माहे ४५, कच्चे ६२७७५ दर सदे रुा १॥ |
| २०० | १३९॥। | कार्तिक शुद्ध १३ शके ८९ अधिक सुद्धां माहे ४६॥२, कच्चे ९३२० दर सदे रुा १॥ प्रो. |
| ४००० | २५९२ | माघ वद्य १० शके १६८९ अधिक सुद्धां माहे ४३०६, कच्चे १७२८०० दर १॥ प्रो. |
| ३८० | २५०॥। | माघ शुद्ध १ शके १६८९ अधिक सुद्धां माहे ४४, कच्चे १६७२० दर १॥ प्रो. |
| ७५३३॥ | ५०४६ | |

वसूल.

| मुद्दल | व्याज | |
|---|---|---|
| १०० | ६४ | फाल्गुन शुद्ध १० शके ८९ अधिक सुद्धां माहे ४२॥६, कच्चे ४२७० दर १॥ प्रो. |

---

१ मुद्दलाला महिन्यांनीं गुणून कच्चे काढतात व त्यावर दरसदे (दर शेंकडा) व्याज असेल तसा हिशेब करितात. प्रस्तुतच्या हिशेबांत दिढोत्र्याचें व्याज आहे.—वसूल आला त्याचेंही कच्चे करून त्याचें व्याज कर्जाच्या व्याजांतून व वसूल मुद्दलांतून वजा करून बाकी काढतात.

२७०० १५७९॥ आषाढ शुद्ध १ शके १६९ अधिक सुद्धां माहे ३९,, एकूण कच्चे १०५३००दर १॥ प्रो.

२८०० १६४३॥

बाकी देणें.

ऐन मुद्दल. व्याज.

४७३३॥ ३४०२॥ पौ वजा सूट बारोत्रा

३११७॥ २८३॥ किा (?)

१॥ जाजती (वरची अळीं उडविण्यासाठीं!)

२८५

बाकी रुपये.

३११७॥

७८५१

सात हजार आठशें एकावन रुपयांचे खत लिहून दिल्हे असे.

७८५१.

## पत्रांक ७२.

१७७१ ता. १५ आक्टोबर श्री. पौ १६९३ अश्विन शुद्ध ७
पौ छ ६ रजब अश्विन

चिरंजीव आन्यास आशीर्वाद. उपरि. चिरंजीव मुला उभयतांस दोन तिवटें व दोन दुपटे बराणपुरी, मुलांस उभयतांस देणें. विजयादशमीस लुगडीं मातोश्रीस व आऊबाई व सौ यमा व दुर्गास शिलक पैकीं देणें. त्याची किंमत अजमासें रु.

| लुगडीं | | सनगें तिवटें व शेलें. | |
|---|---|---|---|
| १५ | मातुश्री | १५ | तुम्हीं घेणें सनगें २ |
| १५ | काकी | १५ | बाबूराव २ |
| १० | सौ. यमा | १२ | रामजीपंत २ |
| ९ | सौ. दुर्गा | १० | उपाध्या सदाशिव भट २ |
| १६ | निा बाबूराव लुगडीं | ८ | पुराणीक सनगें २ |
| | | ८ | सदानंद २ |

१ येथें हिशेबांत व्याजाची $\frac{1}{12}$ सूट दिली आहे. सारांश,

ऐन मुद्दल बाकी = ४७३३॥

$\frac{1}{12}$ प्रमाणें २८३॥+१॥ = २८५ वजा करून व्याज } = ३११७॥

| | |
|---|---|
| १४ रामाजी जनार्दन लुगडीं | ४ दादंभट १ |
| | १५ आपाजी महादेव सनगें २ |
| १० अंताजी पंत लुगडें १ | — |
| सदरहु प्रों देणें. | ८७ |
| ७ वापूभाऊ पाध्याची स्त्री लुगडें १ | |
| — | |
| ९६ | |

सदरहु प्रमाणें सनगें देणें. बहुत काय लिहिणें ? हे आशीर्वाद. छीट आंगरख्यास गज सुमारें ८ पाठवावें. आंगरखे करून देणें. आशीर्वाद.

---

## पत्रांक ७३.

### श्री गजानन प्रो.

स० १७७१ ता. १७ आक्टोबर                १६९३ आश्विन शुद्ध ९.

यादि हिशेब खासगी ताळेबंद विसाजी कृष्ण सन सवाईन ता सन इहीदे ज्ञा माघ शुद्ध १ ता पुषमास एकंदर माहे १२

पो जमाखर्च.                                रुो.

५०० जमा कर्ज महंत दुशालगीर गोसावी दर सदे १ ह्या प्रों रुो देणें, खत असे.

२०० जमा कर्ज महंत सिवपुरीगोसावी दर सदे १ ह्या प्रों मिती मार्गेश्वर वा १०

२० जमा पुश अखेर पावेतों सेवक बाजान (?) अदमासें.

४० जमा परमानंद मोदी पुश अखेर अदमासें टके ७५ प्रों दर १०॥।६

४० जमा महमद अली बोहोरी त्याचें देणें. पुश अखेर पावेतों ज्ञा (इस्तकबलि) पासून.

—

८००

---

१ हीं विजयादशमीची देणगी रायरीकरांची खासगत असावी. तिवट म्हणजे पागोटे, दुपटा (दुपट्टा) म्हणजे शेला. मुलें, कुटुंबांतील स्त्रिया, कारकून, उपाध्ये, इत्यादि सर्वांस देणग्या देण्याची चाल मराठेशाहींत होती. आतां दसऱ्याच्या 'शिलंगणा'चें 'सोनें' मात्र अवशिष्ट राहिलें आहे! २ म्हणजे

१४१। सरकारी सिल्लक पेशजीची तालेबंदास निघाली त्याचा तपसील.

९१। मौजे मोहिदे त्या गांवापैकीं तसलमात.

५५ दाणे दास्तान.

२६ ॥ सिल्लक रामाजी कृष्ण

९॥। महण पाटील मोहीदेकर

९१।

५० रोख रुपे तालेबंद गु॥ सारंगधर सु.

१४१।

९४१।

७५ शामकुवर बा॥ कर्ज वसुलीं आले.

१६ तारजी माळी त्याजवा॥ वसूलीं आणून सरकार कर्ज रा॥ लिहिलें.

२९४ सरकारी ऐवज नावें दिला तो जमा.

१३२६॥

१९। अणुपराय दयाळदास बा॥ देणें बाकी ३६ दर १॥।६ प्रो

३२॥. बापू चवधरी आजपा॥ हिसेब सुद्धां व्याजसुद्धां.

१३७८।.

पैकीं खर्च रा॥.

९१।. मौजे माहिदे त्या गावाकडे कर्ज पेशजीचे त्याचे खत आहे तो गांव आपली पाटीलकी आणि सरकारी होळकर कमावीस विला ( रुपे [?] ) घेतली. सवंद तेथें ठाणें होतें. जे समईं गरदी श्रीमंत दादावर जाली त्यासमईं अफरातफरी जाली-रा॥ गोविंद येशवंतानें केली-त्या समईं जिन्नस व सीलक तेथें राहिली. रुजू गांवकरी.

५५ दाणे बाजरी सवा पांच खंडी.

२६ ॥ सिल्लक रामाजी कृष्ण रा॥ ५३

९॥। महण पाटील मौजे मा॥र.

९१।.

५० श्रावणमासपासून ता। पुशमास पों खर्च नासीक व नंदुराबारास होते. तो खर्च एकंदर जाला. खासगत हिसेबीं दाखला रोखी पणास (५०) रुोचा सरकारी.

५२ रामचंद्र कासींनीं कर्ज दिल्हें होतें. त्याचा खर्च नासीकास गेलों त्या समई जाला. मधें नंदुरबारास होते तोहि खर्चपैकीं तेलास ऐवज लाऊन दिल्हा होता. सरकारी जमा केली तेव्हां खाजगत खर्च उगविले पाहिजे. सबंद खर्च कलम रुो ५२ नवे कर्ज गोसावीपैकीं.

२४॥ गवत गुदस्ता जेष्ठ शुद्ध १ सरलें त्या समई खरीद केलें सुमार १४००० दर ३॥ प्रों ऐा रुा ४९॥ दर १॥।९ प्रो वट्टा. रुा २४॥ साडे चोवीस.

१५० गुदस्ता फाल्गुनमास परभारें सेंधेस गुा परमानंद मोदी यासी मण (गंहु?) १०० दर २॥। प्रों २७५ याचे रुो दर १॥।६ वट्टा.

२७ तांदुळ आजपावेतों गुा रेवजी पाटील.

१६ कमोद मण ·।॥· दर ३ प्रों रुो ३०

४॥ गुा परमानंद ८ मण ८१ सडीक

६॥ हालीं जो (?) १२९॥·

———

२७

३६ गहु गुा प्रयागजी मिठा पाटील कोटलीकर त्याजपासून सुा मण .॥. दर ३ प्रों पोटीं तपसील.

१६ गुा प्रयागजी यासी मण .॥. ३०

२० गुा परमानंद मोदी मण .।. २ दर ३५ सरासरी

———

३६

६॥ दाल तुरीची गुा परमानंद मोदी मण ८३ दर ४ च्यार १२९॥।

३० गुा परमानंद मोदी आजपों एकंदर किरकोळीं दाखल बाज (?) यादी आहेत.

२४ तेल गुा धणजी पाटील तेली सुा मण ·॥४ सरासरी दर तीन वा। ९॥८ प्रा। ४२·

४० कापड किरकोळी आजपों.

२५ सेवक बजाजाकडील.

१५ महमद अल्लीकडील.

———

४० सदरहू चाळीस रुा कापड

९ सरपण आजपो एकंदर किरकोळी.

२५९ सिबंदी एकंदर सुा माणसें.

३६ नारोबा दाहामाही. व दुसरा विरेश्वर बारामाही एा बारामाही

७ मशालजी सातमाही नंदुरबार.

२४ बहादुरखा १२ बारामाही.

२४ शेकजी माहे १२ पैकीं पांचमाही महेश्वरी परभारें. हालीं सातमाही पो वजा येकमाही बाकीचा करार गाडीवान.

२४ पुरमल दाजी माहे १२.

१४ येसु सवखो पासीं पोटास माहे ७ पोढगी पांचमाही महेसरी स(चं ? )तर खर्च पडून येथील पडतो.

१४ सोन यासी मुशारा सातमाही.

२४ गाडीवाण साहामाही.

१६ सारवान माहे ४ वैशाख अखेर.

३६ राघो पोरगा व शेक येसु मुबदला. पो बारामाही दरमहा ३ प्रों.

४० कारकून हरी मुरार यांणी खर्च खोली माघ शुद्ध ता चईत्र वद्य ५ पो आणीले मनुष्य घोडी व आपण व किरकोळी आलाईदा हिशेब आहे. रुो.

१० परमानंद मोदीची उच्यापत.

११ सेवक बजाज उच्यापत कापड.

९ मुशारा तीन माही आबरु.

१० धारेस नासीकास जातांना रोख खर्च हमद.

---

४०

---

२५९

सदरहु सिबंदी नंदुराबारेस सातमाही. सिपाई महेश्वरीं सिबंदी ते खेरीज हिसेब दुसरा सरकारी तालेबंद तेथें दाखला.

५०।।। सालमजकुरी गवत घेतलें ४०००० दर हजारीं रुा १। प्रों एकंदर रुो.

१६ तावजी माळी त्याजकडे कर्ज २८ केले विकरी वजा होऊन बाकी येणें. खत नाहीं. रुजू असेत. निा सरकार. मिती पुश क्रा १ प्रो सुा दर १॥। प्रो.

७५ शामा व राजकुंवर हास्ते दळू कर्ज येणें रुो १३१ दर १॥। प्रों खत आहे. दर सद्दे १॥ प्रों. दिडोत्रा प्रों. मिती कार्तीक शुा १ खत आहे.

---

९४१.

.।. बाकी सिलक

---

९४१।

२२ परमानंद मोदी त्याचें नांवें जमा रुा ४० पैकीं पावती जाली. २२ बाकी देणें १८ रो ३६ आश्वीन शुद्ध ५

४० राहुटी खर्च.

२७ नागू गाडीवान ९ मुशारा.

१५ दाजी पुरमल माहे ९ रोज २७

२७ देवजी माघ शुद्ध १ ताा आश्वीन शुद्ध १ माहे ९

७७॥ त्रिंबका पोवार वैशाख वाा ५ ताा आश्वीन शुद्ध ५ माहे ५॥ दरमहा ३

२१ नारोवा ब्राह्मण माहे ७ श्रावण अखेर.

१० दामोदर ब्राह्मण जेष्ठ शुद्ध १० ताा आश्विन शुद्ध १० माहे ५ रुो १५ पैकीं पावले रोख.

२७ सोन्या सावंत महेश्वरीं कामगरी आहे. माहे ६ व घरीं किरकोळी माहे ३ सरासरीं दरमाहा रुो ३ सिपाई पोट.

११३ हरभरे साडेचवदा माप सोळोल यासी घेतले दर १४॥ वाा त्रो २११ रुो भाव निरख.

१६ वाजरी मण १० दर ३ प्रो वो ३०

४ दाल मण २ वो ७॥.

१६ तांदुळ कमोद १० दहामण दर ३ प्रों.

१६ तेल गुा धणजी तेली मण .।४

१२ वाहादुरखान तलव माहे ८ ऐवज रुो १६ पैकीं पावले.

१३॥ तूप आजपो माहे ९

२८ किरकोळी व धर्मादाय वगैरे.

१० धर्मादाय श्रावणमासी.

५ वितीपात

९

१३ किरकोळी खर्च दुध वगैरे.

२८

१३६६।.

१२ बाकी सिलक नासीक स्वारी आश्वीन शुद्ध १०

१३७८।

सदरहू तेरासें अठयाहत्तर च्यार आणे खर्च माघ शुद्ध १ ता आश्विन शुद्ध १० दशमी पावेतों मुा नंदुरबार एा माहे २२ बावीस महिने यांत तेरासें-आठयाहत्तर खर्च मुकाम मजकूर जाला असे. सुा इसने सबाईन सके १६९३ छ ८ माहे रजब.

## पत्रांक ७४.

स० १७७१ सप्तंबर आक्टोंबर श्री भाद्रपद १६९३

हिशेब ईा शके १६९० फालगुण ता शके १६९३

| | रु० |
|---|---|
| १५०० | फालगुण वा ७ हा हुंड्यांचे रु० शके ९१ |
| १००० | वैशाख शुा ३ हा गोविंद हरी शके ९२ |
| ५०० | वैशाख शुा ११ हुंडी एक नंदुरबारची शके ९२ |
| १००० | मिती तपसीलवार हा विष्णुपंत रु० शके ९२ |
| | १००० चैत्र शुा २ |
| | १००० वैशाख शुा १० |
| | १००० ज्येष्ठ शुा १२ |
| | २००० आषाढ वा ३ |

१ ह्या हिशेबांत कांहीं राजकीय महत्व आहे असें समजून तो दिला नाहीं. पण येथें धान्याचे भाव, नोकराचाकरांचे पगार १७७०।७१ मध्यें कसे होते, हें समजण्यासाठीं हा हिशेब प्रसिद्ध केला आहे. शिवाय यांत जी आकार करण्याची पद्धति दिसत आहे, तींत शंकास्थानें पुष्कळच आहेत. वट्टा, वजनमापांचीं प्रमाणें यांचा मेळ कसा बसवावा, हें समजून घेणें व देणें वरेंच कष्टाचें दिसत आहे. तेव्हां या शंकास्थानांचाही विचार व्हावा म्हणून हा हिशेब प्रसिद्ध केला आहे.

३००० श्रावण शुा १

८०००

६००० ह्या विष्णुपंत बाबा.

४००० माघ वा। ९ शके ९२

२००० चैत्र शुा १ शके १६९३

६०००

५०० चैत्र शुा ९ ह्या केशोपंत भाऊ शके ९३

१००० आषाढ वा। ५ ह्या केशो ठाकूर ——— शके ९३

१५०० श्रावण शुा १० ——— खिजमतगार. शके ९३.

१००० ह्या बाबुराव केशव.

५०० चांभारगोंदे.

१५००

१८५ पौष शुा १ वा। उंट शके १६९२

२११८५

सदरहू एकवीस हजार एकशे पंच्यांशी रुपयाचा भितीवार वहीस जमा केला असे.

## पेशवे प्रकरण.

या प्रकरणांतील कांहीं पत्रें फारच महत्वाचीं आहेत. केंदूर गायकवाडांस दिलें ह्यांत राघोबादादांची धूर्तता दिसून येते. पर्वतीसंस्थानच्या खर्चाची व्यवस्था स्मरणीय आहे. चिंतो विठ्ठल रायरीकर हे फडनीशीचें काम बघत म्हणून त्यांच्या संग्रहांत ह्या पर्वतीच्या सनदा सांपडतात. पत्रांक ७९ मध्यें मल्हाराव होळकरांसंबंधें झालेलें रावसाहेब माधवराव यांचें मत स्पष्ट दिसत आहे. १७६४ च्या मे महिन्यांत दादासाहेबांनीं राज्याची उठाठेव करण्यास सुरवात केली. याचवेळीं मोरो नरहर नांवाच्या मनुष्यावर आरोप आणणें, ( पहा पत्रांक ८१ ) पुरंदर किल्ला कोळ्यांनीं घेतला तो रावसाहेब पेशव्यांच्या फुसलावणीनें घेतला अशा कंड्या पिकविणें, ठाण्याची आदलाबदल करूं देत नाहीं म्हणून दादांनीं तट्ट फुगून बसणें इत्यादि आनंदीबाईच्या अघोर आगलावीपणाचे चाळे सुरू झाले. ८१–८३ पत्रांकवरून चिंतोपंतांची रावसाहेबांनीं कशी कान उघाडणी केली आहे व परोक्षतः दादासा-

हेबांस किती छान उपदेश केला आहे हें समजून येतें. पत्रांक ८५ मध्यें दादासाहेबांची भोळसर कुटिलता दृग्गोचर होते. पत्रांक ८७, ८८ व ८९ हीं रावसाहेबांची देशाभिमानी नम्रता कशी उज्वळ होती, याची साक्ष देतात. बाकीचीं पत्रें न्याय, नेमणुकांसंबंधांचीं आहेत. मुख्य गोष्ट ही कीं, रावसाहेबांविरुद्ध आमच्या बाइलबुद्धि दादासाहेबांनीं नांहीं नाहीं तीं बालंटें आणिलीं आणि त्या बिचाऱ्या सात्विक व सत्वशील राजबिंड्याच्या पाठीमागें हरणकाळजीचा घातक ससेमिरा लाविला; ही महत्वाची गोष्ट रायरीकरांच्या पत्रांवरून सिद्ध होते. नारायणरावाचा साक्षात् खून करणाऱ्या आनंदीबाईनें माधवरावास परोक्षतः क्षयरोगी केलें असें कोणी विधान केलेंच तर तें सत्यापासून फारसें दूर असणार नाहीं.

---

## पत्रांक ७५.

स० १७६३ दिसेंबर आरंभ श्री १६८५ कार्तिक अखेर

केंदूर[1] दमाजी गायकवाड याजकडे दरोबस्त द्यावें. त्याचे ऐवजीं मौजे मजकूरचा आकार अदमासें सात हजार व कित्ता[3] दरसाल रुपये दाहा हजार एकुण सतरा हजार रुपये–याचा सरंजाम श्रीमंताकडे रेवातीरीं द्यावा. विद्यमान खासा मशारनिले. हस्ताक्षर रामचंद्र यसवंत सन अर्बा सितैन कार्तिक अखेर.

---

## पत्रांक ७६.

१७६३ ता। २९ दिसेंबर श्री १६८५ मार्गशिर्ष वद्य १०

राजश्री चिंतो* विठ्ठल गोसावी यांसिः—

उपरी. श्रीदेवदेवेश्वर वास्तव्य पर्वती येथील बेगमी ऐनजीनसाची व इमारतखर्च वगैरे जें कर्णे तें खाजगी नि॥ जिवाजी गणेश यांणीं करून द्यावी. येविसी मारनिलेस अलाहिदा पत्र सादर आहे, त्याप्रों मानिले बेगमी करून देत जातील. नख्ती बेगमी खाजगीकडून नसावी, § हुजूरून करून द्यावी, ऐसा करार करून बाजी बाबूराव याजबरोबर यादी पाठविल्या आहेत. तरी तुम्हीं यादीप्रमाणें देवदेवेश्वरचा बेहेडा नख्ती खर्चाचा करून देणें. ऐनाजिनसाचा वगैरे खर्च चालावयाविसी तुम्हांहि

---

१ हा गांव पुणेजिल्ह्यांत खेड तालुक्यांत आहे. २ हा करारनामा दमाजीराव गायकवाड व सरकार पेशवे यांमध्यें झाला आहे. ३ कित्ता म्हणून आणखी १० हजार रुपये कसले? ४ खासगीवाले. ५ ऐनखासगी व हुजूरखासगी हा भेद पेशव्यांच्या वेळीं होता. ६ जमाखर्चाची नेमणुक करून दिलेली यादी. § या सनदेवरून नक्त नेमणुक हुजूर खाजगीकडून व ऐनजिनसासी (धान्य, मसाला, इ. इ.) ऐनखासगींतून व्हावी, असें पर्वतीसंस्थानसंबंधें ठरलें होतेंसें दिसतें.

* यांकडे पेशवाईची फडणीशी होती.

गोविंद[1] सिवराम यांसि ताकीद करून देवणें. जाणिजे. छ २३ जमादिलाखर सुा अर्बा सितैन मया व अलफ बहुत काय लिहिणें[2]?

लेखनावधिः

---

## पत्रांक ७७.

१७६३ ता. ३० दिसेंबर श्री. १६८५ मार्गशीर्ष वद्य ११

राजश्री चिंतो विठ्ठल गोसावी यांसिः—

उपरि. येथील कुशल जाणोन स्वकीय लिहिणें. विशेष. श्री देवदेवेश्वर वास्तव्य पर्वती येथील खर्च पेशजीपासून राजश्री जिवाजी गणेश याजकडून पावत. होती (?) त्यास साल मजकुरीं ऐन जिनसी खर्च व इमारत खर्च व चौकीस प्यादे वगैरे लोक आहेत त्याचा खर्च पूर्ववत् प्रों मारनिलेनीं चालवावा या प्रों करार करून पत्र सादर केलें आहे. नख्ती नेमणूक देवाची वगैरे हुजूर खासगीकडून करून घ्यावयाविशीं तुह्मांस पत्र सादर केलें आहे. तुह्मी नख्ती नेमणूक करून देणें. नेमणूकेस रा। बाजी बाबूराव याचे तसलमातीस दोन हजार रुपयेपर्यंत ठेवावे लागतात. सबब कीं, नेमणूक करून खर्चाची दिल्ही–यांत कमी येईल; यास्तव मोघम् दोन हजार रुपये तसलमातीस द्यावें. या ऐवजीं मारनिलेनीं कार्याकारण देवाच्या पूजेच्या साहित्यांत न्यून न पडे या तऱ्हेनें खर्च करावा. मारनिलेच्या तसलमातीस ऐवज दिल्हा म्हणोन बावगा खर्च मनमानेसा केल्यास कामास येणार नाहीं. याप्रों साफ ताकीद करावी. देवाचे पूजेस वगैरे खर्च नेमणूक प्रों यथास्थित करावा. कमी करूं नये. सारांश देवेश्वरचा खर्च यथास्थित चाले व कांहीं तोटा न पडे तें करणें. व हिशेब बाजीपंतांनीं सालिना आणून समजवावा. कमी ज्याजती आज्ञा होईल त्याप्रों बंदोबस्त करीत जावा. येणें प्रों बंदोबस्त करून घेणें. जाणिजे. छ २४ जमादिलाखर बहुत काय लिहिणें?

लेखनावधिः

---

१ खासगीवाले. २ पुढील पत्रावरून ह्या पत्राचा अर्थ व देवदेवेश्वरासंबंधें दादासाहेबांची दक्षता व्यक्त होतात.

## पत्रांक ७८.

१७६४ ता. १५ जानेवारी — श्री. — १६८५ पौष शुद्ध १२

नकल.

राजश्रि-याविराजित-राजमान्य-राजश्री जिवाजी गणेश स्वामी गोसावी यांसिः- पो माधवराव बल्लाळ प्रधान नमस्कार विनंति उपरि. येथील कुशल जाणून स्वकीय लिहीत जाणें. विशेष. मौजे हिंगणे ता। कर्यात मावळ येथें रमण्याचा वाग सरकारचा आहे, तो राजश्री चिंतो विठ्ठल याजकडे तसलेमातीस दिल्हा होता तो हाली शाकभाजी, फुलें-संसाराचे सोईकारितां नेहमीं मारानिलेकडे दिल्हा असे. तरी सदरहू वाग मारानिलेकडे देणें. जाणिजे. छ ११ रजब सु॥ अर्वा सितैन मया व अलफ वहुत काय लिहिणें ? हे विनंति.

वार

---

## पत्रांक ७९

पाणीपतनंतर सर्व फांटाफूट झाली, त्यावेळीं दादासाहेवांनीं आपल्या पक्षाकडच्या लोकांस वाटतील तशा जाहगिरी, इनामें दिली. पुढें राक्षसभुवनाची लढाई होऊन पुनः स्थिरस्थावर झाल्यावर राव-साहेव, बापु इत्यादिकांच्या आग्रहावरून सर्व जहागिरदार आपल्या जहा-गिरीची चौथाई देण्यास कवूल झाले. पण मल्हारराव सुभेदार कवूल नव्हते. तेव्हां त्यांस कायल करून त्यांची कवुली मिळवावी, एतदर्थ हें पत्र रावसाहेवांनीं दादासाहेवांचे हितचिंतक रायरीकर यांस लिहिलें आहे.

स० १७६४ ता. ९ एप्रील — श्री. — १६८६ चैत्र शुद्ध ८

पु॥ राजश्री चिंतो विठ्ठल गोसावी यांसि

उपरी. राजश्री मल्हारजी होळकर याणीं चौथाई सरंजाम सरकारांत द्यावा असा करार वचन तीर्थस्वरूपांजवळ केलें असतां 'आतां वैजापूर, रावेर मात्र देऊं' म्हणतात ही गोष्ट अपूर्व आहे. सर्वांनीं केल्या करारा प्रमाणें द्यावें आणि यांनीं कां न द्यावें? 'तुम्हीं करार केला आतां कां देत नाहीं? वचन तुम्हीं केलें तें कोठें

१ मोघम उपयोगासाठीं.

राहिलें? ' असें त्यांच्या आंगीं लाऊन बोलल्यास (काम ?) होईसें आहे. तर तुम्हीं तीर्थ-रूपांस विनंती करून त्यास कायेल करून चौथाई सरंजाम करारा-प्रों सरकारांत येई· ती गोष्ट करणें. येविशीं तीर्थरूपास विनंती लिहिली आहे. तुम्हीं वरचेवर स्मरण देऊन कार्य करून घेणें. जाणिजे. छ १० सवाल सुहूर-सन अर्बा सितैन मया व अलफ. मल्हारबाचा प्रकार प्रत्ययास आलाच आहे परंतु जेथवर निकड होईल तितके करणें. छ मा॰*




पो छ ५ जिलकाद वैशाख मुा त्र्यंबक

---

## पत्रांक ८०.

इ० स० १७६४ मे | श्री | १६८६ वैशाख.

राजश्री चिंतो विठ्ठल गोसावी यांसि—

सेवक माधराव बल्लाळ प्रधान. नमस्कार. उपरी. एथील कुशल जाणून स्वकीय लिहिणें. विशेष. तुह्मां-कडून अलीकडे पत्र येऊन वर्तमान कळत नाहीं. तरी प्रस्तुत तीर्थस्वरूप राजश्री दादासाहेबांची मर्जी कशी आहे ? शरीर-प्रकृति कशी ? अवषध कोणाचें घेतात ? हें लिहिणें. मोंगला-कडून हिम्मतखान आले होते त्यांसी सलुखाचें बोलणें कसें जाहलें ? हिम्मतखानाचा भाव कसा आहे ? सलुख जाहला हा किती दिवस चालेल ? हा प्रकार व त्याचा बोलण्याचा आशय कांहींच कळत नाहीं. जी दिल्ही जागीर ती घ्यावी आणि पुढें नीट चालावें हा आशय नवाबाचा व त्याचे कारभाऱ्याचा कसा आहे ? हें लिहिणें. वरकड वर्तमान मल्हारबाकडील व शिंयाकडील लिहून हमेशा पा जाणें. वरकड वर्तमान बारिक मोठें हमेशा लिहिणें. इकडील वर्तमान तर सविस्तर तीर्थस्वरूपांचे पत्रीं पूर्वीं लिहून पाठविलें आहे त्यावरून कळेल. प्रस्तुत हैदरनाईक मायन-हळीस गेला

---

१ फजीत करून ? २ मल्हाराव सुभेदार ऐकणार नाहींतच ? ३ हे भोळे महाराज या वेळीं आनंदवल्लीस होते. जवळ आबा पुरंदरे व चिंतो विठ्ठल होते. ४ या सलुखा-संबंधें ग्रांटडफच्या बखरींत एक अक्षरही नाहीं मला वाटतें, निझामास आपल्याकडे वळविण्याचा हा दौलतबुडव्या दादासाहेबांचा एक राज्यविघातक पेच असावा. ५ हैदरनाईक मायनहळ्ळीस वैशाखांत (मेमध्यें) गेला.

* हें सबंध पत्र माधवरावाच्या हातचें.

आहे तेथें एक दोन मु॥ होईलसें दिसतें. त्याचें मानस हेंच कीं 'चार दिवस घालवावे. ‡हे छावणीस रहात नाहींत. हें त्याचें मत आहे.' झाडी सोडून झुंजायास यावयाचा प्रकार दिसत नाहीं. रात्रीस छापा घालावा हे इच्छा धरीत आहे. दुसरा प्रकार तर किमपि दिसत नाहीं. नबावाकडेहि पत्रें पाठवित आहे, कीं, 'तुह्मीं यावें.' हाही प्रकार करितच आहे. नवावही काडळूर संगमावर येणार आहे. पुढें पहावें. याचें त्याचें कसें आहे हें नकळे. याचें पारपत्याचा मजकूर तर प्रस्तुत तो झाडीत आहे. पर्जन्य बहूत, महरगता विशेष, असा प्रकार आहे. च्यार रुपये मिळवावे ते दिवस मागेंच गेले. प्रस्तुत एवजाचा प्रकार कोठेंहि दिसत नाहीं. असा प्रकार आहे. याचें पारपत्य जाहल्या खेरीज यावयाचें कसें ठीक पडतें? तोही आपले छावणीची वाट पाहात आहे. त्याचेहि लोक फुटतात व राजकारणें एतात. परंतु आपले फौजेस रोज-मऱ्यास ठिकाण नाहीं तेव्हां ते कसे येतात? हे सर्व अर्थ वडिलांस विदित करणें. आपले*

---

## पत्रांक ८१.

१७६४ ता १३ मे . . श्री. १६८६ वैशाख शुद्ध १३

राजश्री चिंतो विठ्ठल गोसावी यांसिः—

उपरि. विष्णु नरहरी सातारकर याचे बंधु मोरो नरहरी सातारियास होते. त्याजवरी वेंकाजी माणकेश्वर याणीं नांदगीर किल्ल्याचा आरोप आणून मोरोपंतास धरून नेलें व विष्णू-पंताचे घरीं चौकी बसविली. त्यास विष्णूपंत जातापळता नव्हे. एथें आम्हांजवळ असतां अशा गोष्टी दरम्यान ¹त्यांनीं कराव्या हे रीत सेवकपणास उचित नसे. आह्माकडे लिहून पाठवावें होतें; अथवा तीर्थरूप राजश्री दादा-साहेबांस श्रुत करावयाचें होतें; तें न केलें. असो तेथें तुम्ही. तुह्मांसही वारिक मोठें वृत्त कळलेंच असेल. यांज-कारितां तीर्थरूपास विनंती करून मोरोपंतास सोडून देणें. व याचे घरची चौकी उठवणें. नांदगिरीचे राजकारण मारनिलेनीं आम्हांस लिहून पाठविलेंच होतें. यांजकडे गुन्हा लागू होत नाहीं. तथापि जाला-तर तुह्मींच त्यास जामीन राहून यास सोडून देणें व चौकी उठवणें. §लिहिल्या-प्रों जरूर करणें. दुसरियास कागद न दाखवणें. तुम्हीच वाचून फाडून टाकणें. लिहिल्या प्रों जरूर करणें. दुसरियास हें पत्र नच कळावें. तूर्त जामीन घ्यावा.

---

‡ पेशवे. * हें पत्र इतकें अर्धेंच सांपडलें. हें सबंध पत्र माधवरावांच्या हातचें. §येथून हस्ताक्षर माधवरावाचें. १ वेंकाजीनीं.

पुढें अंतर त्याजकडे ठरल्यास, केले[1] पावतील. तरी लिहिल्या-प्रों करणें जाणिजे. छ ११ जिल्काद बहुत काय लिहिणें.

लेखनसिमा

---

## पत्रांक ८२.

१७६४ ता. १६ मे  श्री.  १६८६ वैशाख वद्य १

*राजश्री चिंतो विठ्ठल गोसावी
यांसि

सेवक माधवराव बल्लाळ प्रधान नमस्कार. उपरी एथील कुशल जाणून स्वकीय लिहिणें. विषेश ( विशेष ? ). 'पुरंधरचे[2] जुने लोकांनीं आमचें[3] नांव करून दग्यानें किल्ला घेतला' म्हणोन परस्परें वर्तमान विदित जालें. त्यास हे गोष्ट आम्हांस किमपि ठाऊक नसतां मधीं लवाडी करून कर्म केलें. त्याचें पारपत्याविशीं तीर्थस्वरूपांस लिहिलें आहे. तुम्हीहि विनंति करून लवाडी केली त्यांचें पारपत्य करवणें. वडिलांच्या चित्तांत संशय न ये तें करणें. जाणिजे. छ १८ जिलकाद बहुत काय लिहिणें.

लेखनसिमा

---

## पत्रांक ८३.

१७६४ ता. ६ आगष्ट  श्री.  १६८६ श्रावण शुद्ध ९

राजश्री चिंतो विठ्ठल गोसावी यांसि सेवक माधवराव बल्लाळ प्रधान नमस्कार.

---

१ आपल्या कर्मांचीं फळें भोगतील. २ ही तिसरी विलामत! ३ या पत्रावरूनही दादासाहेबांच्या मनांत संशय कसे येत असत, किंवा चांडाळचौकडींतील स्वार्थसाधु ठक त्या भोळ्या शंकराच्या मनांत कसे संशय उत्पन्न करीत या गोष्टींची मीमांसा स्पष्ट होते. गोपिकाबाईपेक्षां दादासाहेबांचे शिष्य [ शागीर्द ] ही लावालावी करण्याच्या कामांत पटाईत होते. दादा म्हणजे ओल्या मातीचा गोळा, पाहिजे तसा वळवावा!

* हें सबंध पत्र माधवरावाच्या हातचें आहे.

उपरी, येथी कूशल जाणून स्वकीय लिहिणें विशेष. तुम्हीं पत्र पाठविलें तें पावलें. पत्रीं लिहिलें कीं 'आप्पाजी गणेशास ताकीद होऊन गोपाळ-रामचे हवालीं ठाणें हो तें करावें.' म्हणून संशय धरून लिहिलेत व 'तीर्थस्वरूप राजश्री दादासाहेबांचे मनांत संशय आला आहे,' म्हणून लिहिलें तें कळलें. त्यास तुम्हीं वडिलांस विनंती करून आप्पाजी गणेशास ठाणें न द्यावयाविसी आम्हीं पत्रें लिहिलीं असतील तीं पत्रें खामखां आणवणें. वडिलांचे चित्तांत संशय आणणारे आणतात. येथें तरी वडिलांचे मर्जीशिवाय दुसरा अर्थच नाहीं. असें असतां लहान माणूस वडिलांचे चित्तांत विपर्यास आणून देतात. हें काय? हें पत्र वडिलांस विदित करणें. या मजकूराविसीं वडिलांची खातरजमा केलीच असेल. आम्हींच ल्याहावेंसें काय आहे? परंतु हें पत्र ल्याहावयाचें कारण हेंच कीं इकडील मजकूर सविस्तर तुम्हांस ठाऊक असतां चित्तांत संदेह आणून या गोष्टीचा अंदेशा न करितां पत्र लिहिलें याचें कारण कळलें नाहीं. परंतु असेंही वाटतें कीं वडिलांचे मर्जीचा भाव पाहून पत्र लिहिलें असें वाटतें. पत्र संदेह धरून लिहिलें याचें कारण पत्र लिहून पाठवणें. जाणिजे. छ ७ सफर बहुत काय लिहिणें. तेथील वृत्त कळावें म्हणून लिहिलें तें कळलें. तुम्हांविसीं संदेह नाहीं. छ मजकूर पा छ २४ सफर श्रावण मास सुा खमस

लेखनसिमा

---

## पत्रांक ८४.

१७६५ मे, जून | श्री. | १६८७ ज्येष्ठ

ही दौलत मोठी. या दौलतेस सर्व लहान मोठ्यांनीं अनुकूळ असून जेणेंकरून दौलत नीट होय तेंच सर्वांनीं करावें; तें येकीकडे राहून दौलत दोहो जागा करावी हेच तीर्थस्वरूपाचें मानस. त्यास आम्हांस कांहीं करणें नाहीं. कारण कीं ही दौलत पहिल्यापासून एकांनींच करावी, वरकडाचा भार करणारावर असावा; याप्रमाणें चालत आलें असतां, आतां वडिलाचें मानस कीं 'आम्हास गुजराथ द्यावी. आणि सर्व किल्याचा वंदोवस्त आम्हींच करूं.' म्हणतात त्यास आम्हांस कांहीं करणें नाहीं. कांकीं अशानें ही दौलत चालणार नाहीं. व दोहों जागा दवलत जाल्यानें लवकीकहि वाईट, यास्तव सर्व वडिलांनींच करावें. आम्ही स्वस्थ भलते जागा राहूं. आपल्या आपल्यांत भांडून दौलत वुडविली हा लवकीक कशास

पाहिजे? सर्व त्यांनींच करावें हें फार चांगलें. आम्ही स्वस्त राहूं. वडिलांनीं नीट केल्यावर आम्हांस सांगतील तेव्हां आम्ही जवळच आहों. हेंच प्रस्तुत काळीं बरें. तुम्हांस लिहावयाचें कारण इतकेंच कीं सर्व लोक म्हणतात; 'ही दौलत थोर, तीर्थस्वरूप राजश्री दादासाहेब चिंतोबाचे हातीं, तेव्हां चिंतोबांनीं वडिलांस समजून सांगावें, आणि या गोष्टीचा बंदोबस्त पाडावा.' हे येकीचकडे राहून नव्या गोष्टी निघतात हें काय? तेव्हां या गोष्टीचा शब्द तुम्हांवर लोक आणतात. तुह्मी तर वडिलास आपल्यातर्फेनें सांगतच असाल. परंतु वडिलाचा इतबार तुम्हावर, तेव्हां शब्द तुम्हांवर आणितात. तुह्मी तर नीट करतां, परंतु लवकीक बाहेर कसा आहे हा तिराइतास पुसावा. ही चीटी वाचून फाडून टाकणें. दुसऱ्यास एकंदर कळऊं न देणें. दुसऱ्यास कळवाल तर शफत असे. हेंच बोलणें रुबरु बोलावेंसें होतें, परंतु वर्तमान ऐकिलें कीं तुम्हांस बरें वाटत नाहीं यास्तव चिठी लिहीली असे.

---

## पत्रांक ८५

स० १७६५ ता. २६ मे  **श्री शंकर.**  १६८७ ज्येष्ठ शुद्ध ६

राजश्री चिंतो विठ्ठल गोसावी यांसिः—

सुर्‍हूर सन खमस. हकीमजीकडील पत्र आलें. त्यांत लिहीलें होतें कीं मुरादखान

---

१ ही चिठ्ठी फार महत्वाची आहे. थोरल्या रावसाहेवांचें सर्व मनोगत या लेखांत स्पष्ट उमटलेलें आहे. दौलत फोडावयाची नाहीं, ही पेशव्यांच्या तीन पिढ्यांची निश्चयपूर्वक परंपरा आणि दौलत फाडून फोडून तिची राखरांगोळी करावी हा राघोबाचा हट्ट! शेवटीं यांच्या लेकानें वडिलांचे सर्व मनोरथ पूर्ण केले. २ हें पत्र राघोबादादासाहेबांनीं चावडसेस ( आनंदवल्लीस ) असतांना लिहिलें आहे. हें १७६४ च्या जुलईनंतर लिहिलें आहे. महादजी शिंदे सन खमसच्या मोहरमांत ( श०, १६८६ च्या आषाढांत-किंवा १७६४ च्या जुलईत ) रुसून गेले. ( पहा. का. पर्ले यादी ११२ ). सन खमसच्या सफरमध्यें ( १६८६ चा श्रावण किंवा १७६४ चा आगष्ट ) दादासाहेबांनीं ' धोंडोराम वकील यांस पत्रें लिहिलीं आहेत. ( पहा. ऐ. ले. सं. भा. २ नं ४७६।४७७ ) त्यांत या पत्रांतील मुरादखान वगैरे मंडळीचा उल्लेख आहे. मुरादखान आगष्टमध्यें मोकळा होता. या पत्रांत तो कैद केल्याची वार्ता आहे तेव्हां हें प्रस्तुतचें पत्र निदान ४ आगष्टनंतर लिहिलें असावें. नक्की मिती किंवा तारीख कळणें शक्य दिसत नाहीं. कारण या पत्रांत खमस सन व सोमवार मात्र दिले आहेत. ३ निजामाकडील एक सरदार. हा पेशव्यांचा पक्षपाती असावा.

व त्याचे बंधु कैद केले. सरदारखान वगैरे आवरंगाबादेंत कैद केले. आद्यापि धोंडो रामाचें लिहिलें आलें नाहीं. परंतु बहुधा मागाहून लिहिलें पोंहचेल. हे गोष्ट बहुत वाईट जाहाली. याची तोड कसी करावी, तो विचार बहुत लांब केला पाहिजे. बहुतकरून भासतें कीं आम्हांसी बिगाड करावा ऐसा डौल मोगलाचा आहे. सबब खानास कैद केले. त्याकडे औणके-टणके किले आहेत. त्याची तजवीज कसी करावी ? बहुतच लांबें विचार केले पाहिजेत. भोंसले लबाडकी करावयास चुकावयाचे नव्हेत. येविसी लांब विचार पाहिजेत. भोसले, मोगल, हैदर, जाधव च्यार येके जागा जाहले. तेंव्हां इतक्यांसी सांदे बांधणें दुरापास्त आहे. खजानेंपूर आहों तें कळतच आहे. सालमजकुरीं आमचें वर्षप्रवेशकाळीं लग्नीं गुरु-शुक्र दोन्ही साहावे पडले आहेत, ते दोघेहि चैन पडों देणार नाहींत. आवरु बचतां संकटच दिसतें. परंतु एक ईश्वरकृपा आहे, तरी कांहीं भीत नाहीं. गुरु-शुक्रहि अनुकूळ होतील. असो. हा दैवीं विचार आहे. परंतु मानवी विचार कसा करावा याची योजना बहुत लांब विचार करून करावी. तोडीवर तोडीवर बोलाव्या. पुढें कसें करावें तें सारें योजावें. मजला तरी पुढील चिन्ह बरें दिसत नाहीं. मानवी विचारावरूनहि फटकाळ दिसतें. दैवी म्हणावा तरी गुरु-शुक्र दोन्ही प्रबळ ग्रह षष्ठ-स्थानीं सालमजकुरीं आहेत. हे ब्राह्मणशत्रूचा व दैत्यशत्रूचा दोघाचाहि उत्कर्ष करावयास चुकणार नाहीं (त.) त्याजवरून परम विचारांत पडलों आहों. ईश्वरकृपा आहे हें तरी खरेंच. परंतु ईश्वराजवळ आम्हांस त्याचे कृपेखेरीज दुसरी यांच्या (याञ्चा) करणें नाहीं. जें तो आपले संतोषें करील तें करो. आमचा निश्चय हाच कीं, प्राण गेले तरी दुसरि यांच्या (याञ्चा) न करावी. प्रसंगास आली म्हणोन गोष्टी तुह्मास खोलून लिहिली. असो. आमचें अंतर्यामीं तोच आहे, व आमचा निश्चय चालविणें हेंहि त्याचेच हातीं आहे. जसें करणें तसें करील. तूर्त प्रपंचरीतीनें उपायास आळस नच करावा. उपाय कोणता ह्मणाल तरी मोगलास परिच्छिन्न जास्ती कांहीं कबूल करून, बहूत आशेस लावून, फौज, तोफा कुमकेस आणावाव्या. मुरादखान कैदच जाहला असिला तरी निंबाळकर व खंडागळे, खंदारकर ऐसे आणवावे. कांहीं तोफा आणवाव्या. निदानीं *देवदुर्गहि देऊं करावें. जाधवराव देखील पंचवीस तीस चाळीसपर्यंतहि जागीर देऊं करावी. काबू पहावी तसें करावें. इतकेंहि द्यावयास पुरवलें. परंतु दोघे मोंगल व भोसले, जाधव ऐसे येक करून मग लढाया घ्यावयास पुरवणार नाहीं. शास्तव चहूंकडे तर्तुदी कराव्या.

---

१ हा पेशव्यांचा निजामाकडील राहणारा एक वकील. २ हे किले मनमाड जवळ आहेत ? ३ दूरंदेशीसें. ४ कंबर बांधणें? वैर करणें ? ५ आमच्या जवळ पैसा किती आहे, हें तुम्हांस ठावकेंच आहे. ६ गुरु व शुक्र हे दोन्ही ग्रह आह्मांस वाईट आहेत. ७ हो सर्व तयारी हैदरचा पाडाव करण्यासाठीं आहे काय ? किंवा रावसाहेबांचा नक्ष मोडण्यासाठीं हा प्रयत्न आहे ? *दौलताबाद.

मल्हारवांस वारंवार पत्रें ल्याहावीं. माहादजी सिंद्यास समजाविसीचें पत्र ल्याहावें. चाकर आहे रुसोन गेला आहे. त्यास च्यार पत्रें समजाविसीचीं गेलियास दोष काय? बहुत युक्तीनें गळ घालून ल्याहावीं. आला तरी आला; न आला तरी पारपत्य श्रीकृपेंकरून होतच आहे. चिंता नाहीं. चिरंजीव आबा[1] येतीलच. पुरंदरचे जसें कळेल तसें च्यार रु।।ये हाताखालीं आलियास बहुत उपयोगी. गंकार[2]पूर्वकाचे राजकारण विना तेथें ताणल्यासिवाय गोडीस येणार नाहीं. वाचून, सविस्तर मनन करून, उत्तर कलमवार जलद पाठवणें. तुह्मीं व आवाजी माहादेव, चिंतो अनंत व त्रिंबक विनायक, चवघे[3] बसोन माणसें बंगल्याखालीं घालऊन वाद-प्रतिवाद करून सिधांत करून उत्तर लिहिणें. व कागद चहूंकडे पत्रांचे पूर चालवणें. पत्रामागें पत्र व बातम्या ऐशा चालवणें. प्रयत्नास आळस तिळमात्र न करणें. केवळ हेच तपश्चर्या समजोन याच उद्योगांत राहाणें. गाई, ब्राह्मण, देव यांचें रक्षणें करणें. हेंचि[4] तप. हाच जप. यामध्यें जें पुण्य लागेल तें च्यार माळा ओढल्यानें लागणार नाहीं. दिवसास निजत न जाणें. रात्रौ दीड प्रहर दोन प्रहर कारभार करणें. रवाना सोमवार. रुजु.

## पत्रांक ८६.

स० १७६७ मे जून                श्री.                १६८९ ज्येष्ठ.

अवाजी माहादेव याचा गांव कोकणांत आहे तो गांव सातशें रुपये पारियंत आहे. बद्दल मुशाहिरा मशारनिलेचे लिहोन गांव देवावा. सु॥ समान मया अलफ. सदाशिव माहादेव याचे नावें करार करून सनद देवावी ‡देणें.

## पत्रांक ८७

स० १७६५ ता. ७ जून                श्री.                १७८७ ज्येष्ठ वद्य ४

*"किले किल्याच्या आसाम्या लोकांच्या बहुता दिवसांच्या आहेत, त्या प्रस्तुत दूर होतात. बाह्यात्कारी तरी ऐसी चर्चा आहे आहे कीं 'रसदी असाम्या

---

१ पुरंदरे. २ गंगोबा तात्या चंद्रचूड. ३ ही चौकडी दादासाहेबांच्या पक्षाची. त्रिंबक विनायकाचा उल्लेख प०यादी नं. ३५९ मध्यें आहे. ४ दादासाहेबांची परमेश्वरावर निष्ठा व निष्ठेचें व्यावहारिक स्वरूप येथें स्पष्ट दिसतात. ‡ देवावी व देणें हे दोन शब्द त्या त्या तत्कालीन अधिकाऱ्यांचे आहेत. समान मया अलफ ह्मणजे समान सितैन मया अलफ. *मागील चिठ्ठीसारखीच ही चिठ्ठी आहे. आपला अपमान करून घ्यावा, पण तुळत्याची मर्जी मोडूं नये, हें माधवरावसाहेबांचें मत होतें. पण त्यालाही कांहीं मर्यादा होतीच !

किल्याचे कामावर न ठेवाव्या' ऐसें आहे. परंतु आंतील मर्जी कळत नाहीं. आह्मांस तरी वडिलांचे मर्जीपेक्षां अधी (क ?) कोणी एक गोष्ट नाहीं. सविस्तर विष्णु नरहरी सांगतील, त्यावरून कळेल. याचा बंदोवस्त करणें तर दुसऱ्यास न कळत करणें. सारांश वडिलांचे मर्जीपेक्षां अधिक मला नाहीं. तेव्हां वडिलीं बाहेर वाईट न दिसेसें मर्जीस आल्यास करावें. हे सविस्तर प्रकार दुसऱ्यास न कळतां वडिलांस युक्तीचे वाटेनें श्रुत करणें. दुसऱ्यास येकंदर कळऊं नये.

---

## पत्रांक ८८.

१७६५ ता। ७ जून **श्री.** १६८७ज्येष्ठ वद्य ४

राजश्री चिंतो विठ्ठल गोसावी यांसिः—

उपरी. 'मोरो नरहरी यांस जामिनाविसी तगादा जाहला आहे. त्यास मशारनिलेकडे गुंता नाहीं. तरी तीर्थरूपास विनंती करून सोडून देवणें' म्हणून तुम्हांस पूर्वी लिहिलेंच होतें. परंतु त्यास अद्यापि सोडलें नाहीं. जामिनाविसींच अटकाव असिलाच तर तुम्हीं दरम्यान होऊन यास सोडणें. कदांचित् याजकडे मुद्दाच लागू जाला तरी याजपासून जावसाल करून घेतला जाईल. हे मुलूख फोडून कोठें जाणार आहेत? तरी तीर्थरूपाचा कागद देऊन सातारियास लाऊन देणें. हें पत्र कोणास न दाखविणें. लिहिल्याप्रमाणें करून आपल्या जिम्मा करून घेणें. * जाणिजे छ १७ जिल्हेज बहुत काय लिहिणें

(लेखनासिमा)

---

## पत्रांक ८९.

१७६६ ता. ११ आगष्ट **श्री.** १६८८ श्रावण शुद्ध ६

अखंडित-लक्ष्मी-अलंकृत राजमान्य राजश्री चिंतो विठ्ठल गोसावी यांसिः—

सेवक माधवराव बल्लाळ प्रधान नमस्कार. उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीय लिहित जाणे. विशेष. 'इकडील फौजेच्या वगैरे खबरा मनस्वी लोक तीर्थरूपाजवळ सांगतात त्याजवरून तीर्थरूपाचे चित्तांत संशय येतो' म्हणोन कळलें. ऐशीस पर्जन्यकालीं पुण्यांत फौज कशास पाहिजे? ठेऊन नफा काय? दाहाहजार

---

* येथून हस्ताक्षर माधवरावाचें.

१ दादासाहेबाजवळ. २ फौज जमण्याचीं दोन कारणें रावसाहेबांनीं या पत्रांत लिहिलीं आहेत. पण दादांचा संशय कांहीं गेला नाहीं! जाणार कसा? संशय उत्पन्न करणारी आनंदीबाई चिंतो विठ्ठल इत्यादि पंचायतन दादांच्या जवळ होतें!

फौजेस खर्च काय पाहिजे? तसेंच पागांचा अर्थ तर पागा खानदेश व बीड व गंगथडी वगैरे जागा सालाबाद आहेत ते घोड्याची निगा करीत नाहीं. दुसरें, आह्मीं कृष्णा, तुंगभद्रा उतरून जावें, तेव्हां येतात. यास्तव समीप जागा योजून ठेविले आहेत. आह्मी जाऊन राहातो या दशहर्तानें निगा चांगली होते इतका अर्थ. येविसी तीर्थरूपास विनंतिपत्र लिहिलें आहे. तुम्ही समजाऊन संदेह दूर होय तें करणें. आम्ही अविलंबेंच तीर्थरूपासन्निध येतो. आमचा विचार तीर्थरूपाचे आज्ञेशिवाय तिळप्राय नाहीं. तीर्थरूपानीं जातें समई करार केला त्याप्रमाणें त्यांनीं करावा हे त्यास उचित आहे. *जाणिजे. छ ४ रविलावल बहुत काय लिहिणें.

लेखनसिमा

---

## पत्रांक ९०.

१७६७ ता २७ मे (?) श्री १६८९ वैशाख वद्य ३० (?)

सेवेसी विज्ञापना. तागाईत छ २८ जिल्हेज पावेतों मुकाम देव-रायेदुर्ग येथें आपले कृपेकरून वर्तमान यथास्तीत असे. विशेष येथील वर्तमान पेशजी लेहून दोन पत्रें कासीदासमागमें नानांच्या[2] रवाना केलीं आहेत. तीं पत्रें पावोन वर्तमान कळलेंच असल. त्या आलीकडील वर्तमान तरी, प्रस्तुत श्रीमंताचा बेत आपण स्वारीसमागमें असावें ऐसें होऊन आपणास यावयाविसीं पत्रें परभारा पुण्यास गेलीं आहेत. तीं पत्रें आपणापासीं येऊन पावतील. हें वर्तमान आम्हांस कळल्यानंतर आम्हीं जाऊन राजश्री हरीपंत तात्याची भेट घेऊन त्यांस भावगर्भ पुसीला. त्यास मानिलेनीं साफच सांगितलें कीं 'तुह्मी त्यास ल्याहा. दुसरा अर्थ किमपी नाहीं. स्वारीसमागमें असोन कामकाज सांगावें, ममता करावी, हाच अर्थ आहे.' येणेंप्रमाणें त्यांनीं सांगितलें व मारनिलेनीं आपणास पत्रही याच अन्वयेंकरून लिहिलें आहे. तें पत्र वजीनस पाठविलें आहे त्याजवरून कळेल. त्यांनीं आम्हांपाशीं सांगितलें कीं "श्रीमंतासी आम्ही पक्कें करून घेतलें आहे. त्यांनीं यावें." आम्ही "सरंजाम नाहीं. स्वारींत येणें होतें कैसें?" हा अर्थ त्यास पुसील्यानंतर त्यांनीं सांगितलें कीं "नाना फडणीस यास 'सरंजाम लागल

---

१ हें पत्र कोणी बाळाजीपंतानें चिंतोपंत तात्यास लिहिलें असावें असें आंतील मजकुरावरून वाटतें. चिंतोपंतास आपल्याजवळ ठेवून घ्यावें व खवळाढवळ करूं देऊ नये असा रावसाहेबांचा बेत असावा. २ नानाफडणीस. * येथून हस्ताक्षर खाशांचे

तो, माणसें, राहुट्या, उंटें, घोडीं, वगैरे देऊन रवानगी करावी.' येणेंप्रमाणें पत्रें घेऊन रवाना केलें आहे." येणेंप्रमाणें त्यांनीं सांगितलें. सारांश मशारनिलेच्या बोलण्यांत तरी साफ आहे; आम्ही आणखी त्यास खोलून पुसिलें कीं 'आम्हांस येणें प्राप्तच आहे. परंतु आंत-बाहेर कांहीं असिलें तरी सांगावें.' त्यास संशयाचा अर्थ किमपी सांगितला नाहीं. त्यास येणेंप्रमाणें येथील मजकूर आहे. ऐसियासी पत्र पावल्यानंतर पुण्यास कोणी पाठवून सरंजाम आणून निघावयाची तरतूद लौकर करून स्वारीच्या रोकें यावें. लोभ करावा हे विज्ञापना. आपलें निघणें जाहाल्यानंतर पुढें पत्र रवाना करावें. त्याजप्रों वर्तमान तात्याच्या कानावरी घालूं. वरकड अर्थ भेटीनंतर सर्व सेवेसी निवेदन होतील. लोभ करावा हे विज्ञापना. नानाचें[२] पत्र आपणास आलें आहे त्याचें उत्तर पाठवावें हे विज्ञापना.

श्रियाविराजित राजमान्य राजश्री तात्याप्रति काशीनाथ भट्ट वैद्य कृतानेक आशिर्वाद. येथील कुशल जाणून आपलें कुशल इछितों. येथील वर्तमान रा॰ बाळाजीपंताचे लिहिल्यावरून विदित होईल. बहुत काय लिहिणें? हे आशिर्वाद.

---

## पत्रांक ९१.

१७६७ ता. १७ नाव्हेंबर. **श्री.** १६८९ कार्तिक वद्य ११

राजश्रियाविराजीत राजमान्य राजश्री

सखाराम[१] भगवंत स्वामी गोसावी यांसि

पो॰ रघुनाथ बाजीराव नमस्कार. विनंति उपरी येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहित जाणे. विशेष. मौजे साकरे पा॰ माणिकपुंज हा गांव राजश्री त्रिंबक[२] सुर्याजी याजकडे दरोबस्त आहे. तो याजकडे चालवावयाचा करार करून (?) सालमजकुरीं सन समानांत जालाच आहे. त्यास 'गांवची घालमेल राजश्री *चिंतामण हरी करितात. गांवास उपद्रव देतात.' ह्मणोन कळों आले. त्याजरून रावें[३] यांस पत्र लिहिलें आहे तरी तुह्मीं चिरंजीवास सांगोन याचे गांवची घालमेल कोण्हीं करतील तर करूं न देणें. सुदामतप्रमाणें गांव याजकडे चालवित तें करणें. चिंतामण हरीस ताकीद करवणें. रा॰ छ २४ जमादिलाखर सुा॰ समान सितैन मया व अलफ. बहुत काय लिहिणें हे विनंति.

---

१ प्रसिद्ध सखाराम बापु. यांच्याच सल्यानें सर्व कारभार होत असे. २ हे कोण? ३ थोरले माधवरावसाहेब. * हे पेशव्यांचे सुभेदार.

## पत्रांक ९२ ( अस्सल प्रो नकल. )

१७६७ ता. १७ नोव्हेंबर. श्री. १६८९ कार्तीक वद्य ११.

चिरंजीव राजश्री राव[1] यांसि. रघुनाथ बाजीराव आशिर्वाद उपरी येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहित जावें. विशेष[2]. मौजे साकेर पो माणिकपुंज हा गांव राजश्री त्रिंबक सुर्याजी याजकडे आहे. तो त्याकडे चालवावा, एविशिंचा करार सालमजकुरी सन समान सितैनांत जालाच आहे. तर आपले जवळ मशारनिलेचे गांवविशीं कोण्ही घालमेल करील, तर त्याचें न ऐकावें. गांव मशारनिलेकडच सुदामत चालत आल्याप्रो पुरळी चाले तें करावें. राजश्री चिंतामण हरी मौजे मजकुरास उपद्रव कीरतात, त्यांस ताकीद करावी. रा छ २४ जमादिलाखर. बहुत काय लिा हे आशिर्वाद.

---

## पत्रांक ९३.

१७६७ ता. २१ मार्च श्री. १६८८ फाल्गुन वद्य ६.

राजश्री चिंतो[3] विठ्ठल गोसावी यांसि

उपरी. महिपतराव जगंनाथ याजवरी नासिकपरगणियाची रयत[4] फीर्याद आली आहे. थोडी बहुत तक्रार केली आहे. थोडी म्हणावी तर फारही आहे. परंतु तूर्त तकरारीचा मजकूर असो. रयतच त्यास रजावंद नाहीं. याजकरितां त्याजकडून मामलत दूर करून दुसरियास सांगावी लागती. तरी कोणी मामलेदार असिला तरी तुम्हीं योजणें. नाहीं तरी हुजरून योजिला जाईल. जाणिजे. छ २० सवाल

रा छ २० सवाल.

लेखनावधिः

---

१. थोरले माधवरावसाहेब. २. पुढील मजकुराचें तात्पर्य पत्रांक ९१ प्रमाणेंच आहे. रवाना तारिखही तीच आहे. ३. रायरीकर. ४. रयतेनें फिर्याद केली किंवा रयत रजावंद [ खुषी ] नसली, तर सरकारांतून मामलेदाराची बदली होई. ही गोष्ट आधुनिक सरकारानेंही लक्ष्यांत ठेवण्याजोगी आहे. हें दादासाहेबांचें पत्र काय ? भाषा दादासाहेबींशी वाटते.

## पत्रांक ९४.

१७६७ ता. १७ नोव्हेंबर श्री. १६८९ कार्तिक वद्य ११.

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री गोविंद शिवराम स्वामी गो॥

पो रघुनाथ बाजीराव नमस्कार विनंति उपरी येथील कुशल जाणोन स्वकीय लिहित जाणें. विशेष मौजे [२]साकरें पो माणिकपुंज हा गांव राजश्री त्रिंबक सूर्याजी यांजकडे आहे, त्याची घालमेल होणार म्हणून विदित झालें. ऐशास इकडे[३] जे रहातील व तुकाजी सिवराम वगैरे यांची गांवखेडीं जीं असतील तीं सुदामत प्रो चालावीं म्हणोन करार जाला आहे. त्यास करारा[४]बमोजीब मशारनिलेचा गांव वगैरे जे इकडे आहेत त्यांचीं गांवखेडीं जीं असतील तीं सुदामतें[५] प्रों चिरंजीव राजश्री राव यांस सांगोन चालवणें. जाणिजे छ२४ जमालादिखर सु॥समान सितैन मया व अलफ. बहुत काय लिहिणें हे विनंति.

---

## पत्रांक ९५.

१७६८ ता. २९ एप्रील श्री. १६९० वैशाख शुद्ध १३

राजश्रीया विराजीत राजमान्य राजश्री सखाराम भगवंत व गोविंद सिवराम स्वामी गोसावी यांसिः—

पो रघुनाथ बाजीराव नमस्कार विनंती उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहीत जाणें. विशेष. अनूबाई कुलकर्णी मौजे सिनवली तो घोडें पो जुनर इनें हुजूर विदित केलें कीं, "आपले सासरे त्रिंबक कृष्ण व चुलत सासरे नानाजी कृष्ण या उभयताचें मौजे मारचें कुलकर्ण निमेनीम आहे. त्यास नानाजी कुलकर्णी मखमल अलमाचे (?) कैदेंत पडल्यावरी त्रिंबक कुलकर्णी यांणीं मोरो गोपाळ गोळे याचे तीनशें रुो कर्ज घेऊन नानाजी कुलकर्णी यास सोडून आणिलें. त्यापैकीं गोळ्यास दोनशें रुो कमजादा दिल्हे. बाकी शंभर रुपये अजमासें देणें राहिले आहेत. त्यास गोळ्यांनीं व्याजाचे व्याज करून शंभर रुपयांचे पंधराशें रुो केले आहेत. आणि नानाजी कुलकर्णी याच्या पुत्रास नेऊन मौजे मारचें कुलकर्ण कर्जांत लेहून घेतलें आहे. ऐशास नानाजी कुलकर्णी याच्या लेकानीं आपले वाटणीचें कुलकर्ण द्यावें. माझे वाटणीचें कुलकर्ण द्यावयास अधिकार नाहीं व आपल्यावरी बहुतांचें कर्ज आहे. त्यास सर्वांस दामाशाईप्रों ऐवज वतनाचे विक्रयाचा येईल तो देऊन फडशा करावा व मी जोवंत आहें तों माझे अन्नवस्त्राची वेगमी करून वतन घेणें तरी घ्यावें. तें न करितां जबरदस्तीनें वतन घेतलें त्याजमुळें दुसरे कर्जदार तगादे करितात व पोटास अन्नवस्त्र नाहीं. याजकरितां माझा वांटा कुलकर्णाचा

---

१. खासगीवाले. २. हें व पुढील दोन पत्रें दादासाहेब कारभार पाहात नसतां लिहिलीं आहेत. ३. दादासाहेबाकडे. ४. कराराप्रमाणें. ५. नेहमींप्रमाणें.

मजकडे चालता करून कागदपत्र लेहून घेतले आहेत, ते माघारे देवावयाची आज्ञा करावी." म्हणोन. त्याजवरून हें पत्र तुम्हांस लिहिलें असे. तरी सदरहू वर्तमान तुम्हीं वाजबीचे रीतीनें मनास आणून विल्हे लावणें. जाणिजे. छ ११ जिल्हेज सुा समान सितैन मया व अलफ. बहुत काय लिहिणें? हे विनंति.

---

## पत्रांक ९६.

१७६८ ता. २९ एप्रिल. श्री. १६९० वैशाख शुद्ध १३.

अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य राजश्री मोरो गोपाळ यांसिः—

सेवक रघुनाथ बाजीराव नमस्कार सुा समान सितैन मया व अलफ. अनूबाई कुळकर्णी मौजे शिन्नवलि तो घोडे प्रो जुन्नर इनें हुजूर विदित केलें कीं आपले सासरे त्रिंबक कुळकर्णी यांनीं मोरो गोपाळ याचे तीनशें रुपये कर्ज घेतले होते. त्याजपैकीं दोनसे रुा कमजादा दिल्हा-बाकी शंभर रुपये अजमासें देणें राहिले आहेत. त्यास गोळ्यांनीं व्याजाचे व्याज करून शंभर रुपयांचे पंधरासे रुा केले आहेत. आणि आपले चुलतसासरे नानाजी कुळकर्णी याच्या पुत्रास नेऊन मौजेमारचे कुळकर्णाचे कर्जांत खरेदीखत जबरदस्तीनें करून घेतलें. याजकरितां ताकीद जाली पाहिजे म्हणून. त्यावरून येविशीं चिरंजीव राजश्री राव यांस पत्र लिहिलें आहे, तरी तुम्हीं त्यांजकडे जाणें. चिरंजीव वाजबीचे रीतीनें मनास आणवून आज्ञा करितील त्याप्रमाणें वर्तणूक करणें. जबरदस्तीनें वतन घेतलियास कार्यास येणार नाहीं. जाणिजे छ १२ जिल्हेज बहुत काय लिहिणें?

लेखनावधिः

---

## पत्रांक ९७.

१७६८ ता. २९ एप्रील. श्री. १६९० वैशाख शुद्ध १३.

चिरंजीव राजश्री राव यांसः—

रघुनाथ बाजीराव आसीर्वाद. उपरी येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल

---

१. पत्रांक ९५ मधील धनको. २ दादासाहेबांचा वशिला लावून अनुबाई सिनवलीकर इणें आपली दाद लागेल अशी चांगली व्यवस्था केली आहे. शंभर रुपयांचे 'पंधरासे' रुपये व्याजमुद्दलसुद्धां होणें म्हणजे व्याज जबरदस्तच हवें. चुलत्याचें वतन लिहून देण्याला पुतण्याला कोणताही प्रकारचा अधिकार नव्हता. वांटण्या झाल्या होत्या. शिवाय, अनुबाईला अन्नवस्त्र मिळावयास पाहिजेच होतें. या खटल्याचा निकाल कसा झाला असावा बरें?

किहीत जावें. विशेष. अनूबाई कुलकर्णी मौजे सिनवली तो घोडें पो जुन्नर इनें अवगत केलें कीं " आपले सासरे त्रिंबक कृष्ण व चुलत सासरे नानाजी कृष्ण, या उभयतांचें मौजे मजकूरचें कुलकर्ण निमेनीम आहे. त्यास नानाजी कुलकर्णी मखमॅल अलमाचे (?)[1] कैदेंत पडल्यावरी त्रिंबक कुलकर्णी योणीं मोरो गोपाळ गोळे याचे तिनसे रुो कर्ज घेऊन नानाजी कुलकर्णी यास सोडून आणिलें. त्यापैकीं गोळयास दोनसे रुो कमज्यादा दिल्हे. बाकी शंभर रुपये अजमासें देणें राहिले आहेत. त्यास गोळयांनीं व्याजाचें व्याज करून शंभर रुपयांचे पंधरासे रुपये केले आहेत; आणि नानाजी कुलकर्णी याच्या पुत्रास नेऊन मौजे मारचें कुलकर्ण कर्जात लेहून घेतलें आहे. ऐशास नानाजी कुलकर्णी याचे लेकानीं आपले वाटणीचें घावें. माझे वाटणीचें कुलकर्ण घावयास अधिकार नाहीं व आपल्यावरी बहुताचें कर्ज आहे. त्यास सर्वांस दामाशाईप्रो ऐवज वतनाचे विक्रयाचा येईल तो घेऊन फडशा करावा व मी जीवंत आहें तों माझे अन्नवस्त्राची बेगमी करून वतन घेणें तरी घ्यावें. तें न करितां वतन जबरदस्तीनें घेतलें. त्याजमुळें दुसरे कर्जदार तगादे करितात व पोटास अन्नवस्त्र नाहीं; याजकरितां माझा वांटा कुलकर्णाचा मजकडे चालता करून कागदपत्र लेहून घेतले आहेत ते माघारे देवावे." म्हणोन. त्याजवरून हें पत्र आपल्यास लिहिलें असे. तरी सदरहू वर्तमान वाजबीचे रीतीनें मनास आणऊन विल्हीं लावावें. रा। छ ११ जिल्हेज. बहुत कार्य[2] लिहिणें? हे आसीर्वाद[3].

---

## पत्रांक ९८.

१७६८ ता. ४ मे. श्री. १६९० वैशाख वद्य २.

सेवेसी चिंतो विठल सां नमस्कार विज्ञापना. ता। छ १६ जिल्हेज पर्यंत येथास्थीत असे. विशेष. रा। त्रिंबकपंत व नानाजीपंत याचें कुलकर्ण मौजे सिनोली तो घोडें येथील आहे. त्यास नानाजीपंताचे पुत्रानें रा। मोरोपंत गोळे याचें कर्ज होतें. त्यास कुलकर्ण कर्जाचे ऐवजीं लिहून दिल्हें. मोरोपंत यांणीं संध (संधि) पाहून कर्जाकरितां निकड करून, बसऊन, साऱ्या वतनाचा कागद करून घेतला. त्यास नानाजीपंताचे पुत्रानें निमें वतन देणें तरी द्यावें. त्रिंबकपंताचे वांटणीचें घावयासी समंध नाहीं. येविसीचें वाजवी वर्तमान मनास आणून विल्हेस लावावें म्हणऊन श्रीमंतांनीं आपणास पत्र लिहिलें आहे. त्यास आपण वर्तमान मनास आणून वाजबीचे रीतीनें विल्हेस लाविलें पाहिजे. बहुत काय लिहिणें? सेवेसी निवेदन होय हे विनंती.

---

१. 'मखमल अलम' हें काय? २. हस्ताक्षर खाशाचे. ३. दादासाहेबांनीं रावसाहेब, बापु, खासगीवाले इत्यादिकांस पत्रें लिहिलीं आहेत.

## पत्रांक ९९ ( अस्सलबानकल )

१७७० ता. १८ आगष्ट. श्री. १६९२ श्रावण वद्य १२.

राजमान्य राजश्री बाबूराव रामचंद्र गोसावी यांसी:—

सेवक माधवराव बल्लाळ प्रधान नमस्कार. सुमा इहिदे सबैन मया व अलफ. तुह्मांस पेशजी तीर्थस्वरूप राजश्री दादासाहेब यांनीं आनंदवल्लीस केशो गोविंद याजवळ ठेविलें होतें. त्यास केशो गोविंद याचे हिशेबी शिलक नख्त व ऐन जिन्नस वजनी सुपारी वगैरे बाकी उतरली आहे, ते कोण्हीकडे कसकशी दिल्ही त्याचा फडशा जाला पाहिजे. यास्तव हें पत्र सादर केलें असे. तरी देखत पत्र सदरहू बाकीच्या पावत्या (कबज्या) असतील त्या घेऊन हुजूर येणें. जाणिजे. छ २६ रबिलाखर आज्ञा प्रमाण. मोर्तब.

---

## पत्रांक १००.

१७६२ ता. ३० आक्टोबर. श्री. १६८४ कार्तिक शुद्ध १३.

अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य राजश्री त्रिंबक सुर्याजी गोसावी यांसि:—

श्रीा रघुनाथ बाजीराव आशिर्वाद सुा सलास सितैन मया व अलफ. मौजे साकेगांव पाो माणिकपुंज हा गांव तुम्हांस जाहागीर देखील सरदेशमुखी दिल्हा असे. याचा करार रुपये

| | | |
|---|---|---|
| २००० | इनाम दरसालिना | |
| ३००० | तैनात देखील पालखी | |
| | १२०० | कदीम |
| | १८०० | जास्ती |
| | ३००० | |
| ५००० | | |

येकूण पांच हजार रुपयांचा गांव तुम्हांस दिल्हा असे. सदर्हू गांवचा वसूल आकारामुळें कमी झाला तर कच्चा वसूल मनास आणून, तेथील बाबती व मोकासा हरप्रकार ऐवज पुरऊन दिल्हा जाईल. ज्यःजती झाल्यास सरकारांत घेतला जाईल. जाणिजे छ १२ रबिलाखर आज्ञाप्रमाण.

---

## पत्रांक १०१. नकल

१७६२ ता. ३० आक्टोबर श्री. १६८४ कार्तिक शुद्ध १३

अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य राजश्री त्रिंबक सुर्याजी गोसावी यांसि:—

स्नो रघुनाथ बाजीराव आशिर्वाद सुा सलास सितैन मया व अलफ. किले त्रिंबक येथील कारखानिसी पेशजीपासून गणेश सूर्याजी याजकडे आहे. त्याप्रमाणें करार असे. तरी तुम्ही मशारनिल्हेचे हातून कारखानिसीचे कामकाज घेऊन वतेन पावित जाणें. जाणिजे. छ १२ रविलाखर. आज्ञा प्रमाण.

---

## पत्रांक १०२.

### नक्कल अस्सल प्रो मखलाशी श्रीमंत साहेबाची हातची.

१७६४ ता. २० नोव्हेंबर   श्री.   १६८६ कार्तिक वद्य १२.

यादी त्रिंबक सुर्याजी विज्ञापना ऐसीजे सुा खमस.

सेवकाचे गांव जप्त आहेत ते मोकळे करावयार्चा सनदा खानदेश व पाा हवेली मामलेदार व जमिदारास सनदा.

१ कसबे साकरें पाा माणिकपुंज
१ मौजे नरे ताा पाा हवेली
——
२

दोनगांव दौलतीचा बंदोबस्त जाल्या-नंतर तुम्हाकडे चाकरींत दिल्हे जातील.

करार

तूर्त साकरे याची मोकळीक चिठ्ठी देणे.

छ २५ जमादिलावल सुा खमस.

ताा सीमहाल (?) ताा अवचितगड येथील हवाला पुरातन गणेश सुर्याजीचे नांवें चालत आला हा हाली राा बाजी गोविंद याणीं आपले भावाच्या नांवें करून घेतला आहे. तो पेशजी प्रो चाल-वणार धनी समर्थ आहेत. सालिना मोईन

१५० मोईन खुद्द
२४ पोरगा
३६ दिवट्या
तेल वजन पक्के ॥।
दरमहा ॥३॥

मोकळीक सनदा असत.

१ नारोकृष्ण करवे सुभेदार प्रो खानदेश
१ जमीदार
१ मोकादम
——
३

---

## पत्रांक १०३

१७६५   श्री.

पेठ.

यादी अडाण व बलुते मौजे सांकेगांव सन ११७५

वसूल —————————————— रु०

१२ सुतार   १३ डांबार

---

१. ही मखलाशी.

| | |
|---|---|
| ७ न्हावी | ४ पांडु सोनार |
| ७ चांभार | ७ साळी (?) |
| १ गुरव | १२ धनगर |
| १ कुंभार | २ पगु तेली |
| १ परीट | ३ बहिरजी तेली |
| २ मह्‌दू वाणी | २ राणू तेली |
| २ नेमू वाणी | |
| ४६ | ४३ |

८९

पैकी ता॥

६७ शाहा लालास देणें.

बाकी शिलक ठेवणें—रु.२२

१ नरसू तेली

| | |
|---|---|
| यादस्त खिरवी प्रा॥ सेनगांव | मौजे साकीगांव |
| १४ बेलदार | ५ माणकू |
| तपशीलवार | जोगे बाकू |
| २५ लोहार | १ माकाजी |
| मारवाडी | |
| २४ गेठा | १५ मारवाडी |
| २५ रोखा | |
| १ तरवार | १०० बखारी |
| १ छंछ | |
| १ पागोटा | यासी द्येये भाटा पान |
| १४ | १२१ |

१९५ (?) ऐसा ऐवज.

## पत्रांक १०४.

१७६५ श्री. १६८७

हिशोब—रु. ६३[1]

पैकीं पोटखर्च—रु. १३

बाकी—रु. ५०[2]

---

१. हा हिशेब नीट समजत नाहीं. २. येथें ५० रु. बाकी व तपशिलांत ५०॥ दिसते, हें काय?

ता रु.

२५॥ सनगे

५॥ २ बाबजी स्वा

३॥ धर्मदाय

---

५॥

१४ भटीबा

५॥ देशमुख व देशपांडिये वा नारोबाबाजीचे स्वार

---

५०॥

---

## पत्रांक १०५.

१७६७ ता. ४ आगष्ट. श्री. १६८९ श्रावण शुद्ध ९.

दर्या बो मोकदम व समस्त दाहीजन मौजे साकेगांव पा सेवगांव सुा सन ११७७ कारण साहेबाचे सेवेसी लिहून दिधलें ऐसाजे. राजश्री बापूजी नीळकंठ याचे विद्यमानची बाकी सन खमस सितैन व सन सीत सितैन दुसाला गांवाकडे राहिली आहे, त्याचा तगादा साहेबीं केला. त्यास साहेबीं एक कारकून गांवास पाठवावा आणि जरीबा (?) करावें. जरीबाचे रुईनें बाकीचा ऐवज ज्याजकडे देणेंस निघल तैसा साहेबाचे अंमलापासून देऊं. त्यांत अंतर होणार नाहीं. जरीबास आपण योग्य असों. हें लिहलें सही·

छ ८ रावल. निा नांगर.

ह्वा माणकोजी शामराज कुळकर्णी मैाजे मार.

---

## पत्रांक १०६.

१७६७ ता. ११ सप्तंबर. श्री. १६८९ भाद्रपद वद्य ३.

श्रीमंत राजेश्री तात्या स्वामीचे शेवेसीः--

आज्ञाधारक देशमूख व देशपांडे पा सेवगांव साष्टांग नमस्कार विनंति येथील ताा छ १७ राखर पावेतों स्वामीचे कृपा अवलोकनेंकरून सेवकानें यथास्थित असे विशेष. पाागणे मजकुरीं श्रीमंत साहेबी कबूतरा बा पट्टी पेशजीची बाकी शाहाजादी याची, तो ऐन सरकारांत घ्यावासा जाला. त्यावरून आज्ञा जाली कीं, पट्टी करून देणें. राजश्री नारो बाबाजी सुभेदार याजकडे तहशील सांगितली. त्यावरून दुतर्फा जाहागिरदार सिंदे व होळकर याजकडील तहशील वसूल जाली. तनखा दर शेकडा बत्तीसप्रमाणें घेतलें. श्रीमंत राजश्री बापूसाहेबाचे जागिरीनें

गांव तो ऐवज गांवगन्ना यानें देविला नाहीं. सबब कीं तमाम कच्चा अंमल त्यांचा. पन्नास हजाराची वांटणी त्याजकडील. गांवतनखा दरशेकडा बावीसप्रमाणें, त्यांनीं राजश्री यशवंतराव गंगाधर याजकडे आपणापासून दिधले. गांवबगाव तहशील करूं दिधली नाहीं. त्यांनीं आपणापासून दिधले. स्वामीकडील गांवचें काम पट्टीचे राजेश्री राघोपंतबाबापाशीं विल्हे लाऊन दिधले. पंतांनीं बहूत रदबदल सक्त केली. समर्थांचें काम; आमचा उपाय काय? त्यांच्या संतोषास आलें त्याप्रमाणें दर शेकडा एकोणीसाप्रमाणें करार करून दिधला. वरें, समर्थांच्या पायाची जोड आहे. आम्हांस संकटांतून पार करणार आपण आहेत. सारांश, धन्यांनीं आमचे गरिबीवर दृष्टी देऊन स्थापना केली, हा निर्वाह करणार आपण समर्थ आहेत. बहूत काय लिहिणें. कृपा निरंतर असों द्यावी हे विज्ञापि. गांवचा हिसेब व शिवाय परगणे अलाहिदा सेवेसी पाठविला असे. विज्ञापना.

---

## पत्रांक १०७.

१७६८ ता. २५ जानेवारी श्री. १६८९ माघ शुद्ध ६.

श्रीमंत राजश्री मोरोपंत[1] नाना स्वामीचे सेवेसीः--

विनंती सेवक बाबाजी मल्हार कुळकर्णी मौजे साकेगांव पा सेवगांव सां नमस्कार विज्ञापना ऐसीजे.आपण साहेबास विनंती नासीकचे मुकामीं केली कीं मौजे मजकूरचा जिम्मा आपला करून द्यावा. त्यावरून कृपा करून मौजे मार साहेबीं आपले जिम्मा केला. त्यास सन ११७७ सुा सन समान सितैन मया व अलफ या सालची बरहुकूम जमा वसूल जमाबंदीची बाकी ता छ ४ रमजान रुो ५५०७॥ पंचावनसे साडेसात व बाकी सन ११७४ व सन ११७५ पैकीं या सालांत घेणें ठरविले रुो ६०० साडेंयेकोन रुो ६१०७॥ सहा हजार एकशे साडे सात याचा जिम्मा आपण आपले रजावंदीनें करून घेतला आहे. सदरहू ऐवजाचा वायदेबंदीप्रों रोखा आपण राजश्री बाजी विश्वासराव याचा, आजपासून पंधरा रोजा साहेबापासीं पाठवून देऊं. गांवची कमावीस बहुजूर असे. यांत जें होईल ते चौकशीनें अंतर न करतां दाखल करूं. साल हाल दाखल करूं. आयंदे सालची करारवाकई (?) करूं. एक बिघा जमीन पडों न देऊं. रयतेस राजी राखों. पेशतर सालची लावनींत कमी पडली तर जिम्मा आपला असे. छ ४ रमजान सन ११७७. बहुत काय लिहिणें ? हे विज्ञप्ति[2].

मोर्तब

पत्राप्रों साक्ष
नारो केशव हेजीब प्रा नासीक.

रो. सोयेजी पा
मौजे सवदरी प्रा नासीक

---

१. मोरोविठ्ठल? २. जिम्मेदाराला कोणत्या शर्तींवर गाव मिळे, तें सर्व लक्षांत ठेवण्यासारखें आहे.

## पत्रांक १०८.

१७६८ ता. ४ जून श्री. १६९० ज्येष्ठ वद्य ४.

तेरीज एकंदर घुगरी जिन्नस वगैरे मौजे साकेगांव पा। सेवगांव सन ११७७

३।४।= बाजरी, जोरी

१।।।०।२।। बाजरी

१।।३।।।२।। जोरी

---

३।४।=

८२ । हरभरे

८१ ।२ तुरी

८४।।।१।४।। गहूं

८१ ।१।। जोर

८ ।।।०।।। मठ

।३।।।१ करडी

८ ।।।०।।। मुगी

८१।।।१।। साली

---

४।।१।।२।

।।।४८१ वरीचे कुळारे दाणे

---

५।।०।।।०।

---

## पत्रांक १०९.

१७६८ ता. ४ जून. श्री. १६९० ज्येष्ठ वद्य ४

यादि कर्जऐवज गु॥ बाळ ठाकूर सु॥ समान सितैन मया अलफ

रुपये

९३५८४।= पैकीं परभारा ऐवज देवीला वा॥ यादि

२७४१। इमारत कारखाना गवाजी हरी टकले वा॥ यादी.

११८५९।= किरकोळ खर्चास गु॥[१] येसाजी रघुनाथ

९६५५। माहे रमजानांत

२१२०।। माहे सावान

१००० कीत्ता

११२०।। कीता

---

२१२०।।

---

१. वरहुकुम. २. गुजारत.

८३॥= कापड व कागद घडि.

---

११८५९।=
४० हुंडणावलि वा[1]
२७५ रदकर्ज वेंकाजी गोरमाजो याचें देणें होतें तें दिल्हें

---

१०८५००

आदा वा[2] यादि ———— रुपये
३३५००

---

## पत्रांक ११०.

१७६८।६९ श्री. १६९०

यादी ———————————— रुो

११४२१।≈ सन सीत
१२२१।≈ भाद्रपद शुध ५
३२०० कार्तिक शुध ८
२००० कार्तिक वद्य ३०
३००० कार्तिक शुद्ध २
२००० भाद्रपद शुध १

---

११४२१।≈
३००० सन समान चैत्र शुध २ शके १६९० सर्वधारी संवत्सरे.

---

१४४२१।≈
१२१९॥ व्याज बा। हिशेब अकरा हजार चारशें सवा एकवीस तीन आणे याचे ता। सन समान चैत्र शुध २ पर्यंत एकंदर कच्चे रुो दर -॥= प्रो रुो १२१९॥

---

१५६४०॥।≈

---

२९९॥ हवाला अपाजी हरी सन सीतांत रुो ६३८ पौ मा। निलेनीं परभारें घेतले ३३८॥ बाकी वसूल सन समानांत ——रुो

---

१. बद्दल. २. बरहुकुम.

| | | | |
|---|---|---|---|
| २५० | सन | तिसा | वसूल |
| | | २०० | —— |
| | | ५० | —— |
| | | —— | |
| | | २५० | |

२१८॥= जिन्नस

१२१॥ तूप जोडी १॥ तोळे (?) वजन ०४॥

५० तेल जोड्या २॥ तोळे (?) वजन -।=॥

४७।= हरभरे खंडी, १ दर

———

२१८॥=

———

*७६८।=

---

## पत्रांक १११.

१७६८ ता. २७ नवंबर. **श्री.** १६९० कार्तिक वद्य ४.

माहाल कोठी खासगत रोजकीर्द राजश्री चिंतो विठ्ठल सुा तिसा सीतैन मा़ह रजब.

तेरीख छ १६ रोज रविवार उर्फ कार्तिक मास मुा नासिक

जमाई ———

जमा गुा केसो वाडेकर हुकूम-चिटीवरून

००५ तूप

००५ साखर रासी

———

०१०

गुळापैकीं ढेप लिहिली परंतु पावली नाहीं.

ऐन जिनसी खर्च.

भोजन खर्च

गल्ला केली मापे

००१ तांदूळ

००१। कणीक

००। दाळ तुरीची

००= दाळ हरभरे

वजनी वजन

००५ साखर एकंदर

००५ तूप एकंदर

———

* ह्या ७६८।=चा संबंध पत्रांतील यादीमध्यें स्पष्ट होत नाहीं. याद तर अपुरी नाहींना?

००१ जोरी लाईपीठ
००= मीठ
०८= भात पोळ्यास

०१२॥।

देणें धर्मादाव भनंग भिकारी

००। बाजरी
० लंग

००।

देणें माहाल थटोकडे चंदो.

००२। जोरी
० लंग

००२।

रोशनाई खर्च वजन तेले

००॥ दिवा बत्ती वगैरे
००। देवास

००॥।

वाजे खर्च गु॥ सदाशिव भट उपाध्ये घरास जाते समयीं.

| अगला केली | ता॥ | दाळ तुरी | कणिक | दाळ मुगाची |
|---|---|---|---|---|
| ००१॥। | ०॥ | ००१० | ०॥ | ००॥ |
| ००१॥। | ००॥ | ००१० | ००॥ | ००॥ |

वजन गूळ ००१

गला केली

००१॥ तांदूळ
००१॥। कणीक
०० ॥ दाळ तुरी
०० । दाळ हरभरे
०० = मादा
०० । बाजरी
००=। जोरी
०० ॥ दाळ मुगा

## पत्रांक ११२.

१७६९।७० श्री. १६९१

हिशेब राजश्री चिंतोपंत तात्या

———————————————— रुा

| जमा ———————— रुा | | वसूल नावें ———————— रुा | |
|---|---|---|---|
| १२२१।≈ | शके १६८८ भाद्रपद शुध ५ रुजुवाती हिशेब. | १४००० | शके १६८७ पौष शुध ९ हवाला गोविंदराव महादेव. |
| २००० | भाद्रपद शुध १ | १५ | शके ८८ पौष शुध ३ मोहर १ |
| ४९९४ | कार्तिक शुध ८ | २८० | शके ८९ चैत्र वा १० ता सदानंद रोख. |
| १२०६ | कार्तिक वद्य २ | १६८।।।~ | आषाढ शुध १<br>१२१।। तुप<br>४७।~ हरभरे<br>१६८।।।~ |
| २००० | कार्तिक वद्य ३० | ५० | आश्विन शुध १ तेल जोडी २।। |
| १५० | कार्तिक शुध १३ देणें गोविंदपंत ज्याहारखानी यासी. | २५० | शके १६९०<br>२०० आषाढ शुध ९ घरीं रोख दिले मा। सदाशीव लक्ष्मण<br>५० अधीक-श्रावण शुध ५ रोख मा। बापूभट कारखान्यास<br>२५० |
| ३००० | चैत्र शुध २ शके १६८९. | २८३।≈। | शके १६९१<br>५० ज्येष्ट वा ७ तूप जोडी १ मा। बाबा सोगवी<br>२३३।≈। आमलनेरी पागेकडे आश्विन शुध १ |
| १४५७१।≈ | | | |
| | बाकी येणें | | |
| ७५७।।~।।। | | | |

३३०॥= शके ८७ सन हवाला
आपाजी हरी घोडपकर.
६३८ रु.
३१०= रु.

६६९८=
पो वसूल वह्याबा।
३३८॥
बाकी
३१८-॥ दुकान पो कापड
४८॥-॥ शके ८८
४ तिजाई छीट
बंदरी ज्येष्टमास
६॥।=॥ चिरडी १
कार्तिक
४॥ छीट ०।= बंदरी
पौष ता। सदानंद
१२ लुगडें १ ता।
बाबूराव पौषमास
२१०≈ माघ सनगें शाहागडी
९॥।≈ तिवट
११। सेला

२१०≈

४८॥-॥
१॥ शके ९० सेला १
धुवट ता। येसाजीपंत
भाऊ आषाढ
४ शके ९१ पागोटें जेष्ट ता।
रामाजी जनार्दन

५४०-॥
वसूल शके ८९ हस्ते
सदानंद चैत्र शु॥२३
बाकी
येणें ३१०-॥

१५३२९७०॥।*

---

* बेरजेंत चूक नाहींना ? ८० रुपयांची चूकभूल

# पत्रांक ११३.

१७६५ ता. १८ जुलई **श्री.** १६८७ श्रावण शुद्ध १.

खरीदीपत्र शके १६८७ पार्थिव नाम संवछरे श्रावण शु॥ १ गुरुवासर संवत १८२२ सन हिजरी ११७९ सन फसली ११७५ सन जलूसी ५ अलमशाही ते दिवसीं खरीदीपत्र लिखिते बो राजश्री चिंतो विठ्ठल, इबा(बि?)न प्रभाकर जोसी मामले रायेरी, गोत्र अत्री, सूत्र आश्वलायन, यासी खंडो गंभीरराव, उपनाव डाहळे गोत्र रथीतर, शाखा याज्ञवलिकी, सूत्र कात्यायेनी, कानगो सुभे खानदेश, व देशमुख व देशपांडे प्रो[1] असेर व प्रा[1] सावदे वगैरे व कानगोई माहाल संदोपच्यं व शाहगन व सवजीमंडई व हसनपुरा व गुजर येरंडोल, बुलंद-शहर बऱ्हाणपूर, लिहिलें जातें ऐसें कीं सुभामजकुरीं आमची वृत्ती बमोजीब[2] सनद दीवान पातशाई बितपसील.

कानगोई तपसील नेल

६ सरकार

१ सरकार असेर प्रा ३२ पो वजा त्रिंबक नाईक बीन दत्ताजी नाईक आधारे याचे वतनाचे परगणे २.

१ प्रा रावेर

१ प्रा येदलाबाद

---

२

३० बाकी परगणे

१ सरकार बागलाण

२१ परगणे

५ कसबे देखील टकसाळ व पेठ चोहटा व कासारथळ व भारुडथळ

---

२६

१ सरलार नंदुरवार, परगणे ६

१ सरकार गालणा, परगणे ७

१ सरकार बिज्यागड, परगणे ३३

१ सरकार हंडीये, परगणे २२

---

६

देशमुखी व देशपांडे पण बिता

२ देशमुखी देशपांडे परगणिये

१ प्रा असेर

१ प्रा सावदे

३ देशमुखीचे माहाल बितपसील.

१ प्रा जामोद

१ प्रा मानरोद

१ प्रा डागरी

---

३

२ देशपांडेपणाचे माहाल बितपसील.

१ प्रा वरणगांव

१ तपे[3]पोल प्रा रावेर

---

२

---

७

ता.

६ परगणे

१ तपे[3]

---

७

---

१. परगणे. २. प्रमाणें. ३. तरफ?

१ किल्ताबुलंदशहर
६ बन्हाणपुर सायेर माहाल
१ संदेपचंग
१ शाहागन
१ मगे चबदरात
१ सबजी मंडई
१ हसनपुरा
१ गुजर येरंडोल

———

६

———

७

———

१३२
ता
१२२ परगणे
५ कसबे
५ सायेर

———

१३२

येकूण कानगोईचे परगणे १२२ व कसबे ५ व सायेर माहाल ५ व देश- मुखी देशपांडीयेपण माहाल २ देशमुखी परगणे ३ व देशपांडीये परगणे १ व तरफ १ येणेप्रों आहे. त्यास राज्याचे हालीमाजीचे विज्वरामुळें शिरस्ता मोडत. आला आणि हक्क–दस्तुम ही झाडोन उगवेना. सबब नादारीस आलों आणि लोकांचे कर्जदारी जाहलों. म्हणोन मनीं विचारिलें कीं सदरहू वृत्तीपों कांहीं वृत्ती कोन्हास द्यावी म्हणजे लोकांचे कर्जाचा मार्ग होऊन आपली दस्तवारी होईल. ऐसें ध्यानास आणिलें. तेव्हां तुम्हांपासीं येऊन आपलें नादारीचें वृत्त साध्यांत[२] सांगोन कानगोईचे वृत्तीपों निमे वृत्ती तुम्हीं घेऊन आम्हांस देणेदारांपासोन मुक्त करावें म्हणोन वजीद होऊन सांगितलें. त्यासीं तुम्हीं मान्य केलें. त्याजवरून आपले कुलवृत्तीपों कानगोई निमे तपसील नेलप्रों (?) राजी–रजावंद होऊन फरोख्त केली असे. तपसील नेल

| | |
|---|---|
| १ सरकार असेर २१ परगणे ३० पों खासगत जमीदारीचे व कानगोईचे परगणे | १ सरकार बागलाण परगणे वगैरे २१ परगणे २१ ५ कसबे व देखील टकसाळ व |

२. सायंत.

६ देशमुखी व देशपांडेपण मये कानगोई पो
   १ पा असेर
   १ पा सावदे
   १ पा जामोद
   १ पा डांगरी
   १ पा वरणगांव
   १ मानरोद
   ---
   ६
३ कानगोईचे माहाल
   १ प्रा जेनपूर
   १ प्रा नमेद
   १ पा उत्राण
   ---
   ३
---
९
   बाकी परगणे २१
   ---
   २१
१ सरकार बिच्यागड परगणे ३३
---
२
---
५४

पेठ व चबदरात व कासारथळ व भारुडथळ
---
२६
१ सरकार नंदुरबार, परगणे ६
१ सरकार गालणे, परगणे ७
१ सरकार हंडीया, परगणे २५
---
४
---
६४
---
११८
ता.
११३ परगणे
  ५ कसबे
---
११८

येकूण सरकार ५ व दरोबस्त परगणे ९२ व कसबे ५ व साहवी सरकार असेर पो परगणे २१ येथील कानगोईची वृत्ती निमेनीम खुश रजावंदीनें तुम्हांस दिल्ही. त्याची किंमत रुो १०००१ अक्षेरी दाहा हजार येक रुो चे निमे पांच हजार आठ आणे याचे दुणे घेऊन तुम्हांस फरोख्त केली असे. तरी तुम्हीं दिल्या वृत्तीचा अनभव पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें घेत जावा. आम्हांस दिल्या वृत्तीसी अर्थाअर्थी समंध नाहीं. आम्ही अगर आमचे वंशामधें कोणी मुंजाईक (म ?) जाला तरी बातल असे. सदरहू वृत्तीसंमधें समाईक वृत्ती आहे तोंपावेतों दफ्तर सिरस्त्याचे दिवानकचेरींत येक समाईक राहील. कामकाज परस्परें तुम्हीं आम्हीं येक विचारें करूं. माहालानिहायचे कागजपत्र व मोवजने वगैरे पूर्वील पध्दतीप्रमाणें सिरस्ता येईल

तो अखेर-साल जाल्यावर येक सालचा दरोबस्त तुम्हांपासीं अनामत ठेवणें व येक सालीचा आम्हापासी ठेऊं. विडा सिरपाव वगैरे माण (मान) आहेत ते व नवे होतील ते वडीलपणें आदीं आम्हीं घेऊं, मग तुम्हीं घेणें. दसकत आदीं आमचें नांव व मग तुमचें नांव लिहून आम्ही करूं. समाईक वृत्ती चालेल तोंपरियंत याचप्रमाणें चालवावी. पुढें वाटणी जाली तरी तुमचे परगणियाचा कागजपत्र मोवजना वगैरे सिरस्ताप्र्या-प्रों दिवाणकचेरींत दप्तर तुमचें तुम्ही ठेवणें. व दसकत आदीं आमचें नांव व मग तुमचे नांव लिहून तुम्ही करीत जाणें. आमच्या वाटणीचें कागजपत्र मोवजने वगैरे सिरस्त्याप्रों दिवाणकचेरींत आमचें आम्हीं ठेऊं व दसकत आदीं आमचे नांव मग तुमचें नांव लिहून आम्हीं च करूं. वाटणीचे अगोदर सिरस्ता व कागज-पत्र तुम्हांपासीं व आम्हांपासी राहील तें व वाटणीच्या परगण्याप्रों साल दरसाल वाटून घेऊं. कागज सुभामजकूरचा कोठें देणें पडला तरी तुम्हीं लिहून तयार केलियावर येकुनात आम्ही व दसकत आदीं करूं. मग तुमचें दसकत जाल्यावर तुम्हीं आम्हीं समागमें राहून कागज आम्ही आपल्या स्वहस्तें देऊं. व दस दस्तुर वगैरे वतनसंमंधें उत्पन्न होईल तो निमे तुम्हीं घ्यावें व निमे आम्ही घेऊं. हें खरीदीपत्र लिहलें. सही[१] ता। छ२९ मोहरम सु॥ सन सीत सितैन मया व अलफ.

---

## पत्रांक ११४ नकल.

१७६७ ता. ३१ आक्टोबर. श्री. १६८९ कार्तिक शुद्ध ९.

राजश्री देशाधिकारी व लेखक वर्तमान व भावी

सुभे खानदेश गोसावी यांसिः—

छ अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य

स्नो. माधवराव बल्लाळ प्रधान आशिर्वाद[२] व नमस्कार सु॥ समान सितैन मया व अलफ. शके १६८९ सर्वजित्नाम संवत्छरे. विंतो विठ्ठल जोशी राईरकर व खंडो गंभीरराव उपनाम ढाबाले कानगो सुभे मा॥र याणीं हुजूर मौजे गंगापूर पो॥ नाशिक येथील मुकामीं येऊन अर्ज केला कीं पुर्वीं मोगलाई अमलांत शहर बराणपूर येथें पादशाई दिवाण राहून कारभार होत होता. त्याजमुळें सुभे मज-कूरचा कागदपत्र शिरस्ते आमचें दप्तरीं पोहोचोन काम-काजाचे अन्वयें हकरुसूम यथास्थित पाऊन जमीदारीचा शिरस्ता उत्तम प्रकारें चालत होता. उप्रांतीक अवरंगाबादेस सुभे मजकूरचा कारभार होऊं लागला. तेव्हां पासून व अलीकडे सरकारांत अंमल आल्या पासून कागदपत्राचा शिरस्ता दप्तरीं पोहचत नाहीं व हक-रुसूम पावत नाहीं. याजमुळें आमचे जमिदारीचें कायदियास अंतर पडिलें.

---

१ सही. २ मराठे व ब्राह्मण देशाधिकाऱ्यांत असतात, म्हणून अनुक्रमें आशीर्वाद व नमस्कार आहे.

आपण तेथील सविस्तर मजकूर वरचेवर लिहून पाठवीत जावा * व श्रीमंतास पत्रें लिहिलीं आहेत हीं पाहून द्यावयाचीं असतील तीं बाजीपंताकडून देवावीं आपण राजश्री आण्णास लिहित जावें म्हणजे ठीक पडेल नाहींतर मी येथें असतां त्याणीं अविचारीं उगीच मारझोड करावी ते आम्हीं पहावी येणें करून कसें दिसतें यास्तव लिहिलें आहे निरंतर स्नेहवृद्धि करीत जावी लष्करचे कागद गेले किंवा नाहीं हें लिहून पाठवावें बहुत काय लिहिणें लोभ असो द्यावा हें विनंति आमच्या पत्रांत तुम्हांस श्रीमंतांचे दोन कागद होते ते पाठविले असत हे विनंति तिसरा कागद ऐवजाचे मजकुराचा तो हि पाठविला आहे त्यास नेमणूक ऐवजाची करून बाकी दाहा लक्ष काढली आहे त्याचा तपशील बाजीपंताजवळ आहे तो पाहावा त्या पौ कांहीं ऐवज रावसाहेबाकडे देतील तर पुसावें हे विनंति

---

## पत्रांक १६

पो छ ५ रबिलावल **श्री** शके १६८६

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री ताल्या स्वामी गोसावी यांसि पोष्य त्रिंबक सदाशिव कृतानेक नमस्कार विनंति उपरि येथील कुशल जाणून स्वकीयें कुशल लेखन केलें पाहिजे विशेष तुमचीं पत्रें पावलीं सविस्तर कळलें कुरणाविसी लिहिलें त्यावरून श्रीमंतांस विनंति केली त्याचीं उत्तरें दोन पाठविलीं आहेत पावलीं असतील सारांश तुमचीं कुरणें खासगत खडकवासलें वावरन हीं कुळाकडे करार राखिलीं आहेत अण्णाकडील पांच कुरणें पैकीं तीन सरकाराकडे घेतलीं दोन अण्णाकडे पाषाणाचें व कुडच्यांचें राखिलें तीन कुरणें सरकारांत घेतलीं त्यांचा मोबदला अंबी नाणेमावळची येथील दिल्हे आहे असें नेमणुकेंत लिहिलें आहे त्यास तिन्ही कुरणें जीं घेतलीं तीं तूर्त कारभारियांनी मर्जी-स्तव देतां नये असें बोलण्यांत आहे पुढें तजविजीनें होईल असें बोलतात त्यास लिहिल्या प्रों कुरणें जीं राखलीं आहेत हीं हि चालतात किंवा अटकाव आहे हें नीट उमजून ल्याहावें म्हणजे ताकिदी पाठऊन देऊं तुमची पागा हिंदुस्थानांतून आली आहे त्यास बरी आहे ऐशास येथें द्वारकोजी निंबाळकर याजकडे बोली म्हणाल तर होत आहे तीनशे रुपये निवळ शेरानालबंदी तिजाई शंभर याप्रमाणें आहे जर सोईस येत असेल तरी पागा तयार करून भाद्रपद अखेर पाठवणें लिहिल्या प्रा निकाल करून घेऊन येऊं गोपाळरावाकडे ऐवजाविशीं फार बोलणें शेवट असा प्रकार तूर्त तीस हजार देवितात मंगळवेढ्यावर चिठी वीस हजार आश्विनमासीं देतात बाकी मार्गशीर्षमासीं देऊं म्हणतात राजश्री परशरामभाऊकडील पंचवीस सो देतो

---

* येथून अक्षर नानाफडणीसांचें

असें आहे बहुत निकडीचे प्रकार गोपाळरावांसीं बोललों परंतु त्याचा ही शेवटाळ जावसाल हा आहे याचें उत्तर पाठवणें जो वसूल येईल तो घेतों इकडील वर्तमान तर हैदरनाइकाकडील राजकारण सलुखाचें होतें आज दीडमहिना घोळलें शेवट लवाड कारभार तो सल्ला करीत नाहीं साफ याप्रमाणें जाहालें या उपरि श्रीमंत दादासाहेव लवकर येतील पारिपत्य होईल मजकूर काय आहे परंतु तूर्त असा प्रकार आहे महादजी शिंदे हिंदुस्थानांत गेले दहा बारा हजार फौज जमा आहे मल्हारबा ते एक जाहाले पुढें जबरदस्ती पाडावी असें आहे हें वर्तमान तुम्हांस तेथें कळत च आहे कऱ्हाडाकडे माहुलीकडे भूमिकंप जाहाला हे वर्तमान तुम्हांस कळलें असेल च वरकड वर्तमान यथास्थित आहे आम्हीं नवी घोडी साडेपांचशा रुपयास एक विकत घेतली कां घेतली म्हणाल तरी पांच घोडे थोरले च लष्करांत येथें मेले म्हणून घेतली तुमच्या पागेंतील भीमा घोडी रोग होऊन मेली वरकड सारी पागा वरी आहे जयरामपंत चाकरी चुकरी चांगली करितो बारगिरानीं कामकाज चांगलें केलें चार घोडीं हैदरनाइकाकडील आणलीं शेंदोनशें गुरें आणलीं वरें आहे कर्ज हा कालवर केलें नाहीं आम्हीं एक गाय जयरामपंतापासून चांगली आपल्यास आणिली तुम्हास समजावें तुमचे येणें कधीं होइल हें ल्याहावें राजश्री नारोपंत पाळंदे यांचे लेकास लग्नसमई घोडी दिल्ही नाहीं देऊ केली आहे त्यास मुलाजोगी घोडी चांगली तुम्हीं तिकडे पागेंतून एक द्यावी सावनुरांत होते ते आले कळावें रा श्रावण वद्य दशमी मुा नजीक कितूर लोभ असो दीजे हे विनंति

स्नेहांकित अंगोजी जगथाव रामराम

---

## पत्रांक १७

पेाा छ ९ जिलकाद **श्रीआईआदिमायाप्रसन्न**

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री गोविंदपंत स्वामी गोसावी यांसि सेवक श्रीनिवास गंगाधर प्रतिनिधी नमस्कार विनंति उपरि येथील कुशल जाणून स्वकीयें कुशल लेखन केलें पाहिजे विशेष सांप्रत तुम्हांकडून पत्र येऊन वर्तमान कळत नाहीं त्यास इष्टत्वास हे गोष्ट उचित कीं काय याउपरि वरचेवर पत्र पाठवून परामृश घेत असावा इकडील वर्तमान सविस्तर राजश्री आप्पाजी गंगाधर कारकून याजबाा सांगून पाठविलें आहे हे सांगतां कळोन येईल त्यासा तुम्हीं त्या प्रसंगीं आहा इकडील सर्व अगत्यवाद आपणास आहे जो बंदोबस्त करणें तो उत्तम प्रकारें करून साद्यावरीं पडे ती गोष्ट केली पाहिजे सर्व भरवस आपला आहे बहुत काय लिहिणें हे विनंति

---

# पत्रांक १८

श्री

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री तात्या स्वामी गोसावी यांसि

पोष्य त्रिंबक सदाशिव कृतानेक नमस्कार विनंति उपर येथील कुशल जाणून स्वकीयें कुशल लेखन केलें पाहिजे विशेष तुमचीं पत्रें दोन तीन आलीं सविस्तर अवगत होऊन बहुत आनंद जाहला तेथील प्रकार सर्व लिहिले ते कळले तुमचें पत्र च श्रीमंतांस गाठून एकांतीं वाचून दाखविलें उत्तर कसें लिहूं म्हणून विनंति केली उत्तर केलें नाहीं तात्या या मर्जीचे प्रकार कसे सांगावे प्रसन्नता चित्त एकंदर नाहीं चिरंजीव बजू येथें आहे त्यासी कधीं बोलावावें हा प्रकार नाहीं मग जेवण-खाणाची सय जाणत च आहां याप्रकारें आम्हांसीं चौपाचा रोजा सहजांत उगे च स्मरण जाहालें तरी बोलावितात किंवा स्वारीत चालते वेळेस जवळ बोलावितात कारभाराची गोष्ट मनसवा विचार पुसत नाहींत सांगत नाहींत आम्हीं मध्यें असें करीत होतों कीं न बोलावितां जावें बोलावें वर्तमान सांगावें कांहीं पुसावें असें महिना दोन महिने केलें परंतु मळमळित प्रकार च दिसूं लागला चांगलें आर्त धरून बोलावें सांगावें हें नाहीं याचवरून चित्त उदास राहातें जुंजाचे दिवशीं मेहनत पुढें होऊन करावयाची ते केली सखाराम च होते त्यांस सोडलें नाहीं गोळ्याचा मार व गोळीचा मार खाऊन उभे होतों असो कोण पुसतो आहे रागापाशीं आम्ही जातों येतों याजवरून सकारनामकांनीं वाईट मानलें चर्चा हि केली आम्हांसी ठीक नाहींत आमचें काम येथें आलियावर मुतालकीच्या वर्षासनाच्या चिठ्यामात्र दिल्या व शिरवळचें कुरण चार दिवस आमचीं कुरणें सुटत तोंवर दिलें आहे वरकड कामकाज तिकडे आलियावर होईल हा आशिर्वाद आहे दुसरें एक काम तुम्हीं शहरचे तळावर रायास हटकलें होतें पुण्यास गेल्यावर करून देऊन म्हटलें होतें तें मात्र जाहालें नीट समजा उलगडून पत्रीं लिहितां नये तुम्हांकडे तीन चार पत्रें आमचीं गेलीं पावलीं न पावलीं हे ल्याहावें म्हणजे संशय दूर होईल सौभाग्यवतीस तेथें आणिलीत पांड्स आणलें उत्तम केलेंत श्रीमंतांनीं उत्तर लिहिलें आहे त्याजवरून कळेल आम्हांस सांगितलें कीं तुम्हीं तात्यास ल्याहा कीं तुमचेविशीं दुसरा प्रकार नाहीं सविस्तर लिहित जाणें तीर्थरूपांची मर्जी रास्तीत जाणें असें ल्याहावें म्हणून सांगितलें ती चिटी च तुम्हांकडे पाठविली आहे आवाकडील गजकूर तरीं नारो आप्पाजी कृष्णराव पारसनीस यांनी विद्यमानता करार आहे कीं घेतला वसूल द्यावा त्यांत पुरंदरचे खंडणीचे पट्टीचे रा बारा हजार आम्हीं द्यावे असें करारांत असतां लटकें बोलून निघून गेले गतवर्षीचे न संदानें वर्षे दोन वर्षांचा वसूल घेतला आहे चौपांनीं सांगावें तें ऐकावें हा करारमदार असतां असें लटकें बोलावें तमाम गांव लुटले गवतें नेलीं कापलीं दाणे नेले नेत न आहेत सर्व मुला

कारभार जेव्हां श्रीमंत दादास निखालस आमचे हातीं कृपा येईल तेव्हां ध्यानांत येईल मग होणें तें होईल नाहीं तर कांहीं होत नाहीं त्याजी किती सोसावी तिकडे आल्यावर होणें तें होऊं तुम्हीं हा मजकूर दादासीं बोलावयाचें जाहलें तर बोलावा हे विनंति रा। वैशाख शुद्ध पूर्णिमा मु॥ रहेकुरी प्रांत सावनूर हैदरनाईक मायनेहल्लीस झाडींत गेला श्रीमंत फौजा सज्या करून भोवनाले जाणार छावणी होईल कीं काय कळेना लष्करांत महागाई फार आहे निजामअली कृष्णातीरास येणार असें वर्तमान आहे हे विनंति

---

## पत्रांक १९

श्री भाद्रपद वा। १२ शके १७२१

श्री
स्वामी नृसिंहचरणीं तत्पर
रामचंद्र शीवाजी निरंतर

दस्तक राजश्री रामचंद्र शिवाजी ता। चौकीदारान व रहदारान व वाजे-लोकान व जकातीमहालान व नावाडी-पेठेकरीयान व मोकदमान देहाय मु॥ मया तैन व अलफ राजश्री गोविंदराव नीलकंठ यांनी पागा किल्ले सोलापुरी चारणीस आहे त्यांपैकीं घोड्या तीन व तट्टे चार एकूण रास ७ सात पुण्यास जात आहेत समागमें राणू खासदार व पोरें वगैरे माणसें आहेत हीं जातील त्यांस मार्गी जकातीविशीं वगैरे हरएक-विशीं उपसर्ग न करितां जाऊं देणें वस्तीस राहातील तेथें चौकीपहारा करून नदी नाला वगैरे आपलाली हद्द पार करून देत जाणें जाणिजे छ २५ रविलाखर मोर्तबसुद

श्री
मोर्तब
सुद

---

## पत्रांक २०

श्री माघ वा। ६ श. १६९९

० श्री ०
राजाराम नरपतिहर्षनिधान
माधव नारायण मुख्य प्रधान

आज्ञापत्र राजश्री पंतप्रधान तां मोकदम मौजे पाटेठाण ता। सांडस प्रांत

पुणें ह्या सनान सबैन मया व अलफ मौजे नार हा गांव सालमजकुरापासून राजश्री नीलकंठराव गोविंद यांस तैनातेंत करार करून दिल्हा असे तरी नारनिलेले रुजू होऊन अंमल दुरुस्तीत देत जाणें जाणिजे

छ १८ मोहरम पा हुजूर

बार

लेखन
सीमा

---

## पत्रांक २१

### श्रीशंकर

राजश्री गोविंदराव तात्या स्वामीचे सेवेसी

विनंति उपरी राजश्री गोपाळरावाकडील पत्रें घेऊन जासूदजोडी आली आम्हीं आपलें पत्र घेतलें बाकी सा लखोटे तुम्हांकडे पा व जासूदजोडी हि पा आहे पत्रा-वरून सर्व मजकूर कळेल तुम्हीं भोजन करून जरूर नाशकास येणें तुम्ही आम्हीं बरोबर व येथून चावडसेस जाऊं जातानां काल रामचंद्रपंत गोरे जागा सांगत होते ते हि पाहून जाऊं त्यांस हि बा जरूर येऊन यावें माहादाजी गोविंद यांचे पुत्र व भास्करपंत यांस आम्हीं बलाऊ पा होते त्यास ते प्रातःकाळी व श्रीमंतांकडे गेले त्याउपर आम्ही हि भोजन करून चावडसेस येणार तुम्हीं आल्यास तुम्ही आम्हीं व रामचंद्रपंत गोरे व मल्हारी ससाणा ऐसे जाणती व जागा कोठे दिसती जवळची हि जातानां पाहून जाऊं म्हणजे लौकर स्थलनिश्चय जाल्यानें सोई पाहून नेमें बंगला वगैरे करणें तें करतील यास्तव रामचंद्रपंतास घेऊन तुम्हीं आज उभयतां आले पाहिजे जरूर लौकर यावें तुमची मार्गप्रतीक्षा दोनप्रहरपर्यंत करितों तुम्ही पुढें जाणार पा तरी आम्हीं इकडून येऊं ठिकाणी गाठ पडेल हे विनंति

---

## पत्रांक २२

पो छ ८ जिल्काद

### श्रीशंकर

राजश्री गोविंदराव तात्या स्वामीचे सेवेसी

पोष्य विश्वासराव त्रिंबक नमस्कार विनंति उपरी श्रीमंत राजश्री रामराजेयां-कडून पत्रें आलीं त्यांत तुमचे नावची होती तीं व धाकटे मामाचें पत्र पुरवणीपुर्वी घेऊन पांच पत्रें तुम्हांकडे पाठविली आहेत त्यांचे उत्तरें आम्हांकडेस न पाठवून दाखवी आमचे लखोटयांत व सारी पत्रें हे ... मैमै येऊ न ... करून सरकारचा खिजमतगार आला आहे त्या समागमें रवाना करणें उत्तर जलदीनें पाठवावें बहुत जप लिहिलें श्रीमंत नाराज होतील तुम्हीं समजावें न ... मनाहून येणें होईल हे लिहून पाठवावे हे विनंति

---

## पत्रांक २३

श्री पौष वा। १४ शके १६८६

राजश्रीया विराजित राजमान्य राजश्री परशराम रामचंद्र स्वामी गोसावी यांसि पोष्य माधवराव बल्लाळ प्रधान नमस्कार विनंति उपरि येथील कुशल जाणून स्वकीयें कुशल लिहीत जाणें विशेष मौजे हिपरगें पा। जमखंडी हा गांव तुम्हांकडून दूर करून सालमजकुरापासून राजश्री गोविंद शिवराम यांच्या स्वारास सरंजाम करार करून देऊन हे सनद तुम्हास सादर केली आहे तरी मौजेमजकुर टाणेंसुद्धां मशार-निलेकडील कमाविसदाराचे हवालीं करून पावल्याचे कबज घेणें जाणिजे छ २१ रजब सुा खमस सितेन मया व अलफ बहुत काय लिहिणे हे विनंति

वार

---

## पत्रांक २४

श्री

दस्तक सरकार राजश्री पंतप्रधान तां कमाविसदारांन व चौकीदारान व रहदारान व बाजेलोकान व जकाती माा निहाय सुा इहिंद्द मया तैन व अलफ राजश्री गोविंदराव नीलकंठ यांचे तेल व तूप जोडया सुमार २० वीस हरएक जागांतून खरेदी करून पुण्यास आणितलि त्यास आणूं देणें जकातीचा तगादा न करणे जाणिजे छ १७ मोहरम आज्ञार्थ जाण

(मुद्रा:) श्री
राजा शाहु नरपतिहर्षनिधान
बाजिराव रघुनाथ प्रधान

लेखन
समि

---

## पत्रांक २५

श्री पौष वा। ७ शके १६९९

(मुद्रा:) श्री
श्रीराजाराम नरपतिहर्षनिधान
माधवराव नारायण
मुख्य प्रधान

आज्ञापत्र राजश्री पंतप्रधान तो मोकदम मौजे पाटेटाण तां सांडस प्रांत

पुणें सुा समान सबैन मया व अलफ मौजे मजकूर येथील अंमल राजश्री रामचंद्र नारायण यांजकडे होता तो दूर करून सालमजकुरापासून राजश्री नीलकंठराव गोविंद यांस तैनातेंत करार करून दिल्हा असे तरी मारनिले यांस रुजू होऊन अमल सुरळीत देणें जाणिजे छ २० जिल्हेज आज्ञाप्रमाण

लेखन
सिमा

## पत्रांक २६

श्री                कार्तिक शुा ६ श. १६९२

अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य राजश्री त्रिंबक रघुनाथ कमाविसदार को तळेगांव ताा पावळ प्रांा जुन्नर गोसावी यांसि

सेवक माधवराव बल्लाळ प्रधान नमस्कार सुा इहिदे सबैन मया व अलफ कसवें मजकूर येथील कुरण भीमेचे न्याहारचें वचंकुलीसुद्धां राजश्री गोविंद शिवराम यांजकडे गैरसनदी होतें म्हणोन पेशजी दूर करून तुम्हांकडे दिल्हें होतें तें हालीं तुम्हांकडून दूर करून मशारनिलेकडे करार करून हे सनद तुम्हांस सादर केली असे तरी सदरहू कुरण मशारनिलेचे स्वाधीन करणें जाणिजे छ ४ रजब आज्ञाप्रमाण

लेखन
सिमा

## पत्रांक २७

श्री                वैशाख शु. ९।१७१८ (?)

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री गोविंदराव तात्या स्वामीचे सेवेसीं

पोष्य बाळाजी जनार्दन साष्टांग नमस्कार विनंति उपरि येथील कुशल ताा छ ७ जिलकाद पावेतों वर्तमान यथास्थित असे विशेष किल्ले पुरंदर दगा करून जुन्यालोकानीं वैशाख शुद्ध पष्टीस घेतला हवालदार व सरनोबत व येकदोन कारकून वगैरे दहावारा माणूस किल्यावरील ठार पडले राजश्री धोंडोबा आप्पाकडील सिनाजीपंत कविलेसुद्धां जुन्यालोकांबराबर वरता गेला यांत काय गारूड आहे हें समजत नाहीं तिकडील वर्तमान विशेष असेल तें जरूर लिहून पाठवावें बहुत काय लिहिणें लोभ असो द्यावा हे विनंति*

---

* सदंद पत्र नानाफडणिसांच्या हातचें

## पत्रांक २८

पो छ २ जिल्काद श्री

पुा विनंति उपरि श्रीमंतांनीं तुम्हांस पत्र लिहिलें आहे उत्तर सविस्तर लिहून पाठवावें साताऱ्याकडील प्रकाराचें तेथें संभाळावें येविशीं श्रीमंतांनीं तुम्हांस लिहिलें आहे उत्तर ल्याहावें हे विनंति राजश्री मुरारराव घोरपडे श्रीमंतासंन्निध येणार गुत्तीहून निघाले असें वर्तमान आहे सावनूरवाले पठाण श्रीमंतास सामिल होतात येथून उदेक कुच करून सावनूराकडे जाणार आहेत सारे सामिल करून घेऊन पुढें जावें हैदरनाईक बाहेर आला तरी लढई प्राप्त च जाहाली झाडून सोडिली तर हे छावणी करणार दुसरा प्रकार कांहीं हैदरनाइकानें दिल्हें तरी यंदाचे वर्षी घेऊन माघारें फिरावें असें हि आहे हैदरनाइकाचा वकील येथें होता तो कारभारी यानीं घालविला लाऊन दिल्हा याप्रमाणें वर्तमान आहे पुढें होईल तें लिहून पाठवितों आपण सविस्तर ल्याहावें हे विनंति

---

## पत्रांक २९

श्री

राजश्री गोविंद शिवराम यांसि

सा। गोपिकाबाई नमस्कार विनंति ऊपरि तुम्हीं उदईक भोजनास येथें किल्ल्यावर येणें तुम्हीं भुकाळू फार आहा सबब तेथें च फराळ करून येणें अथवा येथें हि फराळास मिळेल सकाळीं च येणें हे विनंति

---

## पत्रांक ३०

श्री

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री गोविंदपंत तात्या स्वामीचे सेवेसीं पो विसाजी केशव कृतानेक नमस्कार विनंति येथील क्षेम ता छ २४ माहे जिल्हेजपर्यंत वर्तमान यथास्थित असे विशेष स्वामीकडून पत्र येऊन सांभाळ होत नाहीं तरी असें नसावें सदैव पत्रीं सांभाळ करावा उभयतां श्रीमंत स्वस्थलास आले आजिपर्यंत मार्गप्रतीक्षा करीत होतों पेसजी थोरले श्रीमंत यांस विनंतिपत्र व कचें वर्तमान लिहून पाठविलें होतें त्यावरून धनी मेहरवान होऊन सेवकांस कौल सादर केला तो ताइतांत घालून हृदई धरिला आहे मागें राजश्री राजाराम गोविंद श्रीमंतीं आमच्या पारपत्यास रवाना केलें त्यानीं येऊन प्रज्यांस पीडा बहुत केली गडकारियाचे कबिले कितेक धरिले बायकापोरें यांस हाणमार करून घालविले पोरें सराव्यांवर टाकिलीं कितेक नागवणा घेऊन सोडविलीं

गांव लुटून जाळून उध्वस्त केले वीसपंचवीस जुझें झुंझले इतकें हि सोसून आजि-पर्यंत धण्याच्या पत्रावर खुशाल होते प्रस्तुत धणी गांवास आले आमचें आर्जित करून साम्राज्य करितील अशामध्यें धणी आल्यावर सासवडचे फौजेनें होते गांव ते जाळिले आणखी हि जाळितात पुढें काय करितील हें नकळे तस्मात् धन्यानें कौल दिल्हा आणि प्रस्तुत अवकृपा दिसती याजवरून वहुत अपूर्व वाटलें कां कीं धनी समर्थ सत्यवक्ते एकवचनीं रामचंद्र अवतार त्यांचा कौल असतां काळा-दिकांचे हि भय नसावें आणि धनी च दुसरी गोष्ट वोलतात हें च अपूर्व आहे तस्मात् पूर्वी यवनास मिळोन राज्यक्रांत केला पुणें जाळिलें सर्व प्रांत लुटून दहन केलें इतके अन्याय क्षमा करून शेवटीं धनीं एकवचनीं म्हणोन त्यांस दौलता देऊन साम्य करून आपलेसे केलें सीहींगडीं पांचा क्रोडींची दौलत व धन्याचीं पुस्तकें व सर्व राज्याचे हिशेब एकदां च यवनास दान केले ते च मातबर कारभारी धनी घरास आल्यानंतर त्यांचा च गौर केला असें असतां इतके धनी कृपावंत म्हणून आम्ही कौल खरा हें जाणोन अमरप्राय मानीत होतों प्रस्तुत कौलाचें प्रमाण दिसे ना तेन्हां अमरत्व नाहीं क्षणभंगुर असें दिसोन आलें परंतु हा वाह्यरंग दिसतो अंतरंग भिन्न आहे एकवचनें लंका बिभीषणास दिल्ही असतां अंगदानें रावणाची स्नानशिला दिव्य घेऊन आला मग जांबुवंतास पुशिलें त्याणें निषेध करितां च शिला स्वस्थानीं नेऊन ठेविली ते च अंशांशें रघुनाथ अवतार यांचें पत्र मोहरेनसी आहे तें लटकें कसें होईल यद्यपि धनी उगें च भाव गर्भ पहात असिले तरी सेवक पदरींचे च आहों प्रसंग पडल्यास चंद्रावरासारिखें होईल वरकड सेवकांपासून सेवा घ्यावी आम्ही केवळ अप्रयोजक असें नाहीं त्याहिमध्यें निकामी असें आढ-ळोन आलें असेल परंतु येकसमई लघुकार्यास तन्हीं उपयोगी होऊं स्वामींच्या पत्राची नकल करून सेवेसीं पाठविली आहे ही अवलोकन करून मनन करावें आपण सर्व–जाण स्वामी–विश्वासूक आहेत यास्तव लिहिलें आहे पत्राचें उत्तर पाठवावें वहुत काय लिहिणें लोभ असो द्यावा हे विनंति

---

## पत्रांक ३१

पो छ १९ रमजान श्री

तीर्थरूप मातुश्रीबाई वडिलांचे सेवेसीं

अपत्यें माधवरायानें चरणावरी मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विज्ञापना येथील क्षेम ता छ७ रमजान मु॥ वटवरी येथें वडिलांचे आशिर्वादेंकरून सुखरूप असों विशेष वडिलांकडून आलिकडे आशिर्वादपत्र येऊन वर्तमान कळत नाहीं तरी हमेशा पत्र पाठवावयासि आज्ञा केली पाहिजे इकडील वर्तमान तर निरोजी घोरे ठाणीं घेऊन शेवें नारायण याचे हवाली केलें वटवरी ठाणे वळकट होते त्यास

मरवामोर्चे लाऊन तोफाची मारगिरी देऊन आज प्रातःकाळीं ठाण्यांत लोक घातले ठाणें बळकट तोफाचे लोळे कारागीर न होत परंतु दहशतीनें दिल्हे व परिणाम हि नाहीं यास्तव ठाणें हवाली केलें उदैक कुच करून सत्वर च मनोळीस जात असों मनोळी हि घेऊन द्यावयाची आहे मनोळी घेऊन दिल्ही म्हणजे शेषोपंताकडील पांच-लक्ष करार केले त्यापैकीं मनोळी हस्तगत केल्यावर दोन लक्ष अस्तग(त) होतील वरकड ऐवज पावला यास्तव मनोळीस जाऊन ठाणें घ्यावें लागतें पुढें मनसब्याचा प्रकार तर गोपाळराव हलसगीकडे पाठविले होते त्यास तें कार्य करून आणखी हि ठाणीं घ्यावयाचीं आहेत तीं घेऊन येतील व विठ्ठल शिवदेव करवीराकडे ठाणीं घ्याव-यास पाठविले होते त्यास व गोपाळरायास बोलाऊं पाठविलें आहे सत्वर येऊन पोहचतील त्यानंतर पुढील कर्तव्याचा प्रकार ठराऊन पुढें जाऊं गोपाळरायास ठाण्यावर जखम खांद्यावर तरवारेची लागली आहे परंतु हलकी च आहे नरसिंग-रायास हि गोळी लागली आहे परंतु हलकी आहे वडिलास कळावें हैदरनाईक तरे-किरे घेऊन या फौजेची बातमी आयकून बिदनुरास आला मीरफैजुल्ला खोलगडास लाग(ला) होता त्यास त्याचे फिरंगी भेदून गोवेकरांनीं नेले व हैदरअल्लीनें मीरफैजुल्लास बोलाऊन पाठविलें यास्तव कुच करून माघारा आला वडिलास कळावें मीररजा म्हणून सिंगनमल्यास आहे त्याची व मुराररायाची लढाई लागली आहे परंतु मुरारराव याची वाजू सेर आहे कळावें पुढें मयदानचे लढाईस हैदरनाईक मीरफैजुल्ला पोहोचल्यावर येणा(र) आहे त्याचा जमाव हि भारी च आहे पंधरा हजार कानडा प्या(दां) व गाडदी पंधरासोळा हजार व मराठी फौज दहा हजार याप्रमाणें सर्व सामान देखील त्याचे सरदार याप्रमाणें आहे मनोलीस गेल्यानंतर त्याचा विचार मनास आणून सत्वर च पुढें जाऊं वरकड राजकारणें हि बहुत आहेत परंतु प्रत्ययास येईल तें खरें बिदनूरकर राजाचा भाऊ आला आहे त्याची हि भेट आज होईल परंतु हें राजकारण पक्कें आहे ठराव जाहाल्यावर सेवेसीं लिहीन सोंधेचा राजा येणार त्यास कागद व त्याचा कारकून व आपला कारकून पाठविला आहे सत्वर येईल वरकड प्रकार ठरेल ते सेवेसीं लिहीन तीर्थस्वरूप राजश्री दादासाहेबाचे वर्त-मान लिहावयास आज्ञा करावी हे विज्ञापना

---

## पत्रांक ३२

छ ८ जिल्काद पो

**श्री**

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री गोविंदराव तात्या स्वामीचे सेवेसीं

---

१. हें संबंध पत्र थोरल्या माधवरावाचें हातचें आहे. यांत **हस्तगत**बद्दल अस्तगत असा उच्चार आला आहे. माधवरावाला ह्चा अ उच्चार करण्याची खोड होती.

पोष्य मोरो बाबूराव साष्टांग नमस्कार विनंति उपरि येथील कुशल जाणून स्वकीयें लिहीत जावें विशेष आपण गेल्यातागाईत पत्रें येऊन वर्तमान कळत नाहीं तर ऐसें नसावें सदैव पत्रद्वारा संतोषवीत जावें श्रीमंतांनीं आपणां पत्र लिहिलें आहे त्यावरून सविस्तर अर्थ ध्यानांत येईल त्याप्रमाणें करावें वर्तमान लिहून पाठवावें श्रीमंताची ममता अकृत्रिम आहे संशय न मानावा बहुत काय लिहिणें कृपा लोभ कीजे हे विनंति

---

## पत्रांक ३३

श्री

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री त्रिंबकराव मामा स्वामीचे सेवेसीं पो महिपतराव त्रिंबक सां नमस्कार विनंति उपरि येथील कुशल जाणून स्वकीयें कुशल लेखन करीत असिलें पाहिजे विशेष आपणाकडून बहुत दिवस पत्र येऊन वर्तमान कळत नाहीं तरी हें वडीलपणास योग्य नाहीं यानंतर राजश्री तात्यास लिहिलें आहें त्यावरून सर्व कळों येईल सर्व प्रकारें आपण वडील आहेत जसें कळे तंसें करावें कृपा करावी हे विनंति

---

## पत्रांक ३४

पो छ ७ सवाल

श्री

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री गोविंदपंत तात्या स्वामीचे सेवेसीं पो कृष्णराव बल्लाळ सा। नमस्कार विनंति उपरि येथील वर्तमान ता। छ २५ रमजान पावेतों सुखरूप असों विशेष बहुत दिवस तुम्हांकडून पत्र येऊन वर्तमान कळत नाहीं तर सविस्त(र) ल्याहावें आम्हीं हैंदराबादेहून दोनचार पत्रें पाठऊन तेथील कितेक प्रकार लिहिले होते तीं पत्रें आपणास पावलीं किंवा नाहीं हें कळलें नाहीं असो तुम्ही साहेबचाकरीवर च होता त्यासी नवाबाकडील वर्तमान तर ज्याप्रो स्नेह जाहाला आहे त्यापरीस दिवसोदिवस अधिकोत्तर च आहे परंतु मोगलाई कारभार सुस्त फार यास्तव इंगरेज महमदआलीखानाकडील कारभार उरकून हैदराबादेस च बसले होते आम्ही गेलियानंतर बाहेर काहाडिले आम्ही श्रीमंताकडे दरमजल येऊन पोहचलों बासालतजंगाकडील मामलियत होऊन पैक्याची निशा न पडे कारभार अप्रमाणिक तेव्हां कोंताल भत्तु शिपनुत्कल कोटा वगैरे ठाणींमुद्धां नोपांन लक्षांचा सोडऊन दरमजल शिन्यास आले ज्या दिवशीं आले त्या च दिवशीं मीरजा दोतीन हजार फौज तीनचार हजार बार आठ तोफा याप्रमाणें नंदकानें आश्रयास उतरला होता लढाईस तयार जाहला इतक्यांत श्रीमंताने फौजेनें गाठून घेऊन त्याची फौज शिकस्त होऊन दोनचारसें घोडे लष्करांत आले व तोफा मार-

कारांत आल्या त्यांत दोन तोफा दोन मातबर बार बाराशेर गोळ्याच्या साडेपांच हात लांब नव्या आहेत मिररजा किल्लयांत गेल्यानंतर ते च मोर्चे सरकारचे बसले आठ दिवस तोफाचा मार बाहेरून बसला तीन हजार गोळा आंत पडला आठवे दिवशीं मिररजाकडून चाकरीचें राजकारण आलें तीन दिवस त्याचे मतलबाचे यादीची घालमेल पडली त्यानंतर यादी करार होऊन आम्हीं च किल्ल्यांत जाऊन त्यास बाहेर काहाडिलें मीररजा हजार फौज हजार बार घेऊन श्रीमंतांचे पदरीं पडला सिरें फत्ते जाहालें सिरें हैदरनाईकानें जबर खंदक दुहेरे करून केलें होतें सरकारचे फौजेचें महिना दीढमहिन्याचें काम होतें परंतु श्रीमंतांचे ताळे समर्थ यास्तव लौकर फत्ते जाहाली पुढें ईश्वरसत्ता प्रमाण हे विनंति

---

**श्रीशंकर**

## पत्रांक ३५

राजश्री गोविंदपंत तात्या स्वामी गोसावी यांसि

विनंति उपारे ता। छ २५ मोहरम पर्यंत वर्तमान यथास्थित असे विशेष श्रीमंतीं चित्ताचे उत्साहें करून आम्हीं हि श्रीत्रिंबकेश्वरीं यावें या आशयें लिा होतें त्यांचे उत्तर थोडासा आशय सुचऊन व सर्व खुलासा तुमचे पत्रीं लिहून पत्रें तुम्हांकडे तुमचे च नावें लाखोटा करून सरकारचे जासुदा बाा जो आला होता त्या बाा च पाा तीं पावलीं असतील परंतु लोकिकांत उत्तम दिसावें आपले हि चित्तांत उमेद येऊन स्वामिसेवा योग्यतेप्राा घडावी ऐसा मजकूर जावसालांत निखालस आढळत असला तर तैसें च ल्याहावें एकनिष्ठतेस अंतर पडूं देणार नाहीं परंतु आणिखी आम्हांपेक्षां अधिक विश्वासू त्याचे च प्रमाण आमचे बोलण्यास संदेह हा प्रकार असल्यास आपण निखालस वर्तत असोन याप्रकारें संशय दिसूं लागल्यास आपले हि चित्तास प्रशस्त युक्ती मनसवा सांगावयास होत नाहीं जेव्हां आमची परिक्षा च पाहाणें तेव्हां सा महिने वर्षभर आमचे वचनीं विश्वास ठेऊन चांगली मसलत श्रीमंतांचे च लगामी सर्व राहून दौलतेस उपयोगी ऐशी सुचेल ती च सांगूं आणि मर्जीप्रमाणें च वर्तणूक करूं नाहीं तर मळमळित दोहींकडे हि उपयोगी पडत नाहीं तर ह्या च गोष्टी खोलून जपून एकांतीं दुसरा कोणी बोलणारा आहे कीं काय तुम्हीं च बोलून उत्तर पाठवावें त्रिंबकेश्वरीं यावें ऐसें तुमचे विचारें असल्यास येऊं उत्तर लौकर पाठवणें श्रीमंत च एका दोचौ दिवसांत चावडसेस येत असले तर तैसें च लिहिणें राजश्री चिंतोपंत कवर्गे लष्करांतून आले याणीं सप्रऋषींचा फितूर केला गमाजीस पुढें करून किल्ला सरकार च देणार परभारें खूळ उभें करून आपण नामानिराळे ही हिकमत मसलत लष्करांत ठरोन या गोष्टीचें वळण बांधोन गमाजी परळीस येऊन राहिले राणोजी शिंद्याचा

देखील बुद्धिभेद केला पन्नासपाऊणलक्षाचा सरंजाम राणोजी शिंद्यास देऊं करून जाग्यास दगा करावा अशीं लिा दोघातिघांची आलीं तर युक्तीनें कानावर घालणें जरूर सूचना करणें हे विनंति

---

श्रीशंकर

## पत्रांक ३६

राजश्री गोविंदपंत तात्या स्वामी गोसावी यांसि

विनंति उपरि कितेक प्रकारें घराऊ मजकूर लिहून पत्र जासुदा वाा पाठविलें कीं तेथें श्रीमंतासीं एकांतीं गांठ सर्वदा पडत असेल समयोचित आपले कार्याच्या गोष्टी बोलून आपलें कार्य होऊन येई त्या प्रकारावर मर्जी युक्तीनें आणून आम्हांस उत्तर आलिया तुम्हीं बलाविल्यास आम्ही हि येऊं त्यास उत्तराची मार्गप्रतीक्षा करीत असों उत्तर पाा सातारियास वेंकाजीपंत राणोजी शिंदे परस्परें एक मिळणींत नव्हते राणोजी शिंदे केवळ जागा जतन करून श्रीमंतांचे पायाशीं एकनिष्ठ होते त्यास अलीकडे तो प्रकार नाहीं किल्याचा बंद तुटल्याउपर किल्ला वेंकाजीपंत आपले लगामीं लाऊन घेऊन किल्याचा बंदोबस्त अंतस्तें आवा पुरंदरे करणार वेळ असेल तर मुख्य आपण एक जाल्यावर सर्व गोष्टीस पाणी घालणार ऐसीं खुळें लागलीं ऐसीं लिहिलीं एक-दोघांचीं परिछिन्न आलीं या राजकारणांत हालीं चिंतो अनंत आले हें च लष्करां-तून हि सकारपूर्वकाचें पत्र राणोजी शिंद्यास उमेदीचे आणून बुद्धिभेद केला असे स्पष्ट लिहिलें आलें हे विनंति

---

## पत्रांक ३७

श्री

राजश्री त्रिंबकराव विश्वनाथ स्वामी गोसावी यांसि

विनंति उपरी सातान्याचें वर्तमान कांहीं विपरीत ऐकतों तरी काय वर्तमान आहे तें लिहिणें सविस्तर वर्तमान हमेशा लिहीत जावें सातान्याचा बंदोबस्त ठीक नस-ल्यास तीर्थस्वरूपास विनंति करून ज्या गोष्टीनें दौलतीस उपयोगी पडे ऐसा बंदो-बस्त करावा गोविंद शिवराम व तुम्हीं एक होऊन त्या स्थलचा बंदोबस्त जरूर राखावा वडिलांस हि विनंति एकांतीं करीत जावी वडिलांची आज्ञा घेऊन बंदो-बस्त राखावा हें पत्र कोणास न कळावें एक गोविंद शिवरामास मात्र पत्र दाखवावें नवलविशेष वर्तमान गुरुजींस लिहित जाणें रा छ २६ सफर बहुत काय लिहिणें हे विनंति

# पत्रांक ३८

श्रीम्हाळसाकांत

पो छ ४ रो वल चैत्र शके १७२३

राजश्री गोविंदराव नीलकंठ गोसावी यांसि

छ अखंडितडितलक्ष्मी अलंकृत राजमान्य स्नो यशवंतराव होळकर दंडवत विनंति उपरि येथील कुशल जाणोन स्वकीय लिहीत जाणें विशेष तुम्हांकरितां मकरसंक्रमणाचे तीळ शर्करामिश्रित पाठविले आहेत हे स्वीकारून उत्तर पाठवणे रा छ १७ जिल्हेज सुा इहिदे अशर मया तैन व अलफ बहुत काय लिहिणे हे विनंति

श्री ०
म्हाळसाकांत चरणीं तत्पर तुकोजी
सुत यशवंतराव होळकर

मोर्तब
सुद

---

# पत्रांक ३९

पो छ ९ जिल्काद

श्री

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री गोविंदराव तात्या स्वामींचे सेवेसीं पोष्य सर्वोत्तम शंकर साष्टांग नमस्कार विनंति येथील कुशल ताा चैत्र वद्य नवमी पर्यंत मुाा हावनूर तुंगभद्रा दक्षणतीर येथें सुखरूप आहों विशेष आपणाकडून बहुत दिवस पत्र येऊन वृत्त कळत नाहीं व येथून एकदोन पत्रें पाठविलीं त्यांचें हि उत्तर न आलें तरी ऐसें पूर्ण कृपेचे ठाई नसावें यास्तव सदोदित पत्रे प्रेषण करून परामर्ष करावा यानंतर इकडील वर्तमान तरी मनोळीहून निघोन धारवाड उजवें घालून सावनुरास आलों तेथें पठाण सावनूरकर येऊन भेटला व हैदरनाईक मायन-हळी येथें झाडीचे तोंडीं व मीरफैजल्ला बंकापुराजवळून साहा कोशावर होता पुढें नये यामुळें हरपनळी व चित्रदुर्ग यांची खंडळी उरकावी या अर्थे तेथून कूच करून मुाा मजकुरीं आले तों हैदरनाईक तेथून निघोन सावनूरास जाऊन शह द्यावा या अर्थे आले वलारी फिरोन माघारे वाला नदीवर मुक्काम केला एथून सडी स्वारी करून गांठ घालणार व हिंदुस्थानाकडील यथास्थित वृत्त कळत नाहीं कृपा करून करून लिहिलें पाहिजे बहुत काय लिहिणें कृपालोभ असो दिल्हा पाहिजे हे विनंति

---

बोलाऊन घेतले असत गांवास कोणेविशीं उपसर्ग लागू पावणार नाहीं रा छ १७ सफर सुा सलास समानीन मया व अलफ वहुत काय लिहिणें हे विनंति




---

## पत्रांक ४४

श्री

पौ छ १९ रमजान — १६८५ फाल्गुन शुा ८

यादी सरकारच्या फौजेचा अजमास सुा आर्बा सीतैन मया व अलफ छ ७ रमजान

| | |
|---|---|
| किता | किता |
| २००० विठ्ठल शिवदेव | ५०० धोंडो दत्तात्रय |
| २५०० नारो शंकर | ९०० शाहाजी भोसले |
| ३००० गोपाळराव | ५००० हुजरातदेखील पागा |
| ९०० सखाराम भगवंत | |
| ५०० नरसिंगराव धायगुडे | ६४०० |
| ३०० विसाजी नारायण | १०४०० किता |
| १००० नीळकंठ महादेव | १६८०० |
| २०० वावूजी नाईक | |
| १०४०० | |

फौज आज ता

याप्रमाणें जमा जाहाली आहे याखेरीज रास्ते व विसाजी कृष्ण व त्रिंवकराव शिवदेव निघोन आले लौकरच येऊन भेटतील व रामचंद्र जाधवराव चितापुरावर आहेत ते हि लवकर च येणार तीन हजार पर्यंत फौज आहे व गाडदी हजार दीड हजार पर्यंत आहेत मीर मोगल हि समागमें आहेत जाधव रायासमागमें बहुधा येतील किंवा न येत हें कळेना याखेरीज दोनतीनशें स्वार नित्य येत च आहेत

---

## पत्रांक ४५

श्री

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री ताला स्वामी गोसावी यांसी

पोष्य त्रिंवक सदाशिव व मोरो वावूराव कृतानेक नमस्कार विनंति उपरि येथील कुशल जाणून स्वकीयें कुशल लेखन केलें पाहिजे विशेष तुम्हीं पत्रें पाठविलीं तीं पावोन परम उल्हास जाहाला या च प्रकारें सदैव कुशलार्थ लिहून संतोषवीत असावें

इनामगांवच्या पत्रांविशीं लिहिलें व कुरणाचा मजकूर लिहिला त्यावरून श्रीमंतास विनंति करून ध्यानांत आणून दिलें त्याउपरि तुम्हांस पत्र लिहून दिलें आहे तें पाठविलें आहे त्यावरून कळेल सारांश गुन्हा नाहीं पत्रें देतील हें पत्र व सनदेप्रमाणें आहे तुम्हीं हि भाद्रपद अखेर याल आलियावर पत्राचा हि प्रकार होईल इकडील वर्तमान तर हैदरनाइकाकडील बोलीचा प्रकार लागला आहे ठराव होईलसें दिसतें या मासांत निकाल पडेलसें दिसतें माहादजीपंताचे मार्फतीनें राजकारण आहे राजश्री गोपाळराव दादा सावनुरास होते ते इकडे बोलाविले आहेत विठ्ठल शिवदेव तेथें जाऊन राहिले आहेत गोपाळरायासीं ऐवजाचा मजकूर बोलून जें होईल तें करितों राजश्री मोरोबाआबासीं बोललों आहें त्याणीं सांगितलें कीं या गोष्टीची काळजी आहे दादा आल्यावर थोडीबहुत तजवीज करितों असें बोलले आहेत आम्हीं हि सर्वप्रकार त्यांसी बोललों त्यास गोपाळराव आल्यावर कांहीं मिळे लागावेंसें आहे तेथें तुम्हीं येथील श्रीमंताचे लक्षाप्रमाणें मुख्यांची मर्जी कायम राखलीत येणेंकरून यजमान तुमचे ठाईं बहुत कृपायुक्त आहेत आम्हास हि याजहून विशेष दुसरें नाहीं वरचेवर वर्तमान लिहीत जावें नारोपंत पोंकशे याल समागमें आणावें बहुत काय लिहिणें कृपालोभ असों दीजे हे विनंति

---

## पत्रांक ४६

**श्री**

राजश्री गोविंदराव ताल्या स्वामीचे सेवेसी

पो बाळाजी जनार्दन साष्टांग नमस्कार विनंति श्रीमंत रावसाहेबांचें पत्र आलें कीं पुरंधरास दागिने होते त्या पैकीं पुण्यास आले हे वजा करून बाकीचे सोने रुप्याचे दागिन्यांची याद तीर्थरूपास समजावणें त्यास आपल्या जवळ याद आहे च व बाकी दागिन्यांचा मजकूर कसकसा जाहाला लिहून पाठवावें व याद समजावावयाची असली तर श्रीमंतास समजवावी आणि कोठें म्हणता तें लिहून पाठवावें कनडकुलमरीपटणचीडचे गांव वराडचे गाव व मुतांडा मिळोन साडेतीन लक्ष रुपये चिंतोपंताचे मारफतीनें बोलतात वेहलदू निराळा काढावा म्हणोन आम्ही म्हणतों मागाहून लिहून पाठऊं चिंतोपंतानीं आम्ही आल्यापूर्वी खानदेशचे तेरीज धरून फडशा करीत होते ते आम्ही आल्यावर फिरऊन जाजती साठ सत्तर हजार साधून विल्हेस लावले तुम्हांस कळावें याजकरितां लिहिलें असे बहुत काय लिहिणें लोभ करावा हे विनंति

राजश्री नारो बाबाजीनीं सांगितलें त्याजवरून कळलें असो जें होईल तें पाहावें हे विनंति

---

## पत्रांक ४७

श्री शा१६८८फाल्गुन वा॥४

अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य राजश्री आबाजी महादेव गोसावी यांसि सेवक माधवराव बल्लाळ प्रधान सु॥ सबा सितैन मया अलफ प्रस्तुत तुमचें पत्र येऊन कांहीं च अर्थ कळत नाहीं तर प्रस्तुत तीर्थस्वरूप कोठें आहेत पुढें कोणीकडे जावयाचा विचार तें सविस्तर बारीक मोठे अर्थ लिहिणें वरकड राजश्री गोविंद शिवराम याणीं लिहिलें आहे त्यावरून कळेल जाणिजे छ १८ सवाल

लेखन
सिमा

---

## पत्रांक ४८

**श्रीगणराज**

राजश्री मामा व राजश्री तात्या स्वामी गोसावी यांसी

पोष्य त्रिंबक सदाशिव व गोपाळराव गोविंद सां॥ नमस्कार विनंति उपरि तुम्हीं पत्रें सोळावे जिल्कादचीं पाठविलीं तीं चौथें जिल्हेजीं मुळगुंदास पावलीं सविस्तर कळलें संतोष जाहाला पुरंदरचा प्रकार जाहाला याची कल्पना येथें नानाप्रकारें होती त्यास तथ्य वर्तमान सविस्तर ल्याहावें म्हणोन लिहिलें त्यास हा प्रकार येथून संकेतानें जाहाला नाहीं हें प्रमाण आहे कोळीबेरड बाहेर घातले कोठें त्यांस थार नाहींशी जाहाली याजकरितां त्याणीं किल्ला घेतला त्यांचें लक्ष उभयतां श्रीमंताखेरीज दुसरे ठाई नाहीं असें आहे याखेरीज विपरीतभाव आणणार आणतील तर इलाज नाहीं विसाजीपंत धोंडोबाअप्पाकडील किल्यावर गेला आहे यामाटीं मशारनिलेचें नांव बदनाम जाहालें आहे परंतु शोध पाहातां विसाजीपंत धोंडोबा अप्पाकडून दोन-तीन वर्षें दूर आहेत ते यांचे आज्ञेशिवाय कोळ्याबेरडांत मिलाले आहेत याप्रमाणें वर्तमान आहे येथून श्रीमंतीं ताकिदी किल्ल्यास दिल्या आहेत साहित्यपत्रें दिल्हीं आहेत कीं किल्ला ज्याचे त्याचे स्वाधीन करणें याप्रमाणें मजकूर आहे तेथील श्रीमंतांचे मर्जीप्रमाणें वर्तणूक करावी हेंच येथील मानस आहे वडीलपणें सर्वमनगया दूरदेश ध्यानांत पाहाणें आणणें हा भार बरावाईट तेथें च आहे व अगाना इतकें मात्र मनांतील वरकड कृष्ण कल्पना कोणी घेऊन चित्तांत आणून देतील तरी इलाज नाहीं वरकड प्रसंगानुरूप विनंति करणें ते करीत च आहों वरकड नवल विशेष लिहिणेसें नाहीं अधिकोत्तर असल्याग लिहूं बहुतकाय लिहिणें लोभ असो दीजे हे विनंति

---

## पत्रांक ४९

श्रीशंकर

राजश्री ताला स्वामी गोसावी यांसि

विनंति उपरि तुम्ही एक दोन पत्रें पा तीं पावलीं नादुरुस्तीन होते तो मजी आमची न जाहली येथें एकप्रकार मजकूर दिसतो असो निशानयोग्य प्रमाण परंतु तुमचे आमचे सर्व लक्ष आहे ते राहिलें पाहिजे त्या कारितां सर्व हि तुम्ही आम्ही मान अपमान कबूल केला आणि मर्जी राखून चलतों त्या गोष्टीनें लक्षण सुकाचें एकनरेस गेल्यास कार्याची गोष्ट नाहीं तुम्ही असतां सर्व गोष्टी पल्यावर आणाल या गोष्टीचा पूर्ण भरंवसा, आहे च लागकाळ असेल त्या च कार्जा लाभ होणें तो होईल पर पर्जी कदापि विषर्ह देऊं नये ही गोष्ट जरूर ठीक असावी त्या प्रा करून लिहून पा आम्ही हि तुमचें पत्र आलें म्हणजे येतों दिवसेंदिवस मनतार्त्रिक होई तो च प्रकार विशेष मनसल्याचे विचारें पाहातां उपयोगी फार लाभ इस्तानयाचा काल हि नाहीं यासाठ सरकारची चिठ्ठी जरूर यावी की दिवकान येणें या प्रकारें आल्यास फार उत्तम जशी सोय दिसेल आणि उचित वाटेल तसें लिहून पा त्याप्रमाणें करूं राजश्री गोविंदराव गोळे लष्करांतून आले हे भेटून सर्व वृत्तांत सांगतील या गोष्टीस येथील अनुकूलता श्रीमंताकडून आहे ऐसा भाव येथें लिहून गेल्यास रोगनिर्मूलन होईलसें यांचे बोलण्यावरून वाटतें हे च विस्तारें सांगतील त्याजवरून कळेल यांचे हि साहित्य करावें हे विनंति

---

## पत्रांक ५०

पो छ ९ जिल्काद श्री

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री गोविंदपंत ताला स्वामी गोसावी यांसी पो त्रिंबकराव सदाशिव कृतानेक नमस्कार विनंति उपरि येथील कुशल ता छ १० सवाल मुा रायहुबळी यथास्तित जाणोन स्वकीयें कुशल लेखन करीत असिलें पाहिजे विशेष आपल्याकडील पत्र येऊन वर्तमान कळत नाहीं तरी पत्रीं संतोषवीत असिलें पाहिजे विशेष सरकारच्या खिजमतगारावराबर एकदोन पत्रें पाठविलीं तीं पावलीं असतील च श्रीमंतांनीं मनोळीचें ठाणें घेऊन धारवाड एकीकडे टाकोन राय हुबळीवरी आले तोफा लाविल्या एक रोज हल्ला केली ते हल्लेमध्यें धनसिंग पागेवरील गोळी लागोन ठार जाहाला रो रामचंद्र गणेश यास डाव्या हातास गोळीची जखम लागली वरकड हि शेंदीडशें माणूस जखमी जाहाले साठपाऊणशें ठार जाहाले मग दुसरे दिवशीं ठाणें हस्तगत जाहालें येथून आज कूच करून पुढे पांचसा कोसावरी जाणार तेथून सावनूरच्या सुमारें जातील हैदरनाईक इकडे पुढें

आला आहे त्या मुक्कामाहून त्यास यांस चौवीस कोसाचें अंतर आहे पुढें होईल वर्तमान हें लिहून कळऊं तुमची घोडीं सुखरूप आहेत घोडियांच्या ऐवजविशीं राजश्री गोपाळराव यांसी बोललों आहे त्यांनीं करार केला आहे कीं अखेर साल पावेतों निमे रुपये पावते होतील याप्रमाणें बोलिले आहेत कळावें वरकड फार बोलून स्वारांचा निकाल करवावा तरी बोलणें नाहीं मग बोलून निर्फळ जयरामपंत आहेत नित्य नमस्कार करीत आहेत आपल्याकडील वर्तमान लिहीत जावें पत्र फार दिवस येत नाहीं चिंता वाटते लोभ असो दीजे हे विनंति

राजश्री वाटवे रामराम

---

## पत्रांक ५१

### श्री

पुा राजश्री गोविंदपंत तात्या स्वामीचे सेवेसीं

विनंति उपरि हैदरनाइकाकडील करीमखा वकील शिरें घेतले नव्हते त्यापूर्वी वीस-बावीस लक्ष दुसाला बोलत होता श्रीमंत दुसाला सत्तर मागत आहेत त्याज तो हैदरनाइकाकडे पाटणास गेला आहे प्रस्तुत शिरें घेतल्यावर पाहावें मालोजी घिसाळ व शिदोजी घोरपडा व हिरासिंग सीख त्रिवर्ग सिन्यावर प्रथम दिवशीं गोळ्या लागून ठार जाहाले तुम्ही प्रस्तुत कोठें आहा काय करितां वर्तमान काय तें ल्याहावें हे विनंति

---

## पत्रांक ५२

### श्रीशंकर

राजश्री तात्यास नमस्कार

विनंति उपरि फार विस्तार न रुचे तुम्हांस विनंति करण्यास सोई न पडे सानंदास कृपाकरून एक वंदभर मजकूर श्रवण करावयास अनुकूळ न पडे तर उत्तर तेंसें न पा याजवरून च उमेदीची परीक्षा समजावी आम्हांस लौकिकांत लज्जा आमचे निा बहुळा किल्ला होता तो रा लक्ष्मणपंताकडे त्या प्रकारें आम्हांकडे असल्यास श्रीमंतांस भरवंसा पुरे ना म्हणून श्रीमंत कृपा करून आमचा आम्हांकडे देत नाहीं इत्यादिक दुर्लौकिक लौकिकांत सालीं लोकांत पाहावेंसें होतें जशी निशा पा नाहीं जाली च असेल आणि पुढें हि सडेल एक श्रीमंतांचे न जालों असें जाणोन निरंतर हे लहान न गोष्टींचे दुर्लौकिक दूर करावे उमेद जाल्याने सेवकापासून तरी रुपयांची कामें सरकारतर्फानी होऊन येतील शास्त्रार्थी सत्त्वानी आणि मोहि-तलें प्रमाण मानून सानंदानें ती गोष्ट आपणून त्याप्रकारें करणें इतकें सत्वाने चाकरलोकांस आव देऊन सेवकाने न हागून सरकारतर्फा सरंजाम होऊन येतो असें

गोष्टी आल्या व पुढें हि उमेद राखोन करविल्या तर तशा च घडतील वरकड फार एव्हां न होय तर किल्ला सरंजामसुद्धां आमचे नािा तूर्त द्यावा लौकिकात कृपा केलीशी दिसेल तूर्त घोड्यास कुरणामुळें वैरणकाडी मिळेल पुढें कृपा विशेष करणें ते श्रीमंत च करतील न म्हणावें न बोलावें तर मुक्याचा जाण या कालीं कोण होतो यास्तव विनंति करविणें प्राप्त जाली म्हणून तुम्हांस खोलून लिहिलें तर दोंही मजकुराचे उत्तर साफ पाठवणें कृपा करणार असले लिहिल्याप्रकारें होऊन कांहीं तरी दोंही प्रकारांतून एक प्रकार तरी घडत असला तर तुम्हीं आन्या जाल्यास लिहिणें मी च त्रिंबकेश्वरी येऊन कृपेस पात्र होईन नाहीं तर साफ उत्तर तैसें च पाठविणें हे विनंति

---

## पत्रांक ५३

### श्री

राजश्री तात्या स्वामी गोसावी यासी

विनंति उपरि कुरणाचे मजकुराविशीं रावसाहेबांस पत्र आम्हीं लिहिलें होतें तें तुम्हीं पाहिलें च होतें रावसाहेबानीं उत्तर पाठविलें तें तुम्हीं पाहिलें च आहे आम्ही उत्तर पाहून कृतार्थ जाहालों आमचे कुरणासाठीं फारसे गडकरी बोशीत नाहींत चालत च आहे रामचंद्रपंत मामा म्हणाला कीं माझे नावचें पत्र सरकारचें आणवा कीं सूर्यो-पर्यंतचें कुरण व पांगाऱ्याचे सुदामत नानांकडे चालवणें ऐसें पत्र सरकारचें आणून दिल्हें म्हणजे चालेल लढा पडणार ऐसें बोलला त्यावरून श्रीमंतांस पत्र लिहिलें त्याचें उत्तर श्रीमंतांनीं अशा प्रकारचें लिहिलें कीं गडकरी यांचे यादींत करार करून दिल्हे आहे हें उचित कीं काय हीं कुरणें ऽरातन येक सूर्योपर्यंतचे कैलासवासी तात्याचे वेळेचे पत्रांत सावर्षाचें दुसरें पांगाऱ्याचें नानासाहेबी लाकुड फाट्यास दिल्हें ऐशीं दोन कुरणें आहेत जेव्हां कुरणें गेलीं, तेव्हां सासवडीं कशी सोय संसाराची पडते उठोन दुसरे जागीं जावें हें च मानस यजमानाचे मनांत असलें तरी जिथें सांगतील तेथें राहूं आम्हांस कांहीं लोकांचीं शेतें जबरदस्तीनें पाडून कापून खावंदास न पुसतां रमणे करणें नाहीं असे जे करितात ते खुशाल आहेत असो सारांश रावसाहेबास विनंति करावी कीं हीं दोन्ही कुरणें नानाचीं नानाकडे चालवणें असें सहजांत स्वामींनीं विसोबास सांगावें व एक पत्र रामचंद्रपंतास द्यावें म्हणजे चालतील गडकरी हि फारसे नानांकडील कामास आग्रह करीत नाहींत त्यामध्यें पुरातन कुरणें कांहीं किल्ल्याकडे नवतीं नानांकडे आहेत कुरणें गेल्यावर नानाची सोय कशी आहे असे बोलावें व तुम्हीं विसोबा तेथें आले आहेत त्यास सांगावें कीं नानाचे दोन्ही कुरणाविशीं मामानीं आम्हीं तुम्हांस सांगितले च आहे व मध्यस्त नवलोजी

व कारकून पुण्यांत आले होते त्यापाशीं हि सांगितलें च आहे कीं नानाचे कुणास उपसर्ग लाऊं नये चालतात तशीं चालूं द्यावीं तुम्हीं मान्य केलें च आहे बोभाटमात्र येऊं न द्यावा ऐसें सांगितल्यानें हि होईल यांत जें होईल तें करा परंतु कुणें गेल्या-वर येथें राहात नाहीं रावसाहेबाला आमची भीड वरी पडली असो काय बोलावें आम्हास पूर्वी कैलासवासी होते तेव्हां पासून स्वारीस जावयाचें जाहालें म्हणोन एक डेरा राहुटी चार कनाता दोन मंडप शेतखाना देत असत अद्यापि नानासाहेबाचे वेळचे जुने डेरे दोन आहेत गतवर्षी रायानीं लष्करांत दिल्हे ते सामान जुने जाहाले नवे सामान देणें ऐशी विनंति येते समई केली नानाफडणिसास आज्ञा केली कीं काय आहे ते लिहून काढवा तेव्हां नानानीं फरासखान्याचे कारकुनास पुशिलें त्याचे रुमाल गेले आणि म्हणाले कीं जे समई जें सामान मागत होते तसे श्रीमंत कैलासवासी-देवीत होते मोईनसी नाहीं असें म्हणाले त्यास आम्हांस देत गेले आम्ही घेत गेलों जुनीं सामानें हि आहेत असें असतां मोईन कशी नव्हे पाहावी असो आम्हापाशीं सामान नाहीं जुनें सामान आहे त्याजवर चरितार्थ महिनाभर दोन महिने चालेल कनाता चांदव्या शेतखाना अगदीं नाहीं सामान आम्हांस मिळेल तसें द्यावें आम्ही लटकें बोलणार नाहीं असें असतां चार दिवस टाळटाळ करितील रावसाहेब तरी माझे जे चालत आहे ते मी उणें करूं देणार नाहीं सामान माझे द्यावें मी लौकर तयार होऊन लष्करास येईल याप्रमाणें सविस्तर विनंति करावी हें पत्र च दाखवावें वाचावें ऐसी विनंति करावी उत्तर पाठवावें आम्ही उद्यां देवदर्शनास जातो हे विनंति

---

## पत्रांक ५४

**श्री**

राजश्री तात्या स्वामी गोसावी यांसी

पोष्य त्रिंबक सदाशिव सां नमस्कार विनंति उपरि अलीकडे पत्रें फार दिवस सविस्तर येत नाहीं ऐसें नसावें सर्व मा कळापणा लिहिला पाहिजे इकडे श्रीमंत येतात न येतात त्याहावें खंडोजीबावा आल्यावर फार च नष्ट होऊन निराळे जाऊन राहिले आम्ही कांहीं चुकलों नाहीं विस्तार लिहिणें काय आम्हीं पूर्वी हि जाहालें तें वरें च केलें सांप्रत होईल तें करूं न होय यास आम्ही काय करावें परंतु त्याणीं फार च गोंधळ केला असो कळावें श्रीमंत मारवाड घेऊन हानगलास आले ठाणें घेतलें शत्रू येथून दा कोसावर आहे राजकारण हि आहे पाहावें कसें होईल तें भेटी कधीं होईल हे इच्छा आहे रा मार्गशीर्ष शुद्ध पदा हे विनंति

---

# पत्रांक ५५

श्रीगणराज शके १६८६

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री गोविंदराव तात्या स्वामीचे सेवेसीं पो॥ गोपाळराव गोविंद कृतानेक नमस्कार विनंति उपरी येथील कुशल ता॥ वैशाख वद्य अष्टमीं बुधवासर मो केरोर तालुके सावनूर वर्तमान यथास्थित जाणोन स्वकार्ये कुशल लिहीत आसिलें पाहिजे विशेष आपणाकडील वहुत दिवस पत्र येऊन वर्तमान कळत नाहीं हें उचित कीं काय तरी सविस्तर लिहून पाठवावें इकडील वर्तमान तर श्रीमंत तुम्हांस पत्रें वरचेवरीं पाठवितात त्याजवरून कळत च असेल श्रीमंतांची व हैदरनाइकाची वैशाख शुद्ध द्वितीयेस गांठ पडली तो चार कोस गोट सोडून आला होता तेथें दोन प्रहरापासून तोफा तोफाचा मार फार जाहाला शेवट दोन घटका दिवसास हुजरातीची वगैरे हल्ला जाहाली होती परंतु कारीगार जाहाली नाहीं रात्रौ चौकीस राहावें म्हणजे सहजांत काम होईल म्हणोन आम्हीं सांगोन पाठविलें परंतु कोणाचे खातरेस आलें नाहीं गोटास गेले तो आपल्या गोटास गेला रात्रींचा कोंडला असता तरी सापडता तदोत्तर हि दोन तीनदां तोफां तोफांचीं जुजें जाहालीं त्याच्या गोटावर तोफा लाविल्यानीं त्यानीं माणूसघोडें त्याजकडील फार जाया होऊ लागलें व पहिल्या दिवशीं त्याजकडील हजार घोडींमाणसें जागचीं ठार जाहालीं हिकडील शंभर पावेतों घोडेंमाणूस ठार जखमी जाहालीं नित्य तोफाचा मार न सोसवे तेव्हां रात्रीं कूच करून पळाले वारीच्या आंत जाऊन मायनहळ्ळी जवळ झाडीच्या आसऱ्यास राहिला तिकडे एक दोन वेळा सज्या फौजानिशी गेलों परंतु अडचण व पर्जन्य फार तळीं कालवे फार यास्तव कारगरी जाहाली नाहीं सल्ल्याचा संदर्भ अगोदर आला होता तेव्हां अगदीं च बुडवावाशी उमेदीमुळें राजकारण तोडिलें तदोत्तर हिकडून याणीं होऊन राजकारण लाविलें तें वळावलें नाहीं अद्याप अंत्र तुटलें नाहीं कदाचित् जाहाला तरी उत्तम कांहीं पैका देऊन तालुका सरकारचा सोडून देणार तह जहाला तरी छावणी करावीसें म्हणतात शेवट मनसवा सिद्धीस जाईल तो खरा मासुराजवळा मारे फार जांहाले दाणा वैरणीचा तोटा यास्तव केरुरावर कूच करून आले अमवाशा पावेतों काय तो ठराव होईल तदोत्तर छावणी अथवा देशास येणें हा प्रकार कळेल तोपर्यंत चार दिवस काळ घालवावा असा मनसबा योजिला आहे बहुत काय लिहिणें लोभ असो दीजे हे विनंति

सेवक शिवाजी बाबाजी सा॥ नमस्कार लोभ कीजे हे विनंति

## पत्रांक ५६

श्री

आपत्यें माधवरायानें चरणावरीं मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विज्ञापना येथील क्षेम ता। छ २९ जिल्हेज मु॥ नजीक कनगिरी येथें वडिलांचे आशिर्वादेंकरून सुखरूप असों विशेष वडिलांचे सेवेसीं इकडील वर्तमान लिहून पूर्वी सेवेसीं पत्रें पाठविलीं आहेत त्यावरून विदित जालें च असेल सारांश मजला आपण वडील असतां दौलतेची व कर्जाची व नांवलवकिकाची किमपि चिंता वाटत नाहीं वडील जें करणें तें करितील च ऐसें मानून निश्चिंत आहें नाहीं तरी सरदार डोईजड व पत कोठें च राहिली नाहीं कोण्हासी चाकरी करितां नेट धरून बोललियास वडिलास विपरीत प्रदर्शन करून तत्काल च घरांत पेंच पाडून राहिली ती ही दौलत बुडवायास सिद्ध च आहेत व शत्रू प्रबल आणि साहित्य याप्रमाणें आहे परंतु सर्व पेचांत आली दौलत इचा बंदोबस्त करणार वडील समर्थ आहेत कांहीं चिंता नाहीं आम्हीं आज्ञेप्रमाणें वर्तावें सेवा करावी यांत च इहलोक परलोक आहे पुढें वडिलास जसें कर्तव्य असेल त्याप्रमाणें सूचना लिहिली म्हणजे त्या च लक्षानें चालेन दौलतेचा बंदोबस्त केला म्हणजे यांत च सर्व स्नानसंध्येचें फल आहे ऐसें मर्यादा सोडून लिहिलें म्हणून वाईट न मानिलें पाहिजे हें पत्र दुसऱ्यास न कळे तें केलें पाहिजे सेवेसीं विदित होय हे विज्ञापना

---

## पत्रांक ५७

पो। छ ८ जिल्काद

श्री

राजश्री मामा स्वामी गोसावी यांसीं

व राजश्री तात्या स्वामी गोसावी यांसी

विनंति उपरि अलीकडे फार दिवस आपलें पत्र येऊन वर्तमान कळत नव्हतें तेणेंकरून चित्त सचिंत होतें त्यास आपलीं पत्रें राजश्री मोरोबादादास आलीं त्याजवरून सविस्तर कळोन संतोष जाहाला येथून श्रीमंतीं लिहिलें आहे त्याप्रमाणें तेथें बोलून जाहालें तरी कार्य ठसवावें श्रीमंताची कृपा तुमचे ठाईं नितापासून चांगली आहे यात दुसरा प्रकार नाहीं आपण स्वस्त चित्तें असावें राजश्री तात्यास पत्र श्रीमंतांनीं लिहिलें आहे त्याअन्वयें तेथील बंदोबस्त करावा तुम्हीं तों कारस्थानी करणें तें करीत च आहा परंतु क्षणभंगुर मिजाज व सांगणार शिकविणार ते अन्यकोटीतील तेव्हां भरवसा कांहीं एक नाहीं असो ईश्वरी सत्ता कालगत अशी च आहे बरव्यावर पत्रें लिहीत जावीं इकडील वर्तमान तर मनोळी कुच्ची श्रीमंत पेशवे मानगुराल आले सावनूरकर नबाबाच्या भेटी झाल्या या उपरि हैदराबादकडील प्रकार

कसा ईश्वर घडवितो पाहावा येथून वीसा कोसांवर हैदरनाईक झाडीच्या आश्रियानें आहे मीरफैजुल्ला पुढें दोन चार हजार फौज पांच सा हजार प्यादा याप्रो आहे बाहेर मैदानीं येऊन लढेलसें दिसत नाहीं पाहावें कसा विचार होतो होईल वर्तमान लिहून पाठवितों

---

## पत्रांक ५८

श्रावण वा। ९।१६९० श्री नकल

राजश्री त्रिंबकनाईक कमाविसदार ता। देवपूर गोसावी यासी

छ। अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्ने॥ तुकोजी होळकर रामराम सु॥ तिसा सितैन मया व अलफ राजश्री रामचंद्र निंबाजीनीं राजश्री गोविंद शिवराम यास ता॥ मजकुरीं सरकारांतून दप्तरदारीची असामी करार करुन सालीना वेतन रु॥ २०० दोनशें तुम्हांकडून देविले असेत तरी तुम्हीं मशारनिलेचे हातून दप्तरदारीचें लिहिण्याचें प्रयोजन घेऊन सदरहू दोनशें रुपये वेतन महालमजकुरऐवजीं पावते करीत जाणें जाणिजे छ. २३ रा।खर वहुत काय लिहिणें मोर्तब

शिक्का

---

## पत्रांक ५९

### श्रीशंकर

राजश्री सखाराम भगवंत यांसि व गोविंद शिवरामासि

विनंति उपरि भोजनोत्तर चार सा घटिका वसोन फडशा केला पाहिजे बरावर गोपाळराव कृष्णराव बल्लाळ व रास्ते यांस हि घेऊन येणें आम्हांकडील हि कारभारी वलाविले आहेत सारे च पाहिजेत एक कमी कामास नये साऱ्यांचे गुजारतीनें चिट्या हवाला कराव्या लागतील पुढें कितेक लढे राहतील ते उगवण्यास दिक्कत पडली न पाहिजे नाहींतरी चिट्या किल्ल्याच्या हातास आल्यावरी तुमची काळजी हरली मग आमचीं कामें ढालढकलीखालीं पडल्यास कसें पुरवेल यास्तव अगोदर पक्कें करावयास सारे पाहिजेत हे विनंति

---

## पत्रांक ६०

नकल श्री श्रावण वा। ३०।१६९०

राजश्री खंडो बाबूराव कमाविसदार सरकार विजागड गोसावी यांसि

अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्नो॥ तुकोजी होळकर दंडवत सु॥ तिसा सितैन मया व अलफ राजश्री गणेश नारायण नि॥ राजश्री गोविंद शिवराम

सरकारांतून सरकारमजकूर येथील मजमूची असामी करार करून सालीना वेतन रुपये ३०० तीनशें तुम्हांकडून देविले आहेत तरी तुम्हीं सरकारमजकुरीं मशार-निलेचे हातून मजमूचें प्रयोजन घेऊन सदरहू तीनशें रुा माहालमाऐवजीं पावते करीत जाणें जाणिजे छ २९ राखर वहुत काय लिहिणें

---

## पत्रांक ६१

श्री ज्येष्ट शुा १४।१६९१

अखंडित लक्ष्मीअलंकृत राजमान्य राजश्री आनंदराव जिवाजी कमाविसदार पाा सिन्नर गोसावी यांसि

सेवक माधवराव बल्लाळ प्रधान नमस्कार सुाा सबैन मया व अलफ पाामजकूर येथील सालमजकूरचे रसदेचा ऐवज लौकर घेतला पाहिजे तरी तुम्हीं रसदेचा ठराव करून घेऊन भरणा सत्वर करणें जाणिजे छ १३ सफर आज्ञाप्रमाण

लेखन सिमा

---

## पत्रांक ६२

श्री कार्तिक शुा ६।१६९२

अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य राजश्री गणेश त्रिंबक गोसावी यांसि

सेवक माधवराव बल्लाळ प्रधान नमस्कार सुाा इहिद्दे सबैन मया व अलफ मौजे वाले पेाा सोलापूर येथील ओढ्याचे कडेस कुरण आहे तें राजश्री गोविंद शिवराम याज-कडे सालमजकूर तुम्हांपासून करार करून देऊन हे सनद तुम्हास सादर केली असे तरी सदरहू कुरण मााानिलेकडे चालवणें जाणिजे छ ४ रजब आज्ञाप्रमाण

लेखन सिमा

---

## पत्रांक ६३

पेाा छ ८ जिल्काद श्री

पुा राजश्री मामा स्वामी गोसावी यांसी

विनंति उपरि अप्पाजी बाबूराव जामदारखाने पूर्वी राजश्री विष्णु नरहर यांस तुम्हांकडे पाठविले होते त्याजवराबर आमचें पत्र हि एक आपल्यास होतें त्यास यांचें उत्तर हि आलें नाहीं आप्पाजीपंत तुम्हांपाशी न आहेत किंवा पत्रें देऊन रवा-

नगी केली हें त्याहावें येथें आम्ही वरच्यावर श्रीमंतास उमजून देणें तें देत च आहों होतां होईल तें ख़रें हे विनंति

---

## पत्रांक ६४

### श्री

सेवेसीं त्रिंवक सदाशिव कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति येथील वर्तमान ता। आषाढ शुद्ध चतुर्दशीपर्यंत स्वामीचे कृपेंकरून यथास्तित असे विशेष वहुता दिवशीं स्मरण सेवकाचें होऊन कृपाळू होऊन आज्ञापत्र पाठविलें तें पाहून चरणाचे दर्शनतुल्य आनंद वाटला स्वामीचे पदरचे आहों कृपा करणार स्वामी समर्थ आहेत खासास्वारी लवकर च येईल जानोजी भासले गाइकवाड निंवाळकर तमाम सरदार फौजसुद्धां वोलाविले आहेत हैदरनाइकाचें पारपत्य पुरतें च होईल व येविशीं सेवकास कृपोत्तरें आज्ञा केली त्यास स्वामी पुण्यवान प्रतापी आहेत अशाचा मजकूर तो किती आहे सर्व हि स्वामीचे पादाक्रांत आहेत स्वतेजप्रकाशेंकरून शत्रूचें निर्दाळण शीघ्रकाळें च होईल स्वामीचे पाय दृष्टीस पडतील तो दिवस आनंदाचा आहे सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना

---

## पत्रांक ६५

### श्री

पु॥ राजश्री गोविंदपंत गोसावी यांसी

दंडवत विनंति उपरि इकडील मजकूर लि॥ आहे वरकड हि येथून आपलेपरी लिहीत आहेत यामध्यें आमचें लक्ष श्रीमंतांच्या पायाशीं एकनिष्ट आहे त्याचें नुकसान न व्हावें म्हणून सरळपणें मान-सन्मान कोणेविशी न पाहतां रात्रंदिवस मेहनत केली आणि श्रीमंतांच्या पुण्येंकरून सर्वांस यश आलें ते च चाल यंदाच्या स्वारीस येऊन मनसवा केला तो च शेवटास लागला असता तरी इतकें संकट न पडतें पैका हि मिळत होता आणि तह पडत होता परंतु करणारानीं छीळछद्म करून उभयतामध्यें विघड पाडून रा। विसाजीपंतास मिळोन इतके प्रकार केले असो जे जसें करितील तसें फळ हि होईल परंतु आम्हांकडील दरवारचा कामाकाजाचा सर्व भरवंसा आपला आहे वकील केले त्याणीं येथें नानाप्रकारें मनसवे रचले दरवारीं त्याचे पुत्र आहेत ते हि त्याचे आज्ञेप्रमाणें च वर्तत असतील आम्हांस कांहीं दरवारचें वर्तमान कळत नाहीं इतके दिवस जाले त्याचेकडून पत्रांचीं उत्तरें न आलीं आमचें वर्तमान तेथें न कळे त्याजकडील आम्हांस न कळे तेव्हां वकिलानें करणें लि॥ काय समजावें एक वर्ष जालें आमच्या लष्करांतून रा। विसाजीपंताजवळ

आऊन पाहिलें आम्हांकडील लक्ष सोडिलें आम्हीं रीतीच्या वाटे सांगत असतां त्याच्या विचारास न ये ते मोठा खेळांत जाऊन पडिले असो तेथें हि श्रीमंतांचें कार्य होत असेल त्याचा अर्थ आमच्या लक्षांत राहावें ऐसें नाहीं कोणेविशीं जाबसालांत भरवंसा पडत नाहीं याजमुळें सांप्रत कैलासवासी सुभेदार याजपासून तुमचा स्नेह च चालत आहे त्याप्रमाणें आम्हांसी हि लोभ च केला सर्व कामकाज निर्गम करून इकडे रवाना केले आम्हास हि स्नेहाची ममतेची जोड दरबारांत एक आपली च आहे या अर्थी तेथील कामाचा काजाचा जावसालाचा करण्याचा अर्थ आपल्याकडे च आहे दुसरे आम्ही जाणत नाहीं सर्व जावसाल आपण च करीत जावा जालें वर्तमान रा केसोपंत याजला आपल्याजवळ ठेऊन त्याजकडून आटचे दिवसीं वर्तमान त्याहावयासीं सांगत जावें येथून हि वरचेवर जालें वर्तमान लिा जाऊं म्हणजे दरोवस्त सर्व अर्थ समजत जातील अतःपर दुसरियाच्या भरवंशियावर न जावें आपण च इकडील अर्थ मनन करून बोलणें ते बोलून लिहिणें अर्थ ते लिहिवीत जावे दुसऱ्या पत्राची वाट न पाहावी छीळछिद्र बहुत जालें आहे भरवंसा एक आपल्या शिा आम्हांस कोणाचा पडत नाहीं ऐसें पाहून हालीं लिहिलें असे रो छ ४ सावान हे विनंति

---

## पत्रांक ६६

पो छ ८ जिल्काद

**श्रीगणराज**

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री गोविंदराव तात्या स्वामीचे सेवेसी पोष्य मोरो बल्लाळ कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति उपरि येथील कुशल जाणून स्वकीयें लेखन केलें पाहिजे विशेष आपण राजश्री जयरामपंतावरोवर पत्र पाठविलें तें पावलें लिहिला मजकूर कळला ऐवजाचा मजकूर अैसिन्यास जोगानीं निकड केली म्हणून त्यास दिल्हा आपण निकड न केली म्हणून न दिल्हा असा अर्थ नाहीं आम्हीं आपला निरोप घेऊन आलों तेसई आपण कांहीं मा सांगितला होता यास्तव अनमान जाला कदाचित् आपणास विस्मरण जालें असेल तरी नकळे असो आतां जयरामपंतास ठेऊन घेतलें आहे अखेरसालीं थोडाबहुत ऐवज पावता होईल आम्हीं मिरजेस आलों सैन्य प्रस्तुत गलगनाथाकडे गेलें तीा मातोश्रीबाईस येथें नाहत नाहीं यास्तव येथें आलों प्रस्तुत कांहींसा उतार आहे आठा दिवसीं सैन्यांत जाणार सालमजकूर छावणी जालियाणें हैदरनाईकाचें पारपत्य होईल कदाचित छावणी जाली नाहीं तरी कृष्णतीरपर्यंत त्याणी च सत्ता जाणावी प्रस्तुत तो चित्रदुर्गी आहे मीरफैजुला हानगलापाशीं आहे बंकापूर धारवाड दोनी मजबूत करून ठाणीं बसवीं आहेत परंतु पारपत्य न जालें तरी पेंतली नाहींपारनी त्याजपाशीं शीगाहजार गारदी आहे

हजार फौज इतकें सामान व तोफा शंभरपर्यंत आहेत झाडी सोडीत नाहीं हरपन-हळ्ळी चित्रदुर्ग येथें कांहीं साधेल या आशेवर गलगनाथपाशीं गेले आहेत यज-मानाची कृपा पूर्ववत आहे कारभारी हि प्रतिवर्षाप्रों कृपा करितात आम्ही कांहीं व्यंग दाखवीत नाहीं कालानुसार वर्तणूक करितों तीर्थरूप राजश्री दादास हलसिंगीचे हल्लेस जखम पट्टयाची शिरावर लागली होती उत्तम प्रकारें वरी जाली पाणी घेतलें आपणास कळावें बहुत काय लिहिणें लोभ असो दीजे हे विनंति

---

## पत्रांक ६७

### श्री

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री गोविंदपंत तात्या स्वामी गोसावी यांसी पो त्रिंबकराव सदाशिव कृतानेक नमस्कार विनंति उपरि येथील कुशल ताा छ२५ जमा-दिलावल नजीक वंकापूर यथास्थित जाणोन स्वकीयें कुशल लेखन केलें पाहिजे विशेष आपल्याकडून पत्र येऊन वर्तमान कळत नाहीं तर पत्र पाठवून संतोषवीत असिलें पाहिजे यानंतर खंडोजी जगन्नाथ आम्हाशीं फारच वाकोन आहेत आम्हांजवळ राहात होते ते आतां राहात नाहींत आम्हाशीं वांकडें राहावयाचें कारण कीं श्रीमंत तैनात जाजती करीनात ती आम्हीं जाजती करवावी ही कल्पना चित्तांत धरून आम्हांकडे येत जात नाहींत आपल्यास कळावें आमचा इलाज जितका होता तितका आम्हीं गोपाळराव मोरोबा दादा बाळकोबा हरीपंत फडके रामचंद्र गणेश इतक्यांकडून आम्हीं रायासीं रदबदल करविली आम्ही केली ती ऐकेनात शेवटीं हजार रुपये जाजती एकाएकास केले तथापि खंडोजीबाबाचे मनास नये आम्हीं काय करावें आणि आम्हांस च वेडें-वांकडें बोलतात आम्हीं सोसतों कांहीं वाईट बोलत नाहीं तुम्ही म्हणाल कीं नाना जलद उतावळी करून रागें भरले असतील तरी तात्या आमचा उतावळी जलदी दोष गुण बळवंतरायानें सोसलीं तुम्हीं सोसलीं सोशिता वरकड आमचें कोणी चालूं देणार नाहीं आम्ही हि कोणास कांहीं म्हणत नाहीं असे रीतीनें आहों परंतु खंडोजीबाबानीं आम्हावर फार च केली या गोष्टीस वर्तें लिहिले गृहस्त साक्ष आहेत राणू हगवणा तेथें आला तो आम्हांस न पुसतां आला म्हणून पत्र पाठविलें नाहीं राणू हि हा मजकूर सांगेल वरें त्याचे चित्तास येईल तें करोत आम्ही तिळमात्र वाईटबरें म्हणत नाहीं असें आहे तुमची भेट होईल कीं नाहीं तुम्ही या प्रांतें येणार किंवा नाहीं हे सर्व बारीक मोठें वर्तमान लिहून पाठवावें चितोडी घोडी नारोपंतास देऊं कळावें हंहप्पा-बरोबर पत्रें पाठविलीं तीं पावलीं असतील लोभ असो दीजे हे विनंति

अपत्यें अप्पाचे साष्टांगनमस्कार

# पत्रांक ६८

## श्रीशंकर

राजश्री ताल्या स्वामीचे सेवेसीं

विनंति उपरि तुम्हीं लिहिला मजकूर सर्व कळला त्याविशींचा शोध लिा स्थळीं केला त्यास तेथील लडा पडत च नाहीं ऐसें च उभयतांचे सांगण्यांत कळूं आलें परस्परें नकळतां निरानिराळा शोध केला केल्यां कर्मांचा वसवास पुढें खावंदांचे च पदरीं असोन परिणाम लागवा याविशीं आस्वासन दोन्ही मजकूर उल्लेख लिहिण्यांत येऊन स्वस्ताक्षरें चिटी समस्तास त्या च अन्वयें बकारपूर्वक सरनाइकासमात्र लौकर गेली तर या च पत्रावरून खामखा येतात काडीचा संदेह नाहीं ऐशी निशा आकारपूर्वक बकारपूर्वकाचा पुत्र आहे तो पुरवितो आमचे मतें जर खरेंखुरें मनापासून आहे तर उशीर केल्यास कार्यनाश संदेह फिटल्याखेरीज यावयास भयधरून येत नाहीं ते गरीब म्हणून संशय मानितात श्रीमंतांस करणें त्यापक्षीं इतके लांबणीवर न च टाकितां दोघांस लिा अन्वर्थें निखालस खोलून दोन्ही चिट्या स्वस्ताक्षरें द्याव्या श्रीमंताचे चित्तानरूप निश्चयपूर्वक कार्य होऊन येतें महद लाभ आणि लगामी हे प्रकार घडतात उगे च बलाविलें तर संदेहानें संदेह होऊन एवढा लाभ हातचा जातो या गोष्टीविशीं जशी पाा तशी निशा करून दोन्ही चिट्या मात्र घेऊन पाा बारा पंधरा दिवसांत दोघेचौघे येऊनभेटून आपले तोंडें रूबरू कबूल करून जातात परंतु उगेंच यामात्र म्हटल्यास घरचा प्रकार माणूस संदेह खाऊन लटके तर्कुतर्क काढून राहातें एकूण सरकार कार्याची निशा यास्तव पुर्ता शोध घेऊन लिा असे आम्हीं सर्व एक दोन प्रकारचें कालपरवां च लिहून पाा त्या गोष्टी समय पाहून युक्तीनें विनंति करून संतोष वाटून उमदे ऐसें च बोलून ठीक करून उत्तर लौकर पाठवणें बहूत काय लिहिणें राा छ १९ मोहरम लोभ असो देणें हे विनंति

---

# पत्रांक ६९

## श्री

राजश्री गोविंद शिवराम स्वामी गो

विनंति उपरि चिरंजीवास सविस्तर पत्रें पाठविलीं आहेत त्याजवरून कळेल तुम्हीं चिरंजीवास योग्य दिसेल ते विनंति करीत जाणें किरकोळ कामाविषईं येथून गृहस्त जातात त्यास साहित्यपत्रें यावीं लागतात तीं हि अगत्या अगत्यें देतों त्या प्रमाणें चिरंजीवानी चालवावें कोठें मनसुबीचें काम असल्यास मनसुबी पंचाइती करून करवावी वरकड किरकोळ कामास दिक्कत घेऊं नयेत येथें विचार करून च देणें ते देतों किल्लेजातचे बेहेडे करून दादो उद्धव यास चौकशीस पाठविले आहेत ते

चौकशी करून ऐवज मागावयास तुमचे मारफतीने चिरंजीवाजवळ येईल त्यास ऐवज पावता व्हावा व हिकडील मनसुब्यास उपयोग पडे तें च एक कर्म करावें हिकडे कमाविसदार व सरदार यांस व सरंजामी यांस खावंदगिरी करणें असतें चाकरी करणें हें पुरतें ठाऊक नाहीं ठाऊक कांहीं असेल परंतु बिघडले आहेत फार-करून पोरें च आहेत नवी च साळ आहे एक मल्हारजी होळकर मात्र जुना आहे त्यास सर्व ठाऊक आहे जो पहिल्या प्रमाणें न वर्तेल पहिले पासून त्यानीं श्री॰ तीर्थरूप चालवीत आले त्या प्रमाणें आम्ही हि चालऊं परंतु लहानथोर चाकर व कमाविसदार मल्हारबाची च रीत धरील तर कसें पुरेल परिच्छिन्न पारपत्य करावें लागेल सारांश आम्ही राहून कारभार करितों तीर्थरूपांपेक्षां थोडेसे अधीक च नरम करितों यांचा मजकूर काय आहे बंदोबस्त केलियानें दर-साल एक करोड रुपयाचा नफा कमाविसदार व सरंजामी यांमध्यें मिळेल मोडलें तरी हिंदुस्थान आहे मुख्य चिरंजीवाचा व आमचा एक विचार असल्यानें हिंदुस्थान व कर्नाटक दोन्ही बंदोबस्त पहिलेपेक्षां अधीक होतील ये विशीने अर्थ वारंवार तुम्हीं चिरंजीवासीं व तुम्हाशीं बोललों च आहों तुम्हीं स्मरण करनेवर देत जाणें एक वर्ष आमची कुमक ऐवजानें व पत्रांनीं केली यानें किती मुलूक सुटलो काय बंदोबस्त होतो चाकर नरम होतात ते दृष्टीस पडेल चिरंजीवांनीं पागा व फौज न पाठविली रिकामी घरीं बसली यानें इतकी शिबंदी आंगावर पडली मनसुबा हि कांहीं जाला नाहीं ऐसें आम्हास सुचतें तुम्हास कळेल त्या प्रा॥ विनंति करणें पुढें होणें जाणें ईश्वराधीन आहे

नक्कल अस्सलबमोजिब रावसाहेब यांजकडे रा। वा॥ १४ बा॥ एकोजी जासूद जथे वाघोजी नाईक रा। वर्ष प्रतिपदा मु॥ इछावर प्रा॥ माळवा हे विनंति

---

## पत्रांक ७०

### श्रीगणराज

विनंति उपरि हैदरनाईकावर जरब श्रीमंतांची जबरी वसली त्याची गुर्मी कांहीं वल्गना करीत होता तेणंप्रमाणें राहिली नाहीं त्याच्या लोकानीं दम टाकोन पलायन करूं लागले शिलेदार कानडे गाडदी चटेकार ऐसें पायदळ आदिकरून नित्यानीं गच्छंती करीत आहेत मैदानरानांत अवसान न पुरवे यास्तव झाडींत गेला तेथें जावें तर हे दिवस पर्जन्यकाळाचे त्यांत नित्यानीं पर्जन्य लागतो लष्करांत पोटास नाहीं दाणावैरणीचा तोटा घोडीं अगदीं पडीस आलीं मेहनत करावयाचे दिवस चिकोडी मनोळी येथें दिवस घालविले अखेरीस येथें ` तरतूद कांहीं शत्रूवर जरब ही वसावयासीं कारण श्रीमंतांचें

कांहीं राजकारणाचें अंत्र बापूस सखाजी नाा आबा पुरंधरे याचे विद्यमानें आहे जर करून बळावले तर तह करून माघारे येणार नाहींतर परिछिन्न छावणी करून राहणार मान्या कारंजकरी यानीं तें नेट धरिलें आहे आठपंधरा दिवस अवकाश हि आहे इतक्यांत सर्व विचार कळतो तदनुरूप लिहून हि पाठवून देऊं ऐवजा-करितां राजश्री जयरामपंतास आपण पाठविलें त्यास मशारनिलेस आपली निकड जाणोन च ठेऊन घेतलें महिनापंधरा दिवशीं कळेल तेणेंप्रमाणें तरतूद करून थोडींत वोढ समजोन कांहीं ऐवज पाठवून देऊं आपल्या पागेचे रामाजीपंत दारूनें जळोन मृत्य पावला वरकड वर्तमान मशारनिले लिहितां सर्व विदित होईल तुम्ही श्रीमंतांजवळ आहां तेथील वर्तमान काय उत्तरेकडील प्रकार कसा सांप्रत नवीन पुरंधरचें जाहालें त्याचा विचार काय हा तपशीलवार लिहोन पाठवून देणें या रानीं रोग फार आला त्याजमुळें घोडें थकलें तुमचे पागेचीं घोडीं लहानथोर पांचसांत राहिलीं रा जयरामपंतास पागेंत ठेऊन घेऊन नंदमवस्तीस लाविले आहेत जग-त्पित्याचे मातुलास साष्टांग नमस्कार प्रविष्ट करणें लोभ असो दीजे हे विनंति

समस्त मंडळीस साष्टांगनमस्कार लोभ कीजे हे विनंति

---

## पत्रांक ७१

श्री

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री गोविंदराव तात्या स्वामींचे सेवेसीं प्रोष्य मोरो बाबूराव कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति उपरि येथील कुशल जाणून स्वकीये लेखन केलें पाहिजे विशेष तुम्हांकडील सांप्रत पत्र येऊन वर्तमान कळत नाहीं तरी सदैव पत्र पाठवीत गेलें पाहिजे यानंतर इकडील वर्तमान तरी हैदर-नाईक हनगळावर आहे दिवसेंदिवस फौज कमी होत चालली राजकारणें हि बहुतांचीं लागलीं आहेत कोणा थरास जाईल पाहावें तुम्हांकडील पत्रें येथें आलीं माहादजी शिंदे याची सरदारी काढून मानाजी शिंदे यास सांगितली कारभारी माहादाजी गोविंद केले श्रीमंतांची मर्जी त्याणीं च रक्षिली त्याचें फल हि पावले व पावतील तुम्हीं तेथें आला तरी उभयता श्रीमंतांची मर्जी रक्षे असें बोलणें बोलावें कोणा हि कारभारांत अग्रेसर न व्हावें कारभाराचे धनी दुसरे आपण रामाय स्वस्ति रावणाय स्वस्ति या न्यायेंकरून राहावें तुम्हांस आम्हीं ल्याहावे असें नाहीं राजश्री मामा व आपण तेथें आहेत आपणास ल्याहावें असें नाहीं बहुत काय लिहिणे कृपा-लोभ कीजे हे विनंति

## पत्रांक ७२

श्री

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री गोविंदराव तात्या स्वामीचे शेवेशी पो बाळाजी जनार्दन सां नमस्कार विनंति उपर येथील कुशल ता छ ७ जिल्हेज पावेतों वर्तमान यथास्थित असे विशेष तुम्हांस पूर्वी दोनतीन पत्रें पाठविलीं परंतु एका हि पत्राचें उत्तर न पाठविलेंत असो निरंतर पत्र पाठवीत जावें श्रीमंतांची आज्ञा नसतां मध्यें च लवाडी करून श्रीमंतांचें नांव करून पुरंधर किल्ला घेतला हे लष्करांतून पत्रें आलीं तेव्हां निश्चय जाहाला असो प्रस्तुत श्रीमंत दादासाहेबांचें मनांत कितेक प्रकारें संशय वाढत चालिले पुढें बखेडा मातबर व्हावा असे हि डौल दिसतात त्यास तुम्हीं तेथें आहा संशयाची निवृत्ती वरचेवर करून राखीत जावें पाहाते अर्थी उभयता श्रीमंतांचे हि मनांत कांहीं नाहीं परंतु मध्यें च क्षुल्लक आहेत ते मात्र उपद्व्याप करून नानाप्रकारें संशय घालून कलह वाढवावा या करतां तुम्हांस सूचना लिहिले आहे बहुत काय लिहिणें लोभ असो दीजे हे विनंति.*

---

## पत्रांक ७३

श्री

सेवेसीं हरी बल्लाळ कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति ता छ ३० रजब मुा नजीक गुडगुटें कृष्णा उत्तरतीर वर्तमान यथास्थित असे विशेष राजश्री बाबूजीनाईक यांजकडील यादवराव याजपासून पांच हजार नजर घेतली तो पैका माघारा देण्याविशीं श्रीमंतांनीं पत्र राजश्री नानाफडणीस यांचे नावें लिहून दिल्हें तें मजजवळ राहिलें होतें तें आपणाकडे पाठवीत असें घ्यावें उत्तर पाठवावें कृपा केली पाहिजे हे विनंति.⁂

---

## पत्रांक ७४

श्री

राजश्री मामा स्वामी गोसावी यांसी
व राजश्री तात्या स्वामी गोसावी यांसी

विनंति उपरि आपण पत्र पाठविलें तें पावोन बहुत संतोष जाहला सातारियाचे फडणीस सबनीस गैर वाका समजाऊन तेथें श्रीमंतांनीं नेले होते बेहेडा दूर करावा

---

* सबंद पत्र नानाफडणिसाच्या हातचें

⁂ सबंद पत्र हरिपंत फडके याच्या हातचें

ही घालमेल करणार होते त्यास सर्व प्रकार येथे श्रीमंतांनीं केला वेहेडा त्याप्रों तेथें मुख्यास समजून चित्तांत आणून देऊन केला कारभार फिरऊं नये ऐसें केलें त्यावरून बहुत संतोष ज्ञाहाला श्रीमंत बहुत समाधान पावले तुम्ही असलियावर जेथवर बाजू संभाळणें तें येथील लक्षाप्रमाणें संभाळाल च कालगत विचित्र कीं चांगली गोष्ट इतबारी सेवकानीं सांगावी ते चित्तांत न यांवी वरकडाच्या विपरीत गोष्टी तथापि तें च उत्तम मानावें असें होतें तेव्हां ईश्वराचे चित्तांत तमाशे पाहणें येतें असो इलाज नाहीं वरकड पुरंदरचा मार लिहिला ऐश्यास येथील संकेतानें हा प्रकार किमपि न जाहाला कोळीबेरड स्थाई कदीम तिशा वर्षांचे चाकर त्यांस दूर करून अन्नास यजित केलें यासाठीं त्यांनीं दावा पाहून हें कर्म केले येथील मर्जीत एकमर्जीवर च कायम आहे वरकड दुष्ट लोक नानाप्रकारें तेथें विकल्प आणून देतील तरी इलाज नाहीं परंतु सत्य गोष्ट अशी आहे सविस्तर राजश्री गोविंदरावजी सांगतां कळेल छावणी जाहाली पुढें ईश्वरी सत्ता प्रमाण आपला आमचा आतां दुसरा प्रकार तिळमात्र नाहीं हें मनोमंन साक्ष असे विस्तार काय ल्याहावा लोभ असो दीजे हे विनंति चिरंजीव बजूस घरास पाठऊन दिल्हा हे विनंति राजश्री आबा व राजश्री मोरोबा यांस नमस्कार

---

## पत्रांक ७५

### श्री

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री तात्या स्वामी गोसावी यांसी

पोष्य त्रिंबक सदाशिव कृतानेक नमस्कार विनंति उपरि येथील कुशल ता। ज्येष्ट वद्य पंचमी मुक्काम नजीक कोपळ येथें असों विशेष तुम्हांस पांच सात पत्रें पाठविलीं तीं पावलीं हें कांहीं कळत नाहीं तुमचीं पत्रें आम्हांस चारपांच पावलीं श्रीमंतरायानीं तुम्हांस पत्रें पाठविलीं तीं पावतां उत्तरें पाठवावीं इकडे हवा फार जहाल लष्करचे हत्ती पंधरासोळा मेले घोडीं मरतात माहागाई मोठी असा प्रकार आहे मोगलाचें हैदरनाइकाचें राजकारण आहे माधवराव गेले च आहेत विघाड जाहालासा दिसतो तेथें काय वर्तमान हिंदुस्थानचें वगैरे ल्याहावें तात्या भेट होईल लौकर तर फार उत्तम आहे चिंता लागली आहे या छावणीची मोठी फजिती ईश्वर आब राखो लोभ असो दीजे हे विनंति[1]

भोसले नवलगुंद तालुक्यांत ठेविले आणि खासास्वारी देखील घोरपडे व पठाण सावनूरकरसुद्धां दोन महिने पोट भरावें म्हणोन मुदगल सरकारांत जावयाकरितां सिदनूर पावतों आले तीस हजार खंडणी केली पुढें खंडण्या करीत करीत गदवले पावेतों जावें असा प्रकार होता परंतु हैदरनाईक एकाकी च वंकापुरास आला सावनूरच्या गळा पडणार असे धमकेनें आला म्हणोन गोपाळरायाचें पत्र श्रीमंतास आलें त्याजवरून माघारें गजेंद्रगडास आले हे माघारे फिरल्याची आवाई जातां च तो माघारा हनगळास गेला म्हणोन काल वर्तमान आलें आहे याउपरि काय वर्तमान होईल तें लिहून मागाहून पाठऊं तुमचीं घोडीं गोपाळरायाजवळ सुखरूप अस्थिचर्ममात्र काळानुरूप आहेत तात्या यंदांची मुलुकगिरी या देशची फार भारी पडली सरकारांत पैसा नाहीं लोकांस विसादिशीं आठवडा माहागाई घोडीं उंटे बहुत मेलीं पथक्यांचे लोक अवघे उठोन गेले चहू हजाराचा सरदार पांच सातशें याप्रमाणें आहे हुजुरात कांहीं बाहीं दम खाऊन आहे पुढें श्रीकृपेकडून सोई पडल्यावर अवघें बरें च आहे तूर्त महर्गता मोठी वरकड मजकूर विशेष कोणता त्याहावा इकड एक च छावणीचें काम देशीं मोठीं मोठीं कामें जावसाल तिकडे पडतात सर्वदा पत्रद्वारा सुचवावा या सैन्यांत आपले कोणी आहेत असें समजत असावें कृपा केली पाहिजे हे विनंति

---

## पत्रांक ७८

### श्रीशंकर

राजश्री गोविंद शिवराम तात्या स्वामीचे सेवेसीं

विनंति उपरि काल भेट व्हावी याभावें चिटी पा। होती परंतु त्वरे करितां आपण निघोन त्रिंबकास गेला सविस्तर लिहून पाठवावें या भावें लि॥ त्यास केवळ फुकट परमार्थबुद्धी करून आम्ही बारा वर्षे चाकरीत असलों तर च लता गाडा असता मग दुसरेयाची दर्द जाणोन समजोन चालवणें करणें हें या कालीं दूर च आहे केवळ जरूर प्रकार जाले पाहिजेत त्या गोष्टीविशीं युक्तीनें समय पाहून कार्य होईल तसें तसें करून घेतलें पाहिजे आमचेविशीं तुम्हीं जपून लागू होऊन करून घ्यावें तुमचे विशी आम्हीं जपावें यावेगळी मंडळी आहे तीस तुमचे आमचे कार्याचें किती अगत्य आहे तो प्रकार कळत च आहे आमचे पदरीं संसार भारी सरंजामाचीं खेडीं तीं दोन वर्षे लुटून खराब करून टाकिलीं एक टोंकडे तो माहाल सारे खानदेशांतील म्हारवडा येणाराजाणारानें लुटावा ही गत त्याची एक म्हसवें बारा गावानें तें भिकार माहालमात्र उदीरखेड्याजवळ घोड्यापिढयास सत्तेस एकूण सारे पंधरा-हजार यंदा आकार वीस हजार परमसीमा आमचे पागेस निराशा ऐवज सरका-

रांतून घोडी करार करून दाहा हजार रुपये प्रतिवर्षी व नक्त सरंजामाची नेमणूक सालावाद पंचवीस हजार जुने डोलसुद्धां व मामलतींत वीस हजार पावीत होते दरबार रुजू तेव्हां एकंदर बेरीज पंचावन्न साठ हजार रुपये नक्त सरंजाम खेज्या-खेरीज पावीत होते बरें तितके नाहींत तर निम्मे तरी या कालानुरूप पावतील तर संसार चालोन सेवा घडेल श्रीमंतांचे पदरीं आहों नावलौकिक आहे तो कांहीं सुटत नाहीं आमचें श्रीमंतांवाचून दुसरा कोणी चालविणार आहे कीं त्यास पुसावें आम्हीं कायावाग्मनसा श्रीमंतांचे चरणाशीं एकनिष्ठ जालों तरी आम्हास मात्र पोटाची भ्रांत पडावी ज्यांणीं दौलत पालथी घातली त्यांणीं सरंजाम बारापंधरा लक्षाचे याप्रा सर्वांनीं खाऊन खावंदास कोठें ठिकाण नाहींसें जालें तरी ते च गोड वाटावे ऐसें च असल्यास पुढें तरी फल काय होणार कळत च आहे यास्तव कृपा करून चालविणें पाठ थोपटून सेवा घेणें तर धांदरफळ शिलेदारास दिल्हें कोतुल परगणा वगैरे ज्यांस दिल्हीं आहेत त्यापरीस आम्ही सेवा करून दाखऊं आम्हांवर कृपा करून पंचवीस हजाराचा सरंजाम एक स्थळ कालदेशाचे निभावर्णास द्यावें आमचे घोड्यास गवताची काडी मिळेना पागेस रो होता तो हि दरमाहा तीनशें ते तूर्त पावत नाहींत पन्नास वर्षांचा मोकासा हजार बाराशें ऐवज तो खानदेशांत गाव तो देखील बंद ऐसें अवघ्यांपेक्षां एक आम्ही च नावडते असलों तर सारी उमेद आज च पुरली ऐसें समजोन सोडीत सोडीत संसार सोडून देशांतरास जाऊं जे दौलतेचे उपयोगी इतबारी हिंदु असतील ते च सर्वस्वे दौलत खाऊन असतील इतकें लिहिण्याचें प्रयोजन नाहीं परंतु कालहरण न होय कर्ज घेऊन दिवाळखोरी करून संसार करावा तर तें हि अनकूल न पडे यास्तव कृपाकरून सर्व गोष्टी श्रीमंतीं चित्तात आणून आपले च चित्तांत खरें लटकें विचारून पाहावें आणि आज्ञा करावी जरूर जरूर सर्व अर्थ विदित करणें कृपा करणें पदरीं बाळगणें उचित असे इतक्यापुर्ती सेवा हि करून दाखऊं उमेद फार आहे परंतु समयकाल नाहीं हे विनंति.

---

## पत्रांक ७९

**श्री**

राजश्री गोविंदपंत तात्या स्वामी गो

विनंति उपरि लष्करांत भेट जाहाली तुळजापुरास जातों म्हणून निरोप घेऊन यात्रा करून आलों लष्करांत लोक रवाना केले येथें महिनापंधरा दिवस राहून तिकडे आपली भेट होईल असें होतें तो एकाएकीं पुरंधरची गडबड जाहाली त्याजवरून अम्हांस किल्याचा बसवास पडला तेथील बंदोबस्त कर.
बंदोबस्त केला माघारे आलों येथें प्रजन्य बहुत तिकडे

चा प्रकार कसा हें कांहीं कळत नाहीं रामचंद्रजीनीं दरबारीं प्रकार मात्र एकदां लिहिला विशेष कळत नाहीं आपण लिहितील हें मनांत होतें परंतु दोन महिन्यांत पत्र न आलें तेव्हां हुजूर जासूद आपल्याकडे पाठविला आहे तिकडील अर्थ कर्नाटकांतील प्रकार काय कसा पुढें काय विचार तें ल्याहावें आम्हीं येथें येतां च पत्र पाठवावें परंतु तिकडे यावें असें होतें तिकडे येण्यास गडबडीमुळें न घडलें आपण दरबारीं आहेत तेव्हां सल्ला वरीवाईट आम्हांस स्मरण करून लिहितील हें मनांत आणून वाट पाहिली अन्यावा भेटले त्यांस हि आलों हें कळलें होतें परंतु आपण काल पत्र पाठविलें हा हि प्रकार कळावा व आम्हांकडील खासगत प्रकार कळावा यास्तव पत्र पाठविलें आहे श्रीमंताची हि पत्रोत्तरें येणें म्हणोन आलीं आहेत त्या च प्रकारांत आहों बहुत काय लिहिणें हे विनंति

---

## पत्रांक ८०

श्री

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री तात्या स्वामी गोसावी यांसी

पोष्य त्रिंबक सदाशिव कृतानेक नमस्कार विनंति उपरि येथील कुशल जाणून स्वकीयें कुशल लेखन केलें पा। विशेष इकडील वर्तमान तर हैदरनाईक जडेहणवटीवर छावणी करून आहे श्रीमंत फौजसुद्धां मुदगल सरकारांत जावें चार शो मिळवावें या उद्देशें सावनुराकडून निघून आठदहा मजली पुढें आले गोपाळराव गोविंद रखवालीस सावनूरच्या ठेवले सावनुरकर नबाब समागमें च आहे मुरारराव दौलतराव बराबर च आहेत इतक्यांत हैदरनाइकानें संधी पाहून कूच करून बंकापुरास आला सावनूर घ्यावें या उद्देशें आला गोपाळरायानीं शहरची बंदोबस्ती चांगली च करून आहेत सावनुरास पठाण वगैरे माणूस पांच सात हजार चांगलें च आहे गोपाळराव हि चांगले च शहराबाहेर येऊन उभे राहात मग हैदरनाइकाचे लोकांनीं सांगितलें कीं किल्यावर चालून गेल्यास परिणाम ठीक नाहीं मग दगा करावयासीं वोढ्यांत दबा धरून बसला गोपाळराव पुढें सरले म्हणजे गाठावें दगा करावा हें वर्तमान त्यास कळलियावर हे हि थबकून राहिले श्रीमंतांस तावडातोब लिहून पाठविलें कीं लौकर फौजसुद्धां यावें यांनीं हि रोख फिरविला माघारें कूच केलें मग हैदरनाइकास कळलियावर कूच करून जडेहणवटीवर गेला गोपाळराव तेथें च आहेत नारो शंकराची फौज तेथें पाठवली आहे रास्ते यांची फौज विठ्ठल शिवदेव खासा सावनूरच्या आसपास मदतीस आहेत श्रीमंत गजेंद्रगडास आले दाणापाणी पाहून राहतात महागाई लष्करांत फार आहे याप्रमाणें वर्तमान आहे राजकारणसूत्र अद्यापि कांहीं नाहीं मग पाहावें माधवराव

मूळवेदींच्या वेथेनें वारले असें येथें वर्तमान नाहे सत्य मित्थ ईश्वर जाणें जगन्नाथ धोंडाजीचीं पत्रें दोन चार आम्हांस आलीं होतीं कळावें आवा पुरंधराभोंवते चौक्या ठेवितात हरबा सासवडीं आहेत पाईचें माणूस दोनचार हजार ठेवितात आवा हश-मनीस सासवडीं आहेत हशम ठेवितात पुरंधराभोंवते गांव होते तेथें ताकीद करून वोस करविले बाजार भरूं नये ऐशी ताकीद केली आहे आपुण खासा वाड्या-बाहेर जातं नाहींत वाडयाचा बंदोबस्त करितात लकडी कोट वाडयांत घालितात असें वर्तमान ऐकतों गडकरी हि आपले बंदोबस्तानें आहेत श्रीमंत दादा पुण्यास आलियावर काय होईल पाहावें आवाला दादानीं बोलाऊ पाठविलें आहे जात नाहींत आवाचा शिवबादादाकडे पाठविला आहे काय मतलब असेल न कळे तुम्हास काशीदावरावर मुजरद सविस्तर लिहून पाठविलें आहे कळेल सारांश येथें मुद्याचा प्रकार कांहींसुद्धां नाहीं उमेद निर्फळ आमचा द्वेष फार च सकारनामक करितो पुरं-धरचें निमित्य सकारनामक आम्हांवर आणितात किती सोसावें घरां असतां वरकड मार रुवरू दर्शनांतीं च बोलावयाचा पत्रीं लिहितां नये चिरंजीव सासवडीं पावला तुम्हांस पत्र पाठविलें च असेल चिंतो अनंत तेथें आले असतील आमचीं गाव खेडीं सोडावीं ऐशीं पत्रें सखारामाचीं रायानीं घेऊन आपलीं हि दादास पाठविलीं आहेत मग तेथें चिंतोवा काय बोलतोकरितो ईश्वरी सत्ता कळलें पा। लोभ असो दिजे हे विनंति

---

## पत्रांक ८१

**श्री**

पुा विनंति उपरि वनिया देता नहि पुरा नोल अशा गोष्ट आम्हीं लिहिलीं का मीं थोडेसें जानूबरावर सांगोन पाठविलें म्हणून नपाठविलें लिहिलें नाहीं तर प्रयो-जन नाहीं खासगी सरंजाम आवाचा त्याचा प्रकार कलमबंदीनें लिहिला आहे त्याच देवळाचें कुसाचें काम जाहालियावर कसर राहे लागली नाहीं सरकारची च आहे अंतर कोण करील जें आहे तें खावंदाचें आहे परंतु चाकरी मनसुबीनें घेतली तर सर्व हि यानतदारीनें होईल आम्हांस न मागावें हरी गोपाळ यांस प्रकार [illegible] ध्यानांत खावंदाचे भरलें असलें तरी बहुत उत्तम आम्हांस प्रयोजन नाहीं [illegible] मुलाचें कपाळ त्याचें त्याजवरावर दुसऱ्यानें कारभार करावा आपण नाहीं [illegible] पुढील आशा धरावी हें अयोग्य आम्हांस काहीं आशा नाहीं पण [illegible] त्यास चिरंजिवाचे हातें काम घेतील तरी स्वदंडी व सर्व कलम [illegible] काहीं नलगे खातरेस येईल तें करोत या पत्राचें उत्तर पाठवणें [illegible] बोलणें असें असेल तर खोलून बोलणें तर लिहून [illegible] पत्रें दाखविलीं तरी चिंता नाहीं मज चिंता काय आहे [illegible]

आशय घ्यावा पत्रें पाहावीं आणि मग चित्तास येईल तें करावें असें मात्र आम्हांसीं नसावें तुम्हांस पुर्ते दृढ कळलें तरी पत्रें दाखवणे नाहींतर काम नाहीं सारांश पथकांचा सरंजाम सर्व कढून हुजूर ठेवावा पागेस मात्र सरंजाम देऊन चाकरी घ्यावी खासगी सरंजामांत संसार खर्च देवणें व + + करवावें यांत कसर राहील ती सरकारची चाकरी चिरंजिवाजवळून घ्यावी हें मनांत आहे जाहालें तरी असें व्हावें न होय तरी खातरेस येईल तें करोत कांहीं नलगे हे विनंति

---

## पत्रांक ८२

**श्री**

भानमार्जी लिमये मूळपुरुष यांस पुत्र बाळाजीपंत यांस पुत्र २

गणेशपंत
यांस पुत्र २
१ शिवरामपंतआप्पा
१ जिवाजीपंतअण्णा
१ चिटकाबाई रामचंद्र हरी
पटवर्धन यास दिली
३

कृष्णाजीपंत
यांस पुत्र ३
१ रामचंद्रपंत
१ जोतीपंत
१ बाळाजीपंत
४ वहिणी
७

शिवरामपंतआप्पा
यांस पुत्र ४
१ राघोपंत दादा वडील
स्त्री आनंदीबाई यांस
१ धाकटी स्त्री गंगाबाई यांस
१ गोविंद शिवराम
१ हरी शिवराम
१ पांडुरंग शिवराम
१ काशीबाई त्रिंबकराव मामा
पेठे याचे पुत्रास दिल्ही
४

जिवाजीपंतअण्णा
यांस पुत्र ३
१ आनंदराव
१ बळवंतराव नकल
१ त्रिंबकराव नकल
३ वहिणी
६

आनंदराव यांस पुत्र ३
१ गणपतराव नकल
१ केशवराव
१ गोपाळराव नकल
३

जिवाजीपंतअण्णा आप्पा काशीस गेल्यानंतर खासगीचें काम करीत होते लौकिक मोठा संपादून पुढें मृत्यु पावले फाल्गुन ११ शके

शिवरामपंत आप्पा व जिवाजीपंत अण्णा पूर्वी नारायणराव घोरपडे इचलकरंजीकर

यांचे पदरीं होते बाजीराव बल्लाळ पेशवे यांची बहीण आनूबाई नारायणराव घोरपडे जोशी यांचे पुत्रास दिली ते समई घोरपडे याणीं शिवरामपंत आप्पा यांस बाजीराव यांचे हातीं दिलें रोजगार चांगला सांगावा म्हणून सांगितलें यावरून बाजीराव साहेब याणीं शिवरामपंतआप्पा यांस प्रथम मौजे पाडळी प्रा वाई संमत कोरेगांव ग्रैथील कमावीस सांगितली नंतर सातारियांतील वाड्याचें काम सांगितलें कुटुंब कापशीस होतें तें पाडळीस आणिलें पाडळींत घर नवें बांधिलें सातारियांतील वाड्याचें काम चांगलें मर्जीजोगें केलें सा पुणियांतील वाड्याचें काम सांगून खासगीचें काम सांगितलें शके १६५४ परिधावीनाम सनसलास सलासीन मया व अलफ श्रावण वा ५ स वाडयास प्रारंभ केला खासगीचें काम जाल्यापासून नवरात्राचा उछाह करूं लागले

१ रघुनाथ शिवराम यांचा जन्म कापशीस जाला शके

१ गोविंद शिवराम तात्या यांचा जन्म पाडळींत जाला शके

१ हरी शिवराम याचा जन्म

१ काशीबाई यांचा जन्म काशींत जाला शके

१ पांडोबाबाबा यांचा जन्म पंढरपुरीं जाला शके १६

१ खासगीचा कारभार शिवरामपंत आप्पा करीत होते बाजीरावसाहेब यांचा काल जाला नंतर बाळाजीपंत नानासाहेब यांचे हातीं चिरंजीवास व जिवाजी पंत अण्णा यांस देऊन आपण निरोप घेऊन श्रीकाशीस गेले. तेथें अग्निहोत्र घेतलें यज्ञ केला सर्वस्व दान केलें नंतर देशीं येऊन पंढरपुरीं राहिले तेथें वाडा व संस्थान श्रीपांडुरंगाचें करून राहिले नंतर श्रीमंतानीं गाव संवस्थानचे खर्चास मौजे कवयली दिल्ही खासगीचे काम जिवाजीपंतआणा करीत होते पुढें शिवरामपंतआप्पा पंढरपुरीं मृत्यु पावले शके

१ शिवरामभाऊ यांस खासगीचीं वस्त्रें श्रीमंत दादासाहेब यांणीं दिल्हीं शके १६९५ अश्वीन शुा २ पुढें भाऊनीं श्रीमंत सवाई माधवराव यांचे अमलांत अंबारी हत्ती व राजश्री किताब मिळविला वाडयाचा चौक पुढील बांधिला पुढें भाऊस दुखणें लागून काल जाला शके

१ शिवरामभाऊ यांस पुत्र नारोपंतआप्पा यांस खासगीचीं वस्त्रें श्रीमंत सवाई माधवराव याणीं दिल्हीं पुढें श्रीमंत बाजीराव साहेब यांचे अमलांत दुखणें लागून मृत्यु पावले शके १७ पुढे नकल मित्ती भाद्रपद शुा १४

---

२

१ हरी शिवराम भाऊसाहेब यांबरोबर पाणिपतास गेले होते तेथें लढाईंत राहिले ठिकाण लागलें नाहीं शके १६८२ त्यास स्त्रिया दोन

१ लक्ष्मीबाई

१ राधाबाई

२

१ पांडुरंग शिवराम परशरामभाऊ पटवर्धन यांजकडे होते व पंढरपूरचें संवस्थान व मौजे कयवल्ली येथील वहिवाट करीत होते पुढें दुखणें होऊन काल जाला अशाढ वा। ४ शके १७२० त्यांस पुत्र व कन्या

१ रघुनाथराव

१ शिवरामपंत आप्पा

१ कन्या सौ विठाबाई अंध

३

१ आनंदराव जिवाजी जिवाजीपंत अण्णाचा काळ जाल्यानंतर खासगीचा कारभार शिवरामभाऊ लाहान सवव करीत होते पुढें श्रीमंत थोरले रावसाहेब यांची कृपा बहुत संपादन केली पुढें शिवरामभाऊ यांस खासगीचीं वस्त्रें दादासाहेब याणीं दिल्हीं पुढें उपजीविकेस किल्ला सिंहीगड व सरंजाम दिल्हा नंतर पुढें बाजीरावसाहेब यांच अमलांत काल जाला शके त्यास पुत्र केशवराव

१ गोविंद शिवराम तात्या याणीं आपले स्वपराक्रमानें श्रीमंत नानासाहेब यांची कृपा चांगली संपादून कारकुनीचा पेशा एकीकडे ठेऊन मुछदगिरीचें काम करून कारभार करूं लागले पुढें नानासाहेब यांचा काल जाल्यावर माधवरावसाहेब यांचीं हि कृपा चांगली संपादून अंबारीचा हत्ती नानासाहेब यांचे वेळेस व स्वाराचे सरंजामास गाव मौजे हिपरगी दिल्हा जातीस तैनात करून देत होते परंतु घेतली नाहीं श्रीमंत दादासाहेब व रावसाहेब यांचे मध्यस्ती नेहमीं बोलण्यांत होते व वकिलाती होत्या इंग्रज व होळकर व भोसले व नबाबाकडील रुकनतदौला यांजकडील ऐसे वकिलातीचीं कामें होतीं मुंबईस कामाकरितां एक दोन वेळा गेले होते श्रीमंतांबरोबर स्वाऱ्या बहुत केल्या स्वराज्यांत व परराज्यांत सर्वांवर कृतोपकार बहुत केले

घरगुतीं कृत्यें

१ पुण्यांत जागा नवी संपादन करून बाग व पागा दुकानें बांधलीं

१ श्रीरामेश्वरदेवाचें देवालय नवें बांधिलें

१ कोकणांत मौजे जुवाठी हा गांव इनाम करून घेऊन सनदेंत पांच नांवें करून घेतलीं

१ कसबें पैठण व पंथेवाडी येथील कुणकर्णी खा।

१ बाळाजीपंत फडके हे कारभार करीत होते त्यांनीं व्यवहार करून बहुत कु-

विलें व लोकाचें देणें हि वहुत केलें खरावी फार जाली फडके वाप खाऊन मृत्यु पावले.

१ पुणें जळालेनंतर पागेंत येऊन राहिले तेथें दिवाणखाना व तांब्याचे पत्र्याचा वंगला वांधिला. रुजू लोखंडी कल्हेदार पत्र्याचा वंगला

१ वाळाजीपंत फडके यांची तोहमत मोठी पडली त्यावदल शिवरामपंत आप्पा व जिवाजीपंत आप्पा यांणीं सांगितलें जे तुमचे व्यवहार मोठे व तोहमती हि मोठ्या त्यास तुमची जमा व तुमचें देणें तुम्हीं संभाळावें. त्या दिवसापासून विभक्त.

१ गोविंद शिवराम तात्या यास पुत्र व कन्या

१ नीलकंठराव याचा जन्म शके १६८० फालगून

१ सौ कुसावाई वडील रघुनाथराव गद्रे यास दिल्ही

२

१ नीलकंठराव याची मुंज

१ नीलकंठराव याचें लग्न शके कृष्णाजी वहिरव थत्ते यांची कन्या केली. नांव पार्वतीवाई ठेविलें.

१ मोठीं मोठीं कृत्यें लिहिलीं शिवाय किरकोळ वहुत कृत्यें आहेत.

१ गोविंद शिवराम तात्या दादासाहेव यांजकडे जाण्यावद्दल प्रस्थानानें वागेत राहिले तेथें काळपुळी जाली सवव माघारे घरीं येऊन रुप्याची तुला केली नंतर काल जाला; मिति चैत्र वा। १२ शके १६९४ चे सालीं सौावती गोपिकावाई याणीं सहगमन केलें. श्रीमंत थोरले रावसाहेव वहुत कष्टी जाहाले. ते वेळेपासून पुढें कारभारी नारो वापूजी पोंक्षे होते.

१ गोविंद शिवराम तात्यांचा काल जाल्यावर श्रीमंत कैलासवासी माधवरावसाहेव याणीं नीलकंठराव यांस वस्त्रें व चौकडा वहुमान दिल्हा; त्यांजकडील वकिलीचीं कामें पूर्ववत्प्रमाणें कायम ठेविलीं. नीलकंठराव लहान सवव नारोपंत पोंक्षे वोलणीं वोलत होते.

१ नीलकंठराव लाहान सवव नारोपंत पोंक्षे कारभार करीत होते. नंतर थोरले रावसाहेव यांस दुखणें लागून थेउरास काल जाला मातोश्री रमावाईसाहेव याणीं सहगमन केलें नंतर श्रीमंत नारायणरावसाहेव यांचे कारकिर्दीत घरचिंतना. अनंतराव जिवाजी व पांडुरंग शिवराम यांसीं कलह लागला. हिंदुस्थानचे घाडयावरून नारोपंत यावर गर्दी केली तेव्हां नीळकंठराव यांस उरांत तरवारीचा गाभ्या लागला नंतर ते वेळेस पोंक्षे यास मातोश्री गोदूवाई यांणीं विचारलें कीं शिवरामभाऊची वाट काय त्यावरून रायास व भाऊ ऐसे उभयतांस रात्रीं घेऊन परशरामभाऊ पटवर्धन यांचे घरीं येऊन राहिले.

नंतर पहिला वाडा सरकारवाडयासंनिध आहे पुणें जळालें तेव्हां जळाला होता तो नवा बांधिला होता तेथें उभयता येऊन राहिले.

१ श्रीमंत दादासाहेब व नारायणरावसाहेब यांचें वांकडें पडून गर्दीत नारायणरावसाहेब मारले गेले नंतर दादासाहेब यांणीं शिवरामभाऊ यांस खासगींचीं वस्त्रें दिल्हीं.

१ श्रीमंत दादासाहेब हैदरचे स्वारीस गेले; मागें मातोश्री गंगाबाईसाहेब गरोदर होती त्यांस पुरंधरीं कारभारी नाना फडनीस व सखारामपंत बापू यांणीं नेऊन ठेविली नऊ मास जाल्यानंतर सवाईमाधवरावसाहेब यांचा जन्म जाला मिति आा वैशाख शुा ७ शके १६९६ नंतर पुढें कांहीं दिवशीं नीलकंठराव यांस तैनात नाना फडणीस व सखारामपंत बापू यांणीं करून देवऊन सरंजाम दिल्हा व अंबारीचा हत्तीसुद्धां दिल्हा.

१ पागा व बाग आहे तेथें नवें घर बांधून शिवरामभाऊ यांसीं गोडीगुलाबीनें विचारून घरीं येऊन राहिले सौा पार्वतीबाई लहान सबब मातोश्री राधाबाई काकू ही नागपुरीं माहेरीं होती त्यांस पुर्त्री आणून आपले जवळ ठेविली

१ नीलकंठराव यांस पुत्र व कन्या

१ गोविंदराव तात्या यांचा जन्म ·इंग्रजाचे पळणीस पांडवपार्डास गेले तेथें शके १७०२ माघ वा १४

१ सौा आनूबाईचा जन्म शके १७ + +

१ सौा बहिणाबाईचा जन्म शके १७ + +

१ सौा ताईचा जन्म शके १७ + +

१ हरीपंतनानाचा जन्म शके १७१२ श्रावण शुद्ध ७

५

१ हरी शिवराम यांचा उत्तरविधी पाटठाणीं भीमातीरीं करविला.

नंतर मातोश्री काकूबाई यांस माहायात्रा करविली शके १७०८

१ गोविंदराव तात्या

१ मुंज्य शके १७०८

१ लग्न बाईंत रामचंद्रराव रास्ते यांची कन्या केली शके १७१२ फाल्गुनमास शुद्ध १०; समारंभ मोठा जाला.

२

१ सौा आनूबाईचें लग्न शके १७१०

गोविंद भटजी निदसुरे यांचे पुत्रास दिल्हीं समारंभ मोठा जाला.

१ नीलकंठराव यांणीं महत् कृत्यें केलीं

१ श्रीरामेश्वरदेवापुढील सभामंडप व भोंवतालचा फरस व विहिरींनीं

कड व दरवाजा

१ मौंजे पाटेणाण ता। सांडस येथें श्रीनागेश्वरदेव आहे त्याचें देऊळ बांधिलें.

१ नांदते वाड्याचा पुढील चौक दिवाणखानासुद्धां नवा बांधिला शके

१ नांदते वाड्या लगत दुकानें निमे बांधिलीं. [१७११.

१ शके १ चे सालीं नारो बापूजी पोंक्षे यास घर बांधावयास जागा रामेश्वरचे दाक्षिणे कडील दिल्ही.

१ किरकोळ लहानमोठीं कामें

१ ब्राम्हणास घर बांधून दिल्हें.

७

१ नारो बापूजी पोंक्षे यास काळपुळी होऊन देवआज्ञा जाली मित्ती कार्तिव वा। १३ शके १७१३; पुढें त्याचे चिरंजीव बळवंतराव नारायण कारभार करीत होते.

१ नीलकंठराव यांस क्षयाची भावना होऊन दोन वर्षे दुखणें जाहालें सबब समाचारास नाना फडणीस व हरीपंत फडके आले तेव्हां सांगितलें कीं श्रीमंतास विनंति करून दाहा बिघे जमीन इनाम ब्राम्हणास द्यावयाकरितां देवावी त्यावरून त्याणीं श्रीमंतांस विनंति करून दाहा बिघे जमीन बाम्हणास देवविली त्याचें इनामपत्र आपले नावें करून घेऊन ब्राम्हणास दिल्ही. नंतर कार्तीक शु॥ १३ शके १७१४ देवाज्ञा जाली. सौ पार्वतीबाई याणीं सहगमन करते वेळेस सांगितलें जे आमचें गयावर्ज्यन तीन वर्षांत करावें व चिरंजीव नाना लाहान आहे त्यास अंतर देऊं नये. सर्व मुलें मातोश्री काकूबाई याचे स्वाधीन करून सहगमन केले.

१ नीलकंठराव याचा काल जाल्यानंतर गोविंदराव तात्या यांस नाना फडनीस याणीं श्रीमंत सवाईमाधवराव यांस विनंति करून बहुमान वस्त्रें चार सनगें व कंठी मोत्याची दिल्ही व सरंजाम पूर्ववत् प्रमाणें करार करून देऊन तैनातजावता करून दिल्हा व निसवतीस अंबारीचा हत्ती दिल्हा शके १७१४. कारभारी बळवंतराव नारायण पोंक्षे.

१ चिरंजीव सौ बहिणाबाई यांचें लग्न शके १७++. विश्वनाथ जोशी सातारकर यांचे पुत्रास दिल्ही.

१ स्वारी खर्डे श्रीमंताबरोबर शके १७१६ मोगल मोडून श्रीमंतास यश मोठें आलें व मौामुलुख कारभारी व छत्तीस लक्षाची जाहागीर घेऊन आले.

१ चिरंजीव सौ ताईचें लग्न शके १७++. भास्कर हरी पटव न वास दिल्ही.

१ श्रीमंत सवाईमाधवरावसाहेब यांची कृपा बहुत संपादन केली नंतर श्रीमंत दिवाणखान्यातून पडून देवाज्ञा जाली मित्ती आश्विन शुद्ध १५ शके १७१७.

१ श्रीमंत बाजीरावसाहेब व अमृतराव व चिमाजीआप्पा यांस पुण्यास नाना-फडणीस वगैरे कारभारी याणीं आणिलें नंतर राज्याचीं वस्त्रें देवऊन राज्य करूं लागले शके १७१८ माघ वाा ३.

१ हरीपंत नाना यांची मुंज शके १७१+.

१ गोविंदराव तात्या याचें दुसरें लग्न सौा गोपिकाबाई यास क्षयाची भावना जाली सबब केलें शके १७१+. ज्येष्ठमास बापू वाडके(दे?)कर यांची कन्या केली नांव सौा रमाबाई ठेविलें.

१ सौा गोपिकाबाई गोविंदराव तात्याची प्रथमस्त्री यांस क्षयाची भावना होऊन वाईंत कृष्णातीरीं देवआज्ञा झाली मिति माघ वाा १२ शके १७++.

१ हरीपंत नाना याचें लग्न शके १७++ गणपतराव मेहेंदळे यांची कन्या केली नाव सौा लक्ष्मीबाई ठेविले.

१ नाना फडणीस यांस शिंद्यानीं कैद केलें सबब नानाकडील आरब वाड्यांत शिरले त्याणीं खराबी फार केली शके १७+ +. वाड्यांत आरब शिरले ते न निघे सबब शिंद्यानीं वाड्यास तोफा लाविल्या.

१ श्रीमंत बाजीरावसाहेब राज्यावर आल्यापासून खराबी बहुत जाली

१ सरंजामपट्ट्या वगैरे ऐवज बहुत घेतला

१ नानाफडनीस यांचा काल जाल्यानंतर निमे सरंजाम नेमणुक व गांव जप्त केले

१ अंबारीचा हत्ती निसबतीस होता तो हि घेतला.

---

३

१ यशवंतराव होळकर हिंदुस्थानांतून फौजसुद्धां पुण्यानजीक येतां च श्रीमं ताची लढाई होऊन श्रीमंत निघोन कोकणांत गेले. सुवर्णदुर्ग येथें जाऊन श्रीमंत जहाजांत बसून वसईस जाऊं लागले तेव्हां सर्वांस फौजसुद्धां निरोप दिल्हा तेव्हां आम्ही निरोप घेऊन देशीं वाईस येऊन नंतर पुण्यांत श्रीमंत अमृतराव साहेब यांची पूर्वीं कृपा संपादन केली होती त्यावरून येऊन भेटलों नंतर येथील रंग ठीक दिसेना सबब विसापुरीं मुलेंमाणसें होतीं ते आणून मुलेंमाणसेंसुद्धां लोहोगडास गेलों. मागें होळकराकडील हरीपंत भा वाड्यांत येऊन राहिले होते त्यामुळें वाड्याची वगैरे खराबी बहुत जाली पुढें श्रीमंत बाजीरावसाहेब इंग्रज बहादूर यांस घेऊन पुण्या आले मि ज्येष्ट शके १७२५ तों होळकर व अमृतराव साहेब पूर्वीं च निघून गेले श्रीमं तास आम्ही घाटाखालीं भेटून बरोबर पुण्यास आलों. भेटीसमई मार घोडी श्रीमंतास नजर केली. मुलेंमाणसें लोहगडीं होतीं तीं वाड्यास आणू

ठेविलीं. नंतर पुढें दंगा निवारण जाल्यावर पुण्यास आणिलीं नंतर पुढें धान्याचा दुष्काळ वहुत पडला त्यामुळें ऐवज वहुत खर्च जाला.

१ गोविंदराव तात्या यांस पुत्र व कन्या

१ कुसावाई

१ काशीवाई

१ मनुवाई

१ नीलकंठराव यांचा जन्म वैशाख शुद्ध १४ शके १७३७

१ श्रीमंत वाजीरावसाहेव यावरोवर स्वाऱ्या वहुत करून मेहनत हि फार केली परंतु त्यांचे विचारास न येतां सदाशिव माणकेश्वर कारभार करीत होते त्याणीं निमे सरंजाम राहिला तो स्वारासुद्धां जप्त केला मिति शके १७३३ त्यामुळें वहुत खरावीस आलों इनामा खेरीज सरकारी इलाखा कांहीं राहिला नाहीं.

१ श्रीमंत अमृतरावसाहेव याणीं पेशजीं केवडयाचे विहिरीकडील जागा घेऊन दुसऱ्यास दिल्या त्यांचीं नावें

१ विठ्ठलपंत लघाटे

१ वापू चिटणीस

२

१ वाळोर्जी कुंजर याणी गंजीची जागा पुलाजवळील होती ती जवरदस्तीनें घेतली.

१ हरीपंतनाना याचें दुसरें लग्न स्वसंतोषें शके १७३४ वाळाजीपंत पटवर्धन याची कन्या केली नाव सौ गंगावाई ठेविलें.

१ हरीपंत नाना यांस पुत्र व कन्या

१ प्रथम स्त्रीस यमुनावाई

१ दुसरे स्त्रीस चिरंजीव माधवराव वापू यांचा जन्म आषाढ वा। १० शके १७४१ विभक्त जाल्या नंतर

२

१ सौ। कुसावाई लग्न माघ शु॥ १५ शके १७३४ नारोपंत दातार पेणकर याचे पुत्रास दिल्हीं; तात्या श्री माहायात्रेस गेल्यानंतर मागें चिरंजीव नानानीं लग्न केलें समारंभ वहुत चांगला जाला.

१ सौ। काशीवाई यांचें लग्न माघ वा। २ शके १७३६ कुशावा सोमण तळेकर याचे पुत्रास दिल्ही. तात्या माहायात्रेहून आल्यानंतर सोमणाकडील मांडव-पर्तणाचे दिवशीं उपाध्ये याचे दक्षणेवरून चिरंजीव नानाचा कज्या मोठा जाला तेव्हांपासून विभक्तपणाचें वोलण्यास प्रारंभ जाला. व्याही यांचे घरीं नाना भोजनास गेले नाहीं.

१ सौभाग्यवती मनूबाई यांचें लग्न जेष्ठ शुा १५ शके १७४०; कृष्णराव नारायण जोशी सातारकर यांचे पुत्रास दिल्ही. विभक्त जाल्यानंतर वाई मुक्कामीं इंग्रजाचे दंग्यामुळें गेलों तेथें लग्नास चिरंजीव नाना हि आले होते.

१ चिरंजीव नीळकंठराव यांची मुंज चैत्र शुा १० शके १७४२ समारंभ मोठा जाला.

१ नीळकंठराव यांचें लग्न फाल्गुन शुा ३ शके १७४३ बाबाजी रास्ते यांची कन्या केली; नाव सौावती पार्वतीबाई ठेविलें; समारंभ चांगला जाला.

१ गोविंदराव तात्या यांणीं लौकिक व महत्कृत्यें केलीं—

१ हरी काशी भोपळे यास केवड्याचे विहिरीकडील जागा घर बांधावयास दिल्ही इमारतसुद्धां २ सोपे व खुली जागा

१ गणेश जनार्दन यास श्रीरामेश्वर देवाचे उत्तरेकडील जागा इमारतसुद्धां

१ श्रीरामेश्वर देवालयांतील धर्मशाळा पहिली होती तिचे लगत खण नवे बांधून पूर्ती केली.

१ मौजे जुवाठी हा गांव इनाम तेथें पूर्वीपासून वतनदार खोत नव्हता. मध्यें बाबाजी प्रभू देसाई खोती मौजेमारची वतनी माझी म्हणोन वाद सांगत होता तेव्हां चिरंजीव नारो शिवराम यांणीं वादास प्रारंभ करविला. नंतर ते मृत्यु पावले त्या दिवसापासून पुढें वादास प्रारंभ करून पंचाईतीस रा बाळाजी नीलकंठ दाते यास नेमून देऊन सरसुभापंचाईतमतें वतनदार खोत देसाई नव्हे खोती सरकारची ठरोन सारांष होऊन निवाडपत्र करून घेतलें नंतर बेवारशी खोती सरकारची जाली सबब सरकारांत नजर देऊन खोती इनाम आपले न(ा)वें करून घेतली व इनामपत्रें खोतीचीं सरकारचीं करून घेतलीं शके १७++.

१ बळवंत नारायण पोंक्षे यास घर बांधावयास बक्षीस दिल्हे रुा ५००० पांच हजार

१ श्रीमाहायात्रेस श्रीमंत बाजीरावसाहेब यांचा निरोप घेऊन पौष वा १० शके १७३४ चे सालीं नारायणराव मिरजकर यांचे यात्रेचे संगाबरोबर निघोन सहकुटुंब व मातोश्री माकूबाई यांस बरोबर घेऊन चालते जालों मागें चिरंजीव कुसाबाईचें लग्न व्हावयाचें सबब घरीं चिरंजीव नाना यांसी ठेऊन गेलों मागें चिरंजीव नाना मंडळीसुद्धां घरीं राहिले आम्हीं नागपूरचे वाटेनें झाडीकडून यात्रेबरोबर जातानां नागपूरचे पुढें मुक्काम बोरीबोहें येथून पोटदुखीस प्रारंभ जाला मिति चैत्र शुा १ शके १७३५ व दुखणीं हि बहुत जाहालीं. तिरस्थळी यात्रा केली व श्रीमंत अमृतरावसाहेब यांचा लोभ पूर्वी बहुत संपादन केला होता त्यामुळें त्याणीं बहुमान देऊन खर्चास हि थोडें बहुत

दिल्हें तिरस्थळीं यात्रा करून देशीं यात्रेबरोबर निघोन नागपुरापर्यंत आलों नागपुरीं येऊन श्रीमंत सेनासाहेबसुभा रघुजी भोसले यांणीं गोविंद शिवराम तात्या यांचा घरोबा जाणून बहुमान जातां व येतांना देऊन व खर्चास हि थोडेबहुत दिल्हें नंतर तेथून निघोन पंढरपूरचे मुक्कामीं आलों तेथें श्रीमंत बाजीरावसाहेब यांची भेट घेऊन पुढें पुण्यास घरीं येऊन पोहचलों मिति आषाढ वा। १३ शके १७३६. तीर्थरूप मातोश्रीचे वचनाप्रमाणें ईश्वरें सिद्धीस नेलें.

१ श्रीरामेश्वरदेवाचे दक्षणेस खुली जागा होती तेथें नवी इमारत लाकडी सभामंडपसुद्धां बांधोन त्या जाग्याचे नांव विष्णुमंदिर ठेऊन तेथें श्रीविष्णूची स्थापना लक्ष्मीसहित केली.

१ श्रीविष्णूची स्थापना मिति ज्येष्ठ शु॥ ७ शके १७४४

१ श्रीलक्ष्मीची स्थापना मिति माघ शु॥ ६ शके १७४९. या जाग्यांत नहराचें पाणीं बागेंतून नेऊन पाण्याचा हौद देवाचे पिच्छाडीस बांधिला व हौदालगत सोपा चार खणाचा बांधिला.

१ जन्माष्टमीचे उत्साहास नवीन प्रारंभ इा शके १७२५ पासून केला.

१ माहायात्रेस जाण्याचे पूर्वीं उभयता बंधू व हरी काशी भोपळे व गणेश जनार्दन ऐसे बसून बहुत गोडीच्या गोष्टी बोलत होते त्यावर नानाचे बोलणें पडलें जे हीं बोलणीं वरकांतींचीं आहेत सर्वस्वदौलतीचा कागद लिहून देणें परम कठीण आहे म्हणोन बोलले त्यावरून ते च बैठकीस सर्वस्वदौलत तुमची म्हणोन कागद लिहून दिल्हा त्या कागदावर साक्षी हरीपंत व गणेश जनार्दन व सदाशिव खंडेराव व गोविंदराव करंदीकर या चौघानीं घातल्या. तो कागद नानानीं पाहून कांहींएक दिवशीं परत दिल्हा तो फाडून टाकिला त्यावरून नाना विभक्त होणार ही खातरजमा वाटत होती.

१ गोविंदराव तात्या व हरीपंत नाना उभयता बंधू एकत्र असतां तात्या माहायात्रेस गेल्यामागें नानाचे मनांत हरएक किंतु येऊन विभक्त व्हावें ऐसें जाहालें त्यावर नानास लोकानीं अनुमोदन बहुत दिल्हें यास कारण आम्हीं काशीहून बळवंत नारायण पोंक्षे यास कागद पाठविला त्यास तो पोंक्षे याणीं नानांस दाखविला तेव्हांपासून विभक्त व्हावें हा हेत मनांत बहुत होता परंतु त्याजवर चिरंजीव सौ काशीबाईचे लग्नांत उपाध्ये याचे दक्षणेवरून उभयता बंधूंचा कज्या मोठा जाला तेव्हां विभक्त व्हावें असें बोलणें नानाचें पडलें तेव्हा बहुत प्रकारें सांगितलें कीं विभक्त न व्हावें. तीर्थरूप मातोश्री याची आज्ञा जे नाना लहान आहे त्यास अंतर देऊ नये ऐसें सांगोन त्यांणीं सहगमन केलें तें स्मरोन घरगुती मंडळीकडून बहुत प्रकारें सांगोन पाहिलें परतु न आईकेत तेव्हां त्यांणीं दोन कलमांचा मुद्दा सांगितला कीं

तात्याचे दोन मुलींचीं लग्नें जालीं व माहायात्रा हि जाली त्यास माझे मुलीचें लग्न करावयाचें आहे व माहायात्रा करावयाची आहे त्याचा ऐवज समाईक पो घ्यावा म्हणोन बोलणें पडलें त्यावरून मातोश्रीचे आज्ञेवरून सदरहू दोन कलमें लिहिलीं आहेत तीं समाईक ऐवज पो करूं म्हणोन सांगितलें तत्राप न ऐकत सबब दोनप्रहर रात्रीं कागद लिहून दिल्हा कीं तुमचे मुलीचें लग्न व माहायात्रा समाईक ऐवज पो करावा ऐसें लिहून दिल्हें तो दस्ताऐवज हातास येई तोपर्यंत विभक्तपणाचें बोलणीं बोलत होते. दस्ताऐवज हातीं आल्यावर चार महिने एकत्र विचारें चालले नंतर पुन्हा विभक्त व्हावें म्हणोन बोलणें पडलें त्यावरून विभक्त न व्हावें सबब रा गणपतराव पानसे व गणपतराव बापू मेहेंदळे व बळवंतराव पोंक्षे या त्रिवर्गाकडून बहुत प्रकार सांगविले परंतु त्याचा दुराग्रह विभक्त होण्याविशीं फार कोणाचें हि न ऐकत सबब आषाढ शु॥ १ शके १७३७ चे सालापासून विभक्त वाटणी यथाविभागें रा गणपतराव बापू मेहेंदळे व गणपतराव पानशे व बळवंतराव पोंक्षे या त्रिवर्गाचे विद्यमानें याद ठरोन वाटणी दिल्ही. पहिला कागद लिहून तो माघारे घेऊन दिल्हा सबब मोहगम समाईक पो चिरंजीव यमूबाईचे लग्नावा॥ पांच हजार काढून बाकी वाटणी यथाविभागें करून दिल्ही. जरावजरा लोहलोखंडसुद्धां देऊन परस्परें फारखती जाल्या मिति अश्वीन शु॥ १ शके १७३७. पूर्वी पंचाइतींत विसाजी गणेश प्रतिपक्षानें बोलत होता सबब त्यास पंचाइतींतून उठऊन दिल्हें त्या दिवसापासून नानाचा कारभार करूं लागले व नांदतावाडापैकीं पुढील चौक नवे इमारतीचा व पागा वगैरे जागा व दुकानें निमें नानाकडे व बागे पो निमे पश्चमेकडील पाणी लगत जमीन चांगली त्या जमिनींत कोंदाचीं झाडें नारळीचीं आहेत तीं समाईक ठेवावी म्हणोन पंचानीं नानांस बहुत प्रकारें सांगितलें परंतु त्यांचे हि नाना न ऐकत सबब झाडेंसुद्धां निमे वाटणी नानास दिल्ही.

१ बाळा जामदार याणें पेशजीं शपथ दिल्ही कीं तुम्हांस अंतर देणार नाहीं या प्रॉ शफत दिल्ही असतां नानाकडे जाऊन राहिला मिति अश्वीन शु॥ १२ शके १७३८ तेव्हांपासून जामदारीचें काम त्रिंबका शिंदा यास सांगितलें.

१ वडिलोपार्जित वतनें व इनाम गांव व घरें गावोगावीं आहेत तीं उभयतांचीं निमे निम

१ कसबें पैठण येथें

१ कुलकर्ण नीम

१ घर बंदिस्त

२ खुल्या जागा

४

१ मौजे पंथेवाडी येथें
    १ श्रीदेवीचें देवालय
    १ विहिर
    १ कुळकर्ण दरोबस्त
    ———
    ३
१ मौजे जुवाठी ताा सौंदळ
    १ मौजेमाार हा गांव इनाम पाच भावांस खोतीसुद्धां
    १ वाडा घर राहावयाचें
    ———
    २
१ कसवें राजापूर येथें वखार दुकानें
१ वाग उन्हाळें
१ वाग गिरे येथें
१ मौजे कोतवडें ताा रत्नागिरी येथें खाजण
१ मौजे घोटी पाा भोसें येथें
    १ वाडा
    १ पागा
    १ मिराशी जमीन घेऊन विहिर नवीन पाडून वाग के
    ———
    ३
१ मौजे पाटेठाण ताा सांडस येथें
    १ शिवालय जीर्णोद्धार केला तें
    १ घर वाडा व पागा
    
    २
    १ मोजे गोवर्धन येथें वाडा
    १ सिंगवें येथें
        १ पागा
        १ पाटीलकी भाऊवंदसुद्धां समाईक
    ———
    २
१ शहर जुन्नर येथें जागा अजिदावाद पेठ येथें आहे
१ सोनापूर येथें पागा
१ कसवें तळेगांव येथें जागा

१ श्रीमंत वाजीरावसाहेव याचें व ईग्रज वहादूर यांचें वाकडें पडलें याचें कारण गंगाधरशास्त्री पटवर्धन गायकवाड यांज वकिलीचीं बोलावयास इंग्रज वाहदर यांचे वाहदारीनें ८।

पूर येथें सरकारची गेली त्यावरोवर शास्त्री हि गेले ते तेथें प्रदक्षणेचे वाटे-वर मारले गेले आषाढमास शके १७++.

त्याचा आरोप त्रिंबकजी डेंगळे याजकडे आला सबब डेंगळे यांस इंग्रज बहादुर यांचे हवालीं करून दिल्हा. पुढें त्रिंबकजी इंग्रजांचे कैदेतून पळोन गेला नंतर श्रीमंताची स्वारी फुलंगाव व आपटी जातानां रथांतून पडून हात दुखवला नंतर स्वारी पुण्यास आली मिति फाल्गुन शुा १ शके १७३८. नंतर वैशाख वा। ८ गुरुवारीं शके १७३९ चे सालीं इंग्रजबहादुर याकडील अल्पेष्टीण साहेब याणीं शहराभोवती गिर्दे बसऊन श्रीमंतास तंबी पोहचवून सरकारातून सदाशिव माणकेश्वर याचे विद्यमानें पहिले करारा प्रो किले तीन दरम्यान घेतले. नंतर अषाढ शुा २ इंदुवारीं सरकारातून इंग्रजास मुलूख व किल्ले व ठाणीं व नर्मदाउत्तरतीर दरोबस्त सनदा मोर दीक्षित याचे विद्यमानें देऊन पहिले किल्ले व दरम्यान तीन दिल्हे होते ते माघारे घेऊन सदा दिल्ह्या. नंतर श्रीमंताची स्वारी पंढरपूरचे यात्रेस गेली आषाढमासीं तेथून परभारे माहुलीचे मुक्कामीं येऊन तेथें मलकण साहेब याची भेट जाहाली. तेव्हांपासून फौज नवी ठेवावयास प्रारंभ करून फौजेचा जमाव करून भाद्रपद वा। १ स्वारी पुण्यास आली. नंतर आम्ही श्रीमंताचा निरोप घेऊन रेवणसिद्ध देवास गेलों मिति अश्वीन शुा १५. नंतर मागें अकस्मात् अश्वीन वा। ११ बुधवारीं गारपीर बेटाची जागा खालीं करून देण्यावा। लढा पडला सबब बापू गोखले यांचे विचारें श्रीमंतांची स्वारी पर्वतीस जाऊन सर्व सरदार यांस निरोप देऊन इंग्रजाचे तोंडावर रवाना केलें; लढाई मोठी जाहाली मोर दीक्षित वगैरे मंडळी सरकारकामास आली बेट व गारपीरची छावणी जाळली इंग्रजाचा तसनस फार जाला हें वर्तमान आम्हीं मिरजेचे मुक्कामीं ऐकिलें त्यावरून तेथून निघोन पुण्यास यावयास हिवें मुक्कामीं आलों तेथें ऐकिलें कीं कार्तिक शुा ८ शके १७३९ चे सालीं सरकारची व इंग्रजाची लढाई मातबर तिसरे प्रहरापासून सूर्योदयपर्यंत होत होती तेव्हां श्रीमंत दोन प्रहर रात्रीस निघोनि गेले. मागें अल्पिष्टीन साहेब यांणीं पुण्यांत इंग्रजी झेंडे लाऊन अमल शहरांत बसाविला सर्व रयतेस दिलदिलासा देऊन राज्य करूं लागले. हें वर्वमान पुण्यास माणसें पाठऊन आणविलें आणि आम्हीं मुलेंमाणसें भोरास पाठऊन दिलीं होतीं तेथें जाऊन सर्वांस भेटून पुढें मुलेंमाणसेंसुद्धां वांई मुक्कामास गेलों. श्रीमंत मजलदरमजल गेले मागें इंग्रजाची फौज लागली होती. स्वारीबरोबर हरीपंत नाना याणीं मेहनत फार केली व आम्ही हि श्रीमंतास भेटण्या-करितां वांई मुक्कामीहून गेलों. वाटेनें गांठ पडली पांच चार दिवस स्वारींत होतों. नंतर वाटेनें निभावणी न होय सबब माघारे चिरंजीव नानासुद्धां आलों. नंतर वांई मुक्कामीं अल्पेष्टीण साहेब याची स्वारी आली तेव्हां गो

जाली. नंतर कांहीं दिवशीं पुण्यास घरीं आलों मिति आषाढ वा। १० शके १७४०. त्याजवर कांहीं दिवशीं अल्पिष्टीन साहेब याजकडे चिरंजीव हरीपंत-नाना यास पाठविलें बरोबर बळवंतराव पोंक्षे देऊन रवाना केले. नंतर गोपाळराव रामचंद्र पटवर्धन याचे वाहेदारीनें साहेबाची भेट घेतली. नंतर गोपाळराव यांचे विद्यमानें सरंजाम सोडून देण्याविशीं बहुत सांगितलें त्यावरून साहेब यार्णी कबूल केलें कीं तुमचा बंदोबस्त करून देऊं म्हणोन खातरजमेनें सांगितले. नंतर साहेबानीं नानास बहुमानवस्त्रें व शिरपेच दिल्हा व बळवंतराव पोंक्षे यास बहुमानवस्त्रें दिल्हीं; नंतर पुण्यास निघोन आले. त्याजवर पुणें मक्कामीं साहेबाची भेट घेऊन पूर्वीचे संकेता प्रा। काम व्हावें तें जालें नाहीं. वडेसाहेब यांची स्वारी निघोन ममईस गेली नंतर मागें चापलीन साहेब यार्णी उभयतास पेनशीन हजार हजार रुो सालदरसाल द्यावे या प्रमाणें चकत्या करून दिल्या.

१ हरीपंतनाना विभक्त जाल्यानंतर त्यार्णी कृत्यें केलीं

१ चिरंजीव सौ साळीबाईचें लग्न वैशाख शके १७३८ धोंड दीक्षित वोक यांचे पुत्रास दिल्ही. लग्नांत हरीपंत भोपळे याचा कज्या मोठा जाला.

१ श्रीमाहायात्रेस पुण्याहून निघोन सडे गेले मिति कार्तिक शुा। ७ गुरुवार शके १७४४. कुटुंब व चिरंजीव बापू यांस पुणें मुक्कामीं ठेऊन गेले. तिरस्थळी यात्रा करून देशीं घरीं आले मिति माघ वा। १ शके १७४५.

१ पुढील थोरले चौकांत नवीन विहीर पाडावयास प्रारंभ केला मिति फालगून शुा। ११ शके १७४५. विहीर पाडल्यामुळें चौकाचा आव गेला. पाणी वारा हातावर लागलें.

१ गोविंदराव यांस पोटदुखीचा माहायात्रेस गेल्यापासून उपद्रव जाला. तेव्हांपासून ओषधी उपाय बहुत केले परंतु गुणास आलें नाहीं सबब श्रावण वा। ११ शके १७४५ चे मित्तीस लक्ष्मणगीर सोळ्याचे म्हसोबापाशीं राहात होता त्यास आणून प्रकृतीची भावना सांगितली त्याणें तीन दिवसांत प्रकृती चांगली करून देतों या प्रों करार केला त्यावरून गोसावी मजकूर याणें उतारा करून मंत्रसामर्थ्यें करून पाण्यांत आंगारा दिल्हा त्याणें ढाळ मनस्वी जाहाले त्यामुळें प्रकृत ग्लान फार जाहाली स्मृती हि राहिली नाहीं. तदनंतर गोसावीमा। यास पुन्हा आणोन बहुत प्रकारें सामदानभेदेंकरून सांगून पून्हा प्रकृत पूर्ववत् होती तशी तरी करून देणें याप्रमाणें सांगून भाद्रपद शुा। ५ शके मारीं पून्हां उपचार ढाळ न होतां करणें म्हणोन बहुत प्रकारें सांगितलें असतां विडा

करून मंत्र घालून दिल्हा त्याणें ढाळ जे झाले तें लिहितां पुर्वत नाहीं. या कृत्यास पांच पंचवीस रुो खर्च हि केला. तेव्हांपासून शरीरीं नाना प्रकारच्या व्याधी नवीन उत्पन्न जाल्या ते दिवसापासून मांत्रीक उपाय हि वहुत केले व औषधी उपाय हि नानाप्रकारचे करीत आहों परंतु गुणास अद्यापपर्यंत आलें नाहीं भ्रांत पडली आहे.

१ गोविंदराव तात्या यांचे शरीरीं अकस्मात् श्रीरामेश्वर देवाचे दर्शनास गेले तेथें घेरी येऊन झोक जाऊन पडले आणि जिव्हास्तंभ वायू जाहाला मिति वैशाख शुा ८ गुरुवार शके १७४६. तेव्हांपासून औषधी उपाय हि वहुत केले व देवऋषी हि वहुत पाहिले परंतु अद्यापवत् प्रकृत आहे तशी च आहे.

१ गोविंदरावतात्या यांची स्त्री सौ रमाबाई याणीं देवास नवस केले जे पुत्र जाल्यावर देवदर्शनास घेऊन येऊं म्हणोन नवस केला होता; सबब नवस फेडावयास चिरंजीव निळकंठराव सौ सूनबाई व सौ रमाबाई यांस देवदर्शनास पाठविलीं मिति माघ शुा ७ बुधवार शके १७४६.—

१ श्री योगेश्वरी जोगाईचे आंबें
१ श्रीतुळजापूरदेवी
१ श्रीपंढरपूर
१ श्रीरवळनाथदेवास
१ श्रीमाहालक्ष्मी कोल्हापूर
१ श्रीखंडोबा जेजुरीचा

६

सदरहू साहा देवांस नवस केला होता त्याप्रो यात्रा करून घरीं सुखरूप येऊन पोहोंचलीं मिति चैत्र शुा १० मंगळवार शके १७४७.

१ नीलकंठराव याजवर बंडाचा आरोप आला होता मिति माघ वाा १० शके १७६० त्याची चौकशी वेलसाहेब बाहादूर याणीं करून कांहीं शाबूद नाहीं म्हणोन सोडून दिल्हें मिति अधिकज्येष्ठ वद्य १४ सोमवार शके १७६१.

१ साठीशांती ज्येष्ठ वाा ६ शके १७६२ या रोजीं केली रोज शनिवार.

१ गोविंदराव तात्या यांची प्रकृत वहुत विघडली म्हणोन श्रीकृष्णातीरीं क्षेत्र माहुली येथें जाऊन चार दिवस राहून नंतर मार्गशीर्ष वाा ३० शके १७६७ विश्वावसु नामसंवत्सरे त्या रोजास समाधिस्थ जाले, चतुर्थाश्रम घेऊन जाले.

---

# स्थलसूचि-खंड १३

( आंकडे पत्रांकाचे आहेत. )

# व्यक्तिसूचि-खंड १३

( आंकडे पत्रांकाचे आहेत. )

न



प

फ



ब



भ

ह

# व्यक्तिसूचि-खंड १४

( आंकडे पत्रांकाचे आहेत. )

# स्थलसूचि–खंड १४

( आंकडे पृष्ठांकाचे आहेत )